# बालभारती

1984-85



मराठी पुस्तक सातवे

शिक्षणखात्याचा मंजुरी क्रमांक : पपम १०० (भाषा) (७) ड, दि : १४-१०-१९७०

NR1194

# बालभारती

## मराठी पुस्तक सातवे






१९७१

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ

पुणे

प्रथमावृत्ती : १९७१

© महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाकडे ह्या पुस्तकाचे सर्व हक्क राहतील. या पुस्तकातील कोणताही भाग संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांच्या लेखी परवानगीशिवाय उद्धृत करता येणार नाही.

## प्रस्तावना

शासनमान्य अभ्यासक्रमानुसार पाठ्यपुस्तकांची निर्मिती व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळाची स्थापना झालेली आहे. मंडळाने इयत्ता १ ते ७ पर्यंतच्या विविध विषयांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीचा कार्यक्रम आखलेला असून सदर पाठ्यपुस्तक त्यानुसार तयार केले आहे. ते तयार करताना शिक्षक, शिक्षणशास्त्रज्ञ आणि विविध शिक्षण-संस्था यांनी पाठवलेल्या सूचनांचा काळजीपूर्वक विचार करण्यात आला असून ते अधिकाधिक निर्दोष कसे करता येईल याकडे लक्ष पुरवण्यात आले आहे.

भारत सरकारने मान्य केलेल्या व महाराष्ट्र शासनाने स्वीकारलेल्या देवनागरी लिपीतील सुधारणा व जोडाक्षर-पद्धती यांचा या पुस्तकांच्या मुद्रणात अवलंब केला आहे.

संचालक,
महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, पुणे

पुणे :
दि. : २ ऑक्टोबर, १९७०
आश्विन १०, १८९२

कागद :
६१×८६ सें. मी.
६५ ग्रा./चौ. मी.
ग्लेझ्ड क्रीम वोव्ह

मुद्रक :
वि. वि. लिमये,
मल्टिप्रिंट,
मुंबई–८.

प्रकाशक :
बापूराव नाईक
नियंत्रक,
पाठ्यपुस्तक मंडळ
मुंबई १८.

# प्रतिज्ञा

भारत माझा देश आहे. सारे भारतीय माझे बांधव आहेत.

माझ्या देशावर माझे प्रेम आहे. माझ्या देशातल्या समृद्ध आणि विविधतेने नटलेल्या परंपरांचा मला अभिमान आहे. त्या परंपरांचा पाईक होण्याची पात्रता माझ्या अंगी यावी म्हणून मी सदैव प्रयत्न करीन.

मी माझ्या पालकांचा, गुरुजनांचा आणि वडीलधाऱ्या माणसांचा मान ठेवीन आणि प्रत्येकाशी सौजन्याने वागेन.

माझा देश आणि माझे देशबांधव यांच्याशी निष्ठा राखण्याची मी प्रतिज्ञा करीत आहे. त्यांचे कल्याण आणि त्यांची समृद्धी ह्यांतच माझे सौख्य सामावले आहे.

# अनुक्रमणिका

१

# माझे विजयस्मारक

ल. रा. पांगारकर



ल. रा. पांगारकर (जन्म : १८७४, मृत्यू : १९४१.) हे प्राचीन मराठी वाङ्मयाचे अभ्यासक होते. त्यांनी अत्यंत कष्टाने प्राचीन मराठी वाङ्मयाची माहिती मिळवली व तिच्या आधारे मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिला. 'भक्तिमार्गप्रदीप', 'चरित्र-चंद्र' हे त्यांचे काही ग्रंथ. 'माझे विजयस्मारक' हा पाठ त्यांच्या 'चरित्र-चंद्र' या ग्रंथातून घेतला आहे.

प्राचीन ग्रंथ मिळवताना त्यांना किती कष्ट घ्यावे लागत असत, याची कल्पना पुढील उताऱ्यावरून येईल.

अण्णा विजापूरकरांकडे दहावीस माणसे रोज दोनदा जमत. तेथे रोजी माझे दोन-तीन तास आनंदात जात. या मंडळात व बाहेरही दाजीबा पुजाऱ्यांविषयी मी चौकशी चालवली होती. शेवटी दाजीबा पुजारी निपुत्रिक वारले व त्यांचा सर्व ग्रंथ-संग्रह कोल्हापूर येथेच एका वैदयाकडे गेला असे कळल्याचे मी त्या मंडळात सांगितले. तो वैदय स्वभावाने मोठा विक्षिप्त व तामसी असल्याचे सर्वांनी मला सांगितले. दाजीबांचा संग्रह त्यांच्याकडे आहे हे कळताच मी त्यांच्याकडे जाण्याचे ठरवले.

अण्णा म्हणाले, "तो मनुष्य मोठा विक्षिप्त आहे. तो तुम्हांला शिव्या देईल व खवळला तर मारीलसुद्धा! तुम्ही आमच्या गावात येऊन अप्रतिष्ठा भोगून जावे हे आम्हांला योग्य वाटत नाही."

मी अण्णांना म्हणालो, "तुम्ही मला सावध केलेत हे चांगले झाले. पाहा, मी यश घेऊन येईन. मानापमान मी ओळखत नाही. पंतांच्या हातची एक चिठ्ठी मिळाली तर शिव्या व मार खाण्यातही मला अत्यानंद होईल." असे बोलून मी घट्ट मनाने घराबाहेर पडलो व शोध करत त्या वैदयांच्या घरी गेलो.

सकाळचे दहा वाजले होते. पंतांच्या हातचे कागद पाहायला मिळणार या कल्पनेने माझी तहान-भूक नाहीशी झाली. कार्याचे वेड माझ्या अंगात भरले. मी वैदयराजांच्या अंगणात प्रवेश केला. ऊन कडक पडले होते. घरकामावर सुतार, गवंडी लावून त्यांच्या कामावर देखरेख करत वैदयराजांची स्वारी उभी होती. त्यांच्या चेहऱ्याची ठेवणच एखादया रागीट माणसासारखी होती.

मी त्यांच्या पायांवर हळूच डोके ठेवून वंदन केले.

कर्कश आवाजाने व क्रुद्ध मुद्रेने वैदयराज बोलले, "अरे, हे काय मांडलं आहे ? माझ्या पाया काय पडता ? मी काय साधू आहे ?"

"होय, साधूचे भक्त साधूच असतात. आपण मोरोपंतांचे परमभक्त आहात. त्यांच्यासारखेच आपणही मला गुरुतुल्य वाटता."

"मला तुमच्याशी बोलायला वेळ नाही." असे सांगून ते म्हणाले, "मी बोलत राहिलो तर हे सुतार, गवंडी काम करतील काय ? यांच्यावर सारखी नजर ठेवायला पाहिजे."

"माझ्याशी बोलायला आपणांस केव्हा सवड मिळेल ? म्हणाल तेव्हा येईन."

जरा विचार करून ते म्हणाले, "तेथे उभे राहा." वैदयराजांनी मला उन्हात उभे केले. दोन तास उन्हात उभे राहण्याचे हे एक तपच झाले. तपश्चर्येशिवाय कोणत्याही कामात यश नाही.

बारा वाजले. सुतार, गवंडी जेवायला निघून गेले. वैदयराज जिन्याच्या तळाच्या पायरीवर उभे होते. मी भीत भीत जवळ गेलो. त्यांनी मला विचारले, "तुम्ही मोरोपंतांच्या कवितेचा अभ्यास केला आहे काय ?"

"हो, थोडाफार केला आहे."

यावर वैदयराजांनी एकामागून एक अशा पाच आर्यांचा अर्थ व कथा-संदर्भ मला विचारला. सुदैवाने त्या पाचही आर्या मला पाठ होत्या. त्यांनी प्रथम चरण म्हणताच मी सबंध आर्या म्हणावी. वैदयराजांच्या या परीक्षेत मला शंभरातले शंभर गुण मिळाले ! ते प्रसन्न झाले; पण ती प्रसन्नता त्यांनी मुद्रेवर बिलकुल दिसू दिली नाही. जिना चढू लागले व मला पाठोपाठ येण्यास खूण केली. आम्ही वरती गेलो. तेथे एक सतरंजी होती. ती ते पसरू लागले. मी सतरंजीचे दुसरे टोक धरू लागलो तोच ते खेकसले, "काय करता हे ? मी काय गद्धा आहे काय ? माझ्या घरची कामं मला नाही करता येत ?"

"चुकलो. क्षमा असावी."

दोघेही सतरंजीवर बसलो. वैद्यराजांनी एक एक दप्तर आणावे, सोडावे आणि मी त्यांतील काव्ये पाहावी. त्यांनी पाच दप्तरे सोडली. त्यांत दाजीबांनी लिहून घेतलेली पंतांची कविताही छापलेली सापडली. त्यांनी पृष्ठ हातात घेतले की हे भारत आहे, हे मंत्ररामायण आहे, हे कुशलव-चरित्र आहे, ही भागवती प्रकरणे आहेत असे मी म्हणावे. वैद्यबुवांनी नुसते गुरगुरत होकार द्यावा. पंतांच्या हातची दाजीबांना आलेली काही पत्रे सापडतील अशा मोठ्या आशेने मी पाहात होतो; पण माझी निराशा झाली. सहावे दप्तर त्यांनी सोडले आणि पहिले पृष्ठ पाहताच मी ओरडलो, "हे पंतांचं हस्ताक्षर आहे!"

वैद्यराज उद्गारले, "कशावरून म्हणता?"

"मी दीड वर्ष सतत पंतलिखित काव्ये पाहात आहे. त्यांचं लहान, मोठं, बाळबोध, मोडी कोणतंही अक्षर मी स्वप्नातही ओळखीन, इतकं ते माझ्या डोळ्यांत भरलं आहे."

"बरोबर आहे. हे पंतांचं काव्य शेवटी दाजीबांकडे आलं."

त्यांनी केलेली नक्कल व मूळप्रत अशा दोन्ही प्रती वरच होत्या. मी त्या हातांत घेऊन पाहिल्या. ती पंतांच्या हरिश्चंद्राख्यानाची मूळ प्रत होती. ती पाहून माझ्या तोंडाला पाणी सुटले. मी म्हटले, "पंतांचं हरिश्चंद्राख्यान मुळाबरहुकूम छापलं तर काय मौज होईल!"

"ही प्रत किती जपून ठेवली आहे. दप्तराच्या फळ्या पाहा किती सुंदर आहेत. जुन्या लोकांना हस्तलिखितांची किंमत असे. पुस्तके छापायला लागल्यामुळं आता पोथ्यांची किंमत वाटत नाही."

"आपण म्हणता ते खरं आहे."

"ही प्रत जर मुळाबरहुकूम तपासून घ्यायची परवानगी मिळेल, तर—" मी हळूच म्हटले.

"तुम्ही इथं महिनाभर राहायला तयार आहात का?"

"मी नोकर आहे. मला उदया इथून निघालं पाहिजे. रजा भरत आली."

"नोकर कुठं आहात?"

"मी पंढरपूर हायस्कुलात शिक्षक आहे."

"इंग्रजी शिकलात काय?"

"होय, मी बी. ए. आहे. इथं प्रोफेसर विजापूरकरांकडे उतरलो आहे."

"पंतांच्या किती आर्या तुम्हांला पाठ आहेत?"

"फार नाही, पण चारपाच हजार आर्या आता पाठ आहेत."

"तुमचं पाठांतर दांडगं आहे ही माझी खात्री झाली. अभ्यास चांगला केला आहे."

"इथं म्हणाल तर इथं बसून मी प्रत लिहून तपासून घेईन."

"पण तुम्हांला तर इथं राहायला सवड नाही; तुम्हांला या कामाला पंधरा दिवस—चांगला महिना लागेल."

"मी प्रत प्राणापलीकडं जपून ठेवीन. पंधरा दिवसांनी परत करीन."

"ते होणार नाही. महिना, दोन महिने लागतील. तुम्ही मोरोपंतांचे खरे भक्त आहात. तुमच्यासारखा मयूरभक्त मी दुसरा पहिला नाही. ही पोथी मी तुम्हांला बक्षीस देत आहे."

मी पोथीला वंदन केले व वैद्यराजांच्या पायांवर डोके ठेवून तो प्रसाद घेतला व घर गाठले.

दुपारी अण्णांच्या घरी मंडळींना हा सारा प्रकार सांगितला. सर्वांनी माझे अभिनंदन केले. अण्णा म्हणाले, "तुम्ही खडक फोडलात. तुम्ही आपल्या कामात यशस्वी व्हाल यात शंका नाही. तुम्ही सर्वतोपरी योग्य आहात. तुमच्या हातून स्वभाषेची मोठी सेवा होवो!" अण्णांचे अंतःकरण सद्गदित झाले. त्यांच्या व माझ्या नेत्रांतून अश्रू



वाहिले. मी त्यांचा शुभाशीर्वाद अभिवादनपूर्वक घेतला. अण्णा प्रेमळ, सात्विक व थोर पुरुष होते. ते खरोखरीच साधू होते.

पंतांची हरिश्चंद्राख्यानाची मूळ प्रत माझ्या घरी आहे. ते एक छोटेसे विजय-स्मारक म्हणून मी राखून ठेवले आहे.

अप्रतिष्ठा – मानहानी; पंतांच्या हातची – मोरोपंतांनी स्वतः लिहिलेली; मयूरभक्त – मोरोपंतांचे भक्त; अभिवादन – नमस्कार, नमन.

अभ्यास :

१. पांगारकरांनी वैद्यराजांकडे जाऊ नये, असे अण्णा का म्हणाले ? पांगारकरांनी जाण्याचे का ठरवले ? तेथे जाताच त्यांना अण्णांच्या सूचनेचा काय पडताळा आला ?

२. वैद्यराजांनी पांगारकरांची कोणती परीक्षा घेतली ? त्यांचा पंतकाव्याचा अभ्यास चांगला होता, हे कसे सिद्ध झाले ?

३. पांगारकरांनी हरिश्चंद्राख्यानाच्या मूळ प्रतीस 'विजयस्मारक' का म्हटले ?

४. पुढील वाक्ये कोणी व कोणास उद्देशून म्हटली आहेत ?
   (अ) कार्यांचे वेड माझ्या अंगात भरले.
   (आ) तुम्ही खडक फोडलात.
   (इ) ते एक छोटेसे विजयस्मारक म्हणून मी राखून ठेवले आहे.

५. या पाठात पांगारकरांचे कोणकोणते विशेष गुण दिसून येतात ?

६. (अ) खालील वाक्प्रचारांचा अर्थ सांगा व त्यांचा तुमच्या वाक्यांत उपयोग करा :
   तोंडाला पाणी सुटणे, सद्गदित होणे, डोळ्यांत भरणे, तप करणे.
   (आ) खालील सामासिक शब्दांची फोड करा :
   निपुत्रिक, हस्ताक्षर, मानापमान, अप्रतिष्ठा.

२

# वचनाचा महिमा

र. वा. दिघे



र. वा. दिघे (जन्म : १८९६.) हे कथाकार व कादंबरीकार म्हणून परिचित आहेत. यांच्या 'पाणकळा', 'सराई', 'पड रे पाण्या' या व आणखी काही कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. पुढील कथा ही एक लोककथा आहे. ती त्यांच्या 'पड रे पाण्या' या कादंबरीतून घेतली आहे.

सुगीच्या दिवसांत खळयावर आलेल्या एका कोकेवाल्याने सांगितलेली ही गोष्ट आहे. या गोष्टीत वचनाच्या महिम्याचे वर्णन केले आहे.

बाजरीचे खळे निंबाखाली घेतले होते. तेथेच निंबाखाली ज्वारीचे खळे सुरू झाले. तिवडयाभोवती पात फिरू लागली. तिवडा राशीत बुडाला.

सकाळपासून पात हाकून दमलेला संतू निंबाखालच्या खाटेवर लवंडला होता. लवलेल्या फांदया संतूवर चवऱ्या ढाळत होत्या.

वर निळे आकाश चकाकत होते. ढगांची विमाने तरंगत होती. संतू पुन्हा पुन्हा आकाशाकडे पाहात होता. इतक्यात संध्याकाळ झाली. खळ्यात जोडवावडयांवर शेवंता व हरिणी उभ्या राहून उफणत होत्या. मोती मागे टाकत वारा भूसकचरा उडवून नेत होता.

"अमृत, आनखी पात चालू दे. समदा दाना गळला नाय. दान्यासारखा कुनी चोर नाय." संतूने अमृतला बजावले. इतक्यात पाऊलवाटेने एक कोकेवाला मळयात आला व तो म्हणाला, "महाराज, एक गानं म्हनू?"

"म्हनू म्हंजी? म्हनच. तुला कोनी मना केली? आन गान्याला कोन मना करील? म्हन म्हन....कसलं हाय तुजं गानं?"

"हरणीचं हाय महाराज."–असे म्हणून त्याने गायला सुरुवात केली. कोका (किनरी) उलटी करून घुंगूर लावलेली धनुकली तो गजाप्रमाणे तारांवरून फिरवू लागला. धनुकली ओढून तो मध्येच थांबवी व घुंगरांचा आवाज काढून त्याचा ठेका बनवी. कोकेवाला गोष्ट सांगत आहे म्हणून आजूबाजूचे शेतकरी जमले.

"असेल कोनी मोठयात मोठा कर्णामध्ये करण
ऐकावं त्यानं रानच्या माझ्या हरणीचं गानं
नगरी एका राणीचं आलं बीजेला भाऊ दोन
राणीचं भाऊ आले राजाक, राजाचं ते कोन?
रानीचं भाऊ आले पाव्हनं राजाचं मेव्हनं
राजाचं पाव्हनं राजवाडयामंदी त्येना व्ह काय उनं?
श्रीखंडपुरी, बुंदीचं लाडू, पाची पकवानं
खाऊन कटाळलं रानीचं भाऊ राजाचं मेव्हनं.

"आवो, ते राजाचंच मेव्हनं. आन ते राजवाडयामंदी पाव्हनं. सेवेला दासदासी. जेवायला पाची–पक्वानं. त्यांना तिथं कायबी कमी नव्हतं. कमी व्हतं फकस्त हरणाचं मांस. मुदपाकखान्यात त्येचा एक तुकडाबी शिल्लक नव्हता. त्याला बिचारा भटारी काय करनार? राजाला ही गोस्ट कळ्ली; तसा त्यानं परधानाला हुकूम दिला. परधानानं कोतवालाला तंबी दिली. कोतवालानं शिपाई पिटाळ्ले. शिपाई फासंपारध्याकडं आले अन म्हनाले–'अरे अरे फासेपारध्या, मांस आन हरणाचं. कुठूनबी आन. नाय तर राजा आम्हांस्नी सुळावर दील.'

"मग फासेपारध्यानं काय केलं? फासंवागूर घेतलं आन तो रानाकडं निघाला–

"एका तळ्याच्या काठी रं व्हतं हिरवं हरळीवन
त्याच बनामंधी चरत व्हती मिरगपाडसं हरणं
फासंपारध्यानं फासा टाकिला कळंबाच्या झाडावरनं
त्याच फाशामंधी दोन सापडले–एक मिरग, हरिण
दोन रुपयांला नेऊन विकले राजाशी कारण
राजाचं मेव्हनं चाटूती जिभल्या पाहून हरणं दोन

"मंग काय जालं? राजानं ती दोन हरणं भटाऱ्याकडं पाठवली अन त्याला हुकूम दिला की, यांना शिजवूनशान आन. चांगला मसालाबिसाला भरूनशान आन. जालं

बुवा. भटारी त्येना मुदपाकखान्यात घेऊन गेला. हरणांची मान कापाय त्येनं सुरा काढला."



कोकेवाल्याने सुऱ्याचे नाव काढल्याबरोबर खळ्यातल्या बायका व संतू सारी रडू लागली. कोकेवाला पुढे सांगू लागला—

"भलं बुवा. भटाऱ्यानं सुरा काढल्याबरुबर हरनीला पान्हा फुटला. दुधाच्या धारा उडू लागल्या. आन मिरगाचं काय जालं? त्याच्या डोळ्यांतून आसवं गळू लागली महाराज! मारे टप टप टप. भटाऱ्याला आचीर्य वाटलं. राजाच्या भटारखान्यात त्येचा जन्म गेला. पण त्येनं असं कंदी पाह्यलं न्हवतं. तो घाबरला आन त्यानं ती हरनं राजापुढं नेऊन उभी केली. तवा हरनी मानसावानी बोलली—

'रानात हायित उपाशी माजी पाडसं न्हान दोन
व्याकुळ व्हतील भुकेनं बाळं येते मी पाजुन'

"मंग राजा काय बोलला?

'उपाशी हायित माजंबी पाव्हणं माजं ते मेव्हनं
येशिल परतुनी सत्य तु सांग याला जामिन कोन?'

"राजानं हा सवाल केला खरा. पण त्येला हरनीनं काय जाब दिला? समदी जन ऐका. हरनी बोलली—

'रामाच्या वानी मिरग रं माजा देइल तो वचन
बाळांना माज्या पाजुन येते घेते मी त्यांची आन.'

"राजाच्या शिपायांनी हरनीला रानात नेली. पन पाडसं हरनीला पिईनात. पाडसं म्हणाली—

'आई गं, आई, सांग तू आम्हां दूध का लागतं कडू?
—बाळाचं तसलं ऐकून बोल हरनीला आलं रडू.'

"शिपायांनी हरनीला राजाकडं आनलं. राजाला हरनीची रानातली गोस्ट कळ्ली. राजाला दया आली अन त्येनं हरनी, मिरगाला सोडून दिलं."

राशीत बुडालेल्या तिवडयाप्रमाणे संतू खूप झाला व ओरडला, "शाब्बास, ह्येला म्हनायचा वचनाचा महिमा! हरनी असून आपल्या वचनाला जागली." यावर कोयनाबाई काही बोलली नाही.

"आए, त्येला सूप भरूनशान दानं घाल."

"घे, भीक मागतो तर मागतो, पन झोळी केव्हढीशीक ठेवलीय. मेल्याला मोटी झोळी ठिवायला काय बाधिक येतो का?" कोयनाबाईने भिकाऱ्याला कचकावले.

"दे आनखी." संतूने आर्डर सोडली.

"हरिश्चंद्रावानी हाय माझा शेतकरी राजा! आईसाब, मायंदाळ झालं." भिकाऱ्याने आशीर्वाद दिले.



जोडवावडी – मोठी तिवई; यावर उभे राहून धान्य उफणतात. कोकेवाला – किनरीवाला, भिक्षेकरी; करण – कर्ण; राजाक – राजाकडे; भटारी – आचारी, स्वयंपाकी; मुदपाकखाना – स्वयंपाकघर; फासंवागूर – फासा टाकण्याचे एक प्रकारचे जाळे; मिरग – मृग, नर हरीण; आन – शपथ; बाधिक – बाधा; मायंदाळ – खूप, पुष्कळ.

अभ्यास :

१. राजाच्या मेहुण्यांना हरणाचेच मांस का खायला हवे होते?
२. भटाऱ्याने हरिणीला कापण्यासाठी सुरा काढताच काय घडले?
३. हरिणी राजाला काय म्हणाली?
४. हरिणीने राजाला कोणता हवाला दिला?
५. पाडसांना दूध कडू का लागत होते?
६. राजाने मृग व हरिणी यांना का सोडून दिले?
७. कोकेवाल्याने सांगितलेल्या कथेचा ऐकणाऱ्यांवर कोणता परिणाम झाला?
८. हरिणीच्या कथेतून वचनाचा महिमा कसा प्रकट होतो?
९. महारथी कर्ण, राजा हरिश्चंद्र व राजा दशरथ यांच्या कथा वाचा.

३

# असे होते डॉ. केतकर

**शीलवती केतकर**



**शीलवती केतकर** : डॉ० श्री. व्यं. केतकर (जन्म : १८८४, मृत्यू : १९३७.) यांनी मराठी 'ज्ञानकोशा'च्या संपादनाचे प्रचंड कार्य केले. श्रीमती शीलवती केतकर या डॉ. केतकर यांच्या पत्नी. त्यांनी डॉ. केतकरांविषयीच्या आठवणी इंग्रजीतून लिहिल्या आहेत. श्री. रा. य. ओलतीकर यांनी या पुस्तकाचा मराठी अनुवाद 'मीच हे सांगितलं पाहिजे' या नावाने केला आहे. त्यांतूनच पुढील उतारा घेतला आहे.

मुक्या प्राण्यांबद्दल डॉ. केतकरांना कसे प्रेम वाटत होते, हे या पाठात तुम्हांला दिसेल.

एके दिवशी ऐन दुपारी आम्ही दोघे 'ज्ञानकोश' कचेरीत जाण्यासाठी म्हणून घराबाहेर पडलो. ऊन मी म्हणत होते. सदाशिव पेठेतल्या रस्त्यावर बहुतेक शुकशुकाटच होता. एक प्रकारची निःशब्द शांतता सर्वत्र भरून राहिलेली होती.

एकाएकी आम्हांला कुत्र्याच्या पिल्लाचे ओरडणे ऐकू आले. हे ओरडणे साधे नव्हते. कसल्यातरी वेदना होत असल्यामुळे पिल्लू केकाटले म्हणजे जसा आवाज येतो तसा तो आवाज होता. आम्ही तसेच थोडे पुढे गेलो. आवाज अधिक मोठयाने येऊ लागला म्हणून आवाजाच्या दिशेने पाहिले, तर एक लहानसे पिल्लू दरवाजाच्या फटीत अडकून पडलेले दिसले. त्याला बाहेर निघता येत नव्हते. ते घाबरलेले दिसत होते आणि त्याला होणाऱ्या वेदना सहन न होऊन ते केकाटत होते.

त्या अरुंद गल्लीच्या दोन्ही बाजूंना घराचे संडास होते आणि या संडासाचे मागचे दरवाजे रस्त्याकडे होते. हे छोटे छोटे दरवाजे रस्त्याच्या कडेला लागलेले असत यांपैकीच एका दरवाजाच्या फटीत हे पिल्लू अडकलेले होते. या दरवाजांना भंग्याखेरीज दुसरे कोणी हातदेखील लावत नसे. भंगी तर सकाळी एकदा येऊन संडास

साफ करून गेलेले होते. त्या दिवशी पुन्हा ते येणार नव्हते. त्या पिल्लाचे केकाटणे चालूच होते. आम्हांला अर्थातच पुढे जाववेना. आम्ही तिथे एका जागी खिळून राहिलेलो. कोठून कोण जाणे, इतर काही लोकही तिथे येऊन हजर झाले. पण ते आमच्याकडेच पाहात उभे राहिले. पुढे होऊन त्या पिल्लाची सुटका करावी असे एकाच्याही मनात येईना.

केतकरांनी हे सारे पाहिले. ते झटकन पुढे झाले. गटारावरून उडी मारून ते पलीकडे गेले आणि दरवाजा उघडून त्यांनी पिल्लाची सुटका केली. पिल्लू अजूनही ओरडतच होते; पण सुदैवाने त्याला फारशी दुखापत झालेली नव्हती. केतकरांनी त्याला शेजारच्या नळावर नेले, पाणी पाजले. त्याचे पंजे घाणीने माखलेले होते म्हणून ते चांगले धुतले आणि आपल्या हातरुमालाने पुसून काढले. पिल्लाचे केकाटणे थांबले होते. केतकरांनी त्याला एका ठिकाणी सावलीत नेऊन आडवे झोपवले. एवढे करून ते परत आले आणि माझ्याबरोबर चालू लागले.

इकडे लोकांची कुजबूज सुरू झाली—आमच्याबद्दल किळस आणि तिरस्कार! आम्हांला लोकांचे बोलणे ऐकू येत होते. त्या केकाटणाऱ्या पिल्लाबद्दल मात्र कुणाच्या तोंडून सहानुभूतीचा एक शब्दही बाहेर येत नव्हता!

आम्ही 'आशास्थाना'त राहायला आल्यानंतर कोणीतरी आम्हांला एक कुत्र्याचे पिल्लू आणून दिले. इतके काही गोंडस होते, की ते ठेवून घेण्याचा मोह आम्हांला आवरला नाही. ही कुत्री होती. तिचा रंग चिवडयासारखा असल्यामुळे आम्ही तिचे नाव ठेवले चिवी! ती लवकरच धष्टपुष्ट बनली आणि गुबगुबीत दिसू लागली. आमच्या सर्वांशीच, विशेषतः डॉक्टर केतकरांशी ती अतिशय इमानीपणे वागे. डॉ. केतकर संध्याकाळी काम संपवून घरी परत येताना रस्त्याच्या कोपऱ्यावर थोडा वेळ उभे राहात आणि दोन बोटे तोंडात घालून एक जोराची शीळ घालत. चिवीने इकडे कान टवकारलेलेच असायचे. शीळ ऐकू आली रे आली की चिवी विजेच्या चपळाईने झेप घेई आणि धावत धावत जाऊन त्यांच्या अंगावर उडी घेई. मग डॉक्टर तिला थोडा वेळ कुरवाळत उभे राहात. थोडया वेळाने पुन्हा दोघेही मजेत घरी येत.

पण आमच्या चिवीच्या बाबतीत दैव मात्र फार निष्ठूरपणे वागले. तिला कॅन्सरने गाठले. तपासण्यासाठी आणि औषधपाण्यासाठी डॉ. केतकर स्वतः तिला जनावरांच्या दवाखान्यात घेऊन गेले. पण तिचे दुखणे अधिकच विकोपाला गेले. शस्त्रक्रियेचाही

काही उपयोग झाला नाही. अखेर एक दिवस त्या भयंकर वेदनांतून तिची सुटका झाली. चिवी गेली आणि त्यांना अगदी सुने सुने वाटू लागले. चिवीसाठी ते त्यानंतर कितीतरी दिवस शोक करत होते.

यानंतरही आम्ही घरी अनेक कुत्री पाळली. एक लिली नावाची कुत्री, तिचा बच्चा ब्राउनी आणि तिचाच पणतू चॉकी! पुण्याच्या रस्त्यांतून अनेक बेवारशी कुत्री काही रोगांनी पछाडलेल्या अवस्थेत मोकाट हिंडताना दिसत. डॉक्टरांना नेहमी अशीच कुत्री आवडत. ते म्हणत, रस्त्यांतून मोकाट हिंडणारी ही कुत्री सामान्य माणसांप्रमाणे असतात. सरळ, साधीसुधी, प्रामाणिक आणि विश्वासू!

एकदा सुटीत काही दिवस आम्ही खडकवासल्याला इंजिनियरच्या बंगल्यात जाऊन मजेत राहिलो होतो. समोर खडकवासल्याचा सुप्रसिद्ध तलाव होता. एकंदर दृश्य अतिशय रमणीय दिसत होते. एक दिवस आम्ही काही मित्रांना तेथे बोलावले आणि छोटया मोटारलाँचमधून तलावात फेरफटका मारण्याचा कार्यक्रम आखला. लाँचमध्ये बसण्यासाठी आम्ही बंगल्यातून निघालो. या वेळी आम्ही ब्राउनीला बरोबर घेतला नाही. पण लाँच सुरू झाली आणि ब्राउनी धावत तेथे येऊन पोचला. काठावर तो क्षणभर उभा राहिला. आम्ही त्याला सोडून आलो यावर जणू त्याचा विश्वासच बसेना. पण आम्ही लाँचमधून जाताना त्याने पाहिले आणि धाड्दिशी पाण्यात उडी मारून तो आमच्या दिशेने पोहत येऊ लागला. डॉक्टर केतकरांना ते दृश्य पाहवेना. त्यांनी लाँचवाल्याला थोडे थांबून लाँच मागे घ्यायला सांगितले ब्राउनी धापा टाकत लाँचजवळ आला आणि त्याला आम्ही उचलून वर घेतले. तेव्हा ब्राउनीच्या डोळ्यांत अक्षरशः पाणी आले. डॉक्टर हा प्रसंग केव्हाच विसरले नाहीत.

नंतर आमचे हे मित्र एकामागून एक आम्हांला सोडून गेले. ब्राउनीला एका शेजाऱ्याने विष घातले. यानंतर अनेक वर्षे ब्राउनीच्या आठवणी आमच्या घरी निघत आणि प्रत्येक वेळी डॉक्टरांच्या भावना अनावर होत.

चॉकीला एक पिसाळलेला कुत्रा चावला व तो मेला. पशुवैद्याने चुकीची औषध-योजना केल्यामुळे लिलीला मृत्यू आला.

आता डॉक्टरांच्या मांजराची हकीगत सांगायला पाहिजे. हे पिल्लू आमच्या मुलीला असेच कुठेतरी सापडले; ते तिने घरी आणले. आम्ही ते पाळले आणि त्याचे नाव ठेवले 'बूझलम'! आम्हांला प्रथम वाटले, हे पिल्लू मादी जातीचे असेल. पण

नंतर तो बोका असल्याचे लक्षात आले. हा बोका पुढे चांगलाच पुष्ट झाला. आमचा पोस्टमन म्हणे, 'हा वाघ तुम्ही कशाला व्हरांड्यात ठेवलाय? मला तुमच्या घरी यायची भीतीच वाटते!'

बूझलम धष्टपुष्ट आणि उग्र दिसत होता तरी तो अतिशय मायाळू होता. आमच्या लिलीबरोबर तो एकाच थाळीत जेवत असे. लिली मेल्यानंतर बूझलमने कितीतरी दिवस अन्न वर्ज्य केले होते!

बूझलमची डॉक्टरांच्यावर फारच माया होती. ही माया मांजरापेक्षा कुत्र्यालाच जास्त शोभणारी होती. सायंकाळी डॉक्टर घरी यायच्या सुमाराला बूझलम अगोदर कोपऱ्यावर जाऊन बसे. डॉक्टर आले की त्यांच्या पायांना अंग घासत कितीतरी वेळ पायांत घोटाळायचा आणि मग त्यांना घरी घेऊन यायचा! रात्री तो डॉक्टरांच्या बिछान्यावरच त्यांच्या पायाशी अंगाचे वेटोळे करून झोपायचा.

आणि अखेर जेव्हा डॉक्टरांचा मृतदेह रुग्णालयातून घरी आणून ठेवला, तेव्हाही बूझलम उडी मारून नेहमीप्रमाणे त्यांच्या पायाशी जाऊन झोपला. त्याला काय माहीत, की नेहमीप्रमाणे या वेळी डॉक्टर उठणार नाहीत--त्यांनी आता चिरनिद्रा घेतलेली आहे!

अंत्ययात्रेची वेळ झाली तेव्हा बूझलमला उचलून बाजूला करावे लागले!



कॅन्सर–एक असाध्य रोग; मोटारलॉंच–यंत्रावर चालणारी छोटी नाव.



**अभ्यास :**

१. डॉ. केतकरांनी कुत्र्याच्या पिलाची सुटका कशी केली? दुसऱ्या कोणी ती का केली नसावी?
२. डॉ. केतकरांना सर्वसामान्यपणे कोणती कुत्री आवडत असत? का?
३. डॉक्टर केतकरांवरील आपले प्रेम चिवी कसे व्यक्त करत असे?
४. ब्राउनीच्या डोळ्यांत पाणी का आले?
५. खालील शब्दांचा अर्थ सांगून वाक्यांत उपयोग करा :
   वेदना, केकाटणे, सहानुभूती, चिरनिद्रा, अवस्था, फेरफटका.



४

# लहानपण दे गा देवा !



**अनंत काणेकर**

प्रा. अनंत काणेकर (जन्म : १९०५.) हे कवी व लघुनिबंधकार आहेत. 'चांदरात' हा कवितासंग्रह, 'पांढरी शिडे' हा लघुनिबंधसंग्रह इत्यादी त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. भारत सरकारने त्यांना 'पद्मश्री' ही पदवी देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला आहे.

मोठ्या माणसांना नेहमी लहान व्हावेसे वाटते आणि लहानांना मोठे व्हावेसे वाटते. साधुसंतही 'लहानपण दे गा देवा,' असे का म्हणतात ते काणेकरांनी पुढील लघुनिबंधात सांगितले आहे.

मोठी माणसं जेव्हा 'लहानपण दे गा देवा!' असं देवाला आळवत असतात, तेव्हा लहान मुलांना मोठी गंमत वाटत असेल. खरोखरच या मोठ्या माणसांना लहानपण हवं, का उगाच आपलं ही मोठी माणसं सोंग करताहेत असंच मुलांना वाटत असलं पाहिजे. स्वतःच्या अनुभवावरून मी हे सांगतो. मी लहान असताना 'रम्य ते बालपण। देई देवा फिरून....' किंवा 'लहानपण दे गा देवा' असं एखादया मोठ्या माणसाला बोलताना ऐकलं, की हा माणूस लबाड असला पाहिजे, असं मला वाटे. असं का वाटे, त्याचं कारण अगदी स्पष्ट होतं. मी लहान असताना मला लहानपण मुळीच हवंसं वाटत नसे. मला वाटतं, कुणाही लहान मुलाला 'नको हे लहानपण–केव्हा एकदा मी मोठा होईन,' असंच वाटत असलं पाहिजे. मोठ्या माणसांच्या खिशात हवे तेवढे पैसे असतात. त्यांना हवं ते खायला विकत घेता येतं. पाहिजेत ते कपडे बाजारातून आणता येतात. पाहिजे तेव्हा बाहेर फिरायला जाता येतं. जाऊ का म्हणून कुणाची परवानगी घ्यावी लागत नाही. न विचारता गेलं तरी कुणी रागावत नाही. कुणी कान पिरगाळत नाही, की कधी कुणाच्या छड्या खाव्या लागत नाहीत. साहजिकच केव्हा एकदा मी मोठा होईन असं मला वाटत असे.

मोठ्या माणसांची प्रत्येक गोष्ट पाहून, काय मजा आहे या मोठ्यांची, असं मला लहानपणी वाटत असे. मोठी माणसं आपल्यापेक्षा अधिक उंच असतात, याचाही लहानपणी मला हेवा वाटे. आपल्याला हवी असलेली एखादी वस्तू फळीवर किंवा उंच कुठंतरी खुंटीला असावी आणि एखाद्या मोठ्या माणसाला ती 'काढून द्या' म्हणून आपण सांगावं, 'आता नाही देत, मग देईन' म्हणून त्यानं दम भरावा, असं काही झालं की नको ते लहानपण असं मला होई; आणि 'मोठेपण लवकर एकदा दे गा देवा!' असं मी मनातल्या मनात म्हणत असे. एवढ्या–तेवढ्यासाठी लहानांना मोठ्यांच्या पुढं किती लाचार व्हावं लागतं! एकदा घरातल्या एका मोठ्या माणसानं मला चांगलं बडवून काढलं, तेव्हा रागावून मी त्याला म्हणालो, "थांब तू, तुझ्या-एवढा मोठा झालो की मीही तुला असाच मारीन!" माझे हे शब्द ऐकून तो मोठ्यानं हसू लागला, तेव्हा मी गोंधळून गेलो. तो म्हणाला, "अरे, पण तू माझ्याएवढा मोठा होशील तेव्हा मी तुझ्यापेक्षाही मोठा होईनच की!"

मी आपला वाढतच जाणार आणि तो मोठा माणूस मात्र आहे तेवढाच राहणार अशी माझी कल्पना! त्याच्या त्या उत्तरानं मी आणखीनच लहानपणाविरुद्ध मनातल्या मनात चरफडू लागलो.

या सर्व गोष्टींवरून कुणाच्याही लक्षात येईल, की लहानांना 'लहानपण दे गा देवा!' असं कधीच म्हणावंसं वाटणार नाही. उलट केव्हा एकदा देव आपणांला मोठेपण देईल असंच लहानांना वाटत असतं. 'लहानपण दे, लहानपण दे, ही ओरड मोठी माणसंच करत असतात. काय मजा आहे पाहा! लहानांना मोठं व्हावंसं वाटतं



आणि मोठयांना लहान व्हावंसं वाटतं! बरोबरच आहे. लहानपणी मोठेपणाचे फक्त फायदे दिसतात, तोटे दिसत नाहीत. लहानपणाचे जे फायदे त्या वेळी दिसत नव्हते ते मोठेपणी दिसू लागतात आणि लहानपणाचे तोटे किंवा लहानपणी झालेला त्रास माणूस विसरून जातो, असंही म्हणता येणार नाही. मोठी माणसं जेव्हा 'लहानपण हवं, लहानपण चांगलं' असं म्हणतात तेव्हा वर सांगितलेलं लहानपण नकोसं वाटू लागणाऱ्या गोष्टी ती माणसं विसरलेली असतात, असं मला वाटत नाही. त्यांना त्यांची पुरी आठवण असते. 'लहानपण दे गा देवा' असं ती म्हणतात तेव्हा मोठेपणी होणाऱ्या सर्व त्रासांना ती गांजून गेलेली असतात आणि त्यांना लहानपणाचे फायदे फक्त हवे असतात.

थोडक्यात सांगायचं म्हणजे मोठेपणाचे तोटे त्यांना नको असतात. 'लहानपण दे गा देवा' म्हणजे मोठेपणाचे फायदे जसेच्या तसे ठेवून देवानं त्यांना लहानपणाचेही सर्व फायदे दयावे अशी त्यांची देवाला प्रार्थना असते! पण देव कुणाचे कसले फाजील लाड करत नाही. 'लहानपण तुम्हांला हवं ना? मग करू तुम्हांला गुडघ्याइतकं ठेंगणं? गाडीत चढताना दुसऱ्या कुणीतरी उचलून ठेवावं लागेल, लवकर उठला नाही तर पाठीत धपाटा बसेल, विडी किंवा सिगरेट तोंडात घेतली तर थोबाडीत मिळेल. बोला, देऊ का खरोखरच तुम्हांला लहानपण?' असं देवानं या लोकांना खडसून विचारलं, तर ही मोठी माणसं, 'हो चालेल, दे आम्हांला लहानपण' असं देवाला म्हणतील का? मला नाही वाटत.

हे लहानपण त्यांना नको असतं. चैन तशीच चालू ठेवून, उदयाचा विचार करायला नको, पोटासाठी काम करायला नको, ना कसले श्रम, ना कसली चिंता ही लहानपणाची चैन त्यांना हवी असते. हे लहानपण देव कधी कुणाला देत नाही; आणि देत नाही तेच बरोबर आहे. ते मिळालं तर माणसाच्या कर्तृत्वाचा कारभारच आटोपेल. साधुसंत 'लहानपण दे गा देवा!' म्हणतात तेव्हा त्यांना हे लहानपण नको असतं. त्यांना लहान मुलांचं शुद्ध निर्मळ मन हवं असतं आणि हे लहानपण देव त्यांना भरपूर देतो.

**अभ्यास :**

१. लेखकाला लहानपण नकोसे का वाटत होते? लेखक त्यासाठी काय म्हणत असे?
२. मोठया माणसांना लहानपण का हवेसे वाटते?
३. देव साधुसंतांना लहानपण भरपूर देतो असे लेखक का म्हणतो?
४. हा पाठ वाचताना कुठेकुठे आपल्याला हसू येते? आपण या ठिकाणी का हसतो?
५. 'रम्य ते बालपण!' या विषयावर तुमच्या बालपणच्या दोन रम्य आठवणी लिहा.

५

# मानवी मन

**म. भा. भोसले**



**म. भा. भोसले (जन्म : १९१६.) यांचे 'गार सावली', 'अहेव लेणं' हे कथासंग्रह व 'उघडया जगात' ही कादंबरी इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत. ग्रामीण जीवनाबद्दल त्यांना विशेष जिव्हाळा वाटतो. 'मानवी मन' ही कथा त्यांच्या 'अहेव लेणं' या कथासंग्रहातून घेतली आहे.**

**या कथेत श्री. भोसले यांनी शेतकऱ्याच्या माणुसकीचे चित्र रेखाटले आहे.**

'नाही' हा शब्द दौलतने मोठ्या निर्धाराने उच्चारला. तो शब्द ऐकून तात्या कुलकर्ण्यांनी झटक्याने मान फिरवली अन ते रागाने चालते झाले.

ते तसे गेल्यावर मात्र दौलतच्या मनाला प्रश्न पडला—आपण केले हे बरोबर की चूक? तात्या कुलकर्णी गावातले वजनदार गृहस्थ होते. शिवाय आज ते दौलतचे मालकही होते. दौलतच्या घरात नदीचे पाणी शिरल्यावर तात्यांनी त्याला आपल्या जुन्या वाडयात राहायला जागा दिली होती. गेले पंधरा दिवस तो तिथे राहात होता. त्याच्या घरातली ओल पूर्ण सुकेपर्यंत म्हणजे आणखी महिना तरी त्याला त्यांच्या वाड्यात राहणे भाग होते. अशा स्थितीत ते आपल्याकडे येतात, मुलांना स्टेशनापर्यंत पोचवण्यासाठी गाडी जुंपायला विनवतात आणि आपण त्यांना 'नाही' म्हणतो हे बरोबर की चूक, हा विचार दौलतला सतावू लागला.

ते बरोबर होते अन चूकही होते!

आज बेंदराचा दिवस! बैलांच्या सणाचा दिवस! या दिवसाचे महत्व शेतकऱ्याशिवाय इतरांना कधीच कळायचे नाही. बारा महिने मातीत खपून मोती पिकवणाऱ्या बैलांची या दिवशी शेतकरी पूजा करतो. त्यांना गोडधोड खायला घालतो, रंगवतो, झुली घालतो आणि हौसेने त्यांची मिरवणूकही काढतो. वर्षातले तीनशे एकोणसाठ

दिवस खपून जगाला जगवणाऱ्या बैलांना फक्त आजचा एकच दिवस विसावा मिळत असतो; आणि अशा दिवशी तात्या येऊन म्हणत होते, "माझ्या मुलांना सिनेमा बघायला सांगलीला जायचंय, तेवढं त्यांना गाडीतून स्टेशनापर्यंत पोचव!"

कसे शक्य होते ते? जातिवंत शेतकरी बेंदराच्या सणाच्या दिवशी वेळ पडली तर स्वतः गाडी ओढील; पण बैलाला कधीही जुंपणार नाही. अर्थात आपण नाही म्हटले हे बरोबरच केले, असे दौलतला वाटले.

तो हौसेने बैलांना झुली घालून सजवायच्या कामाला लागला. त्याने चमकदार रंगाने बैलांची शिंगे रंगवली. त्यावर सोनेरी बेगडाच्या आडव्या पट्ट्या लावल्या. त्यांच्या कपाळावर आरशांची बाशिंगे बांधली. गळ्यांत फुलांच्या माळा घातल्या आणि अशा तऱ्हेने सुशोभित केलेल्या आपल्या बैलांकडे तो कौतुकाने पाहात राहिला. तात्या कुलकर्णी आपल्यावर रागावून गेले याची तर त्याला पुसट आठवणही राहिली नाही. त्याच वेळी त्याला कुणीतरी बातमी सांगितली, की बळी चव्हाणाला बैलाने मारले. जखम मोठी झाली!

हे ऐकताच त्याचे मन अस्वस्थ झाले.

बैलांच्या मिरवणुकीची वेळ होत आली होती. वाड्यापुढे वाजणारी सुरेल सनई त्याला स्पष्ट ऐकू येऊ लागली. बैलांना घेऊन जायची त्याची सगळी तयारी झाली होती. पण त्याचे त्याकडे लक्षच लागेना.

बळी याचा सगासोयरा नव्हता, भाऊबंद नव्हता, इष्टमित्र नव्हता. तो गावातला एक त्याच्यासारखा सामान्य शेतकरी होता.

बळीला पाहण्यासाठी दौलतचे मन अधीर झाले. त्याने शृंगारलेले बैल तिथेच सोडले. मिरवणुकीला उशीर झाला तरी हरकत नाही, असे त्याला वाटले. तो बळीला बघायला निघाला.

बळीला बघायला लोकांची गर्दी झाली होती; पण ती नुसती बघ्यांचीच गर्दी आहे असे दौलतला वाटले. प्रत्येक जण हळहळत होता. 'दवाखान्यात न्यायला पाहिजे, डॉक्टर बोलवायला पाहिजे' असे उद्गार प्रत्येकाच्या तोंडातून निघत होते; पण ते करायला एकही जात नव्हता. त्या गर्दीला बाजूला सारून दौलत बळीजवळ गेला. बळीच्या मांडीत शिंग घुसले होते. रक्तस्राव खूप झाला होता. फेट्याने त्याची मांडी आवळली होती, तरी अजून रक्त ठिपकत होतेच. रक्तस्रावाने बळीला मूर्च्छा आली होती. त्याची म्हातारी आरडत-ओरडत होती अन त्याचा भाऊ त्याला धरून बसला होता. अशा तऱ्हेने वेळ घालवणे म्हणजे बळीला मृत्यूच्या दाढेत लोटण्यासारखेच होते.

ते ध्यानात येताच दौलत बळीच्या भावाला म्हणाला, "असं बसून कसं भागणार? आताच्या आता डॉक्टर आणला पाहिजे, नाही तर याला मिरजेला नेला पाहिजे." असे बोलून दौलत घराकडे पळत आला. बेंदूर, मिरवणूक हे सगळे सगळे तो विसरला. लवकरात लवकर बळीला स्टेशनावर कसे पोचवावे ही एकच गोष्ट त्याच्या मनात थैमान घालू लागली.

बैलांच्या झुली काढण्यातसुद्धा वेळ दवडणे त्याला बरे वाटले नाही. झुलींसह तसेच बैल त्याने गाडीला जोडले. गाडी बळीच्या दारात नेली. गाडीत एक जेन टाकले आणि तिघाचौघांनी बळीला अलगद उचलून गाडीत घातले. गाडी स्टेशनाच्या रस्त्याला लागली.

स्टेशनापर्यंतचे अंतर भरारा कमी होत चालले. स्टेशन येईपर्यंत गाडी चुकेल की काय, ही एकच काळजी दौलतच्या जिवाला लागली होती. अखेर जेव्हा स्टेशन आले आणि गाडीला अवकाश आहे असे कळले, तेव्हा त्याचा जीव भांड्यात पडला.

मग सावकाश बळीला बैलगाडीतून उतरून स्टेशनात नेले. त्याच्याबरोबर मिरजेस जाण्यासाठी दोघातिघांची योजना झाली. तेवढ्यात स्टेशनात गाडीही आली. बळीला व्यवस्थितपणे गाडीत बसवले. गाडी निघून गेल्यानंतर दौलत स्टेशनाबाहेर पडून आपल्या गाडीजवळ आला आणि त्याने निवांतपणे पानाची चंची सोडली.

आता पान खाऊन तो परत निघणार होता. त्याने सुपारी कातरून तोंडात टाकली, तोच तात्या कुलकर्णी आपल्या गावाकडे पायी जाताना त्याला दिसले. त्यांना बोलवावे म्हणून तो चंची सावरत उठला. दोन पावले त्यांच्याकडे गेला आणि



त्याने हाक मारली, "तात्या, अहो तात्या!"

तात्यांनी वळून त्याच्याकडे पाहिले– निखाऱ्यासारख्या लाल डोळ्यांनी. ती नजर बघताच दौलत दचकला.

तात्यांनी विचारले, "काय?"

"केव्हासं आलासा?"

"कशाला हवी तुला नसती चौकशी? अन काय रे, आज बैलांचा सण आहे ना? गाडी जुंपायची नव्हती ना?" असे झटक्याने बोलून तात्या चालू लागले.

भांबावल्याप्रमाणे दौलतने क्षणभर त्यांच्याकडे पाहिले आणि मग तो परत आपल्या गाडीकडे वळला. त्याचे मन बेचैन झाले.

दौलतचे मन सारखे चुटपुटू लागले. तो घराकडे निघाला. पण त्याच्या मनाची चुटपूट, ती रुखरुख थांबली नाही.

घरी जाऊन त्याने गाडी सोडली. बैलांना तो नुकते दावे लावत होता तोच तेथे तात्या दत्त म्हणून हजर झाले. त्यांच्या त्या येण्याचा दौलतला अर्थ कळेना. त्याने चटकन दावे लावले. पुढे येऊन सोप्यात घोंगडे अंथरले आणि तो त्यांना म्हणाला, "या, बसा!"

पण तात्या अंगणात ताठ उभे राहिलेले! जणू एखादया झाडाचा बुंधा किंवा जुन्या वाडयाचा लाकडी खांबच जसा!

ते तिथूनच बोलले, "दौल्या, आजच्या आज तुझं सामान हालव इथून!"

दौलतच्या डोक्यात चक्क उजेड पडला! त्याच्या मनात आले–गाडी दिली नाही त्याचा सूड उगवायला आले काय हे? ठीक! तो म्हणाला, "पण तात्या, आणखी आठच दिवस थांबा. घर जरा वाळलं, की मी इथून जाईन!"

"आठ दिवस! एक दिवसही आता थांबणार नाही. आज–आता तुझं सामान बाहेर काढणार!"

"कारण?" दौलतच्या ओठांवर हा प्रश्न आला होता; पण त्याने तो बाहेर पडू दिला नाही. काही बोलावेसेच त्याला वाटेना. तो थोडा वेळ स्तब्ध राहिला आणि लगेच निर्धाराने म्हणाला, "ठीक आहे. हालवतो आजच सामान."

त्याने आपल्या बायकोला तशी सूचना दिली आणि तो स्वतःच घरातून एकेक सामान बाहेर काढू लागला.

तात्या पाहातच राहिले. त्यांना काय बोलावे किंवा काय करावे ते कळेना. असला प्रसंग येईल ही त्यांना कल्पनाच नव्हती. त्यांना फक्त दौलतला नमवायचे होते, गयावया

करायला, हातापाया पडायला लावायचे होते.

तात्यांना उभे राहिलेले पाहून दौलत म्हणाला, "आता का ताटकळत उभा ऱ्हायलाय? इथं बसा तरी, नाही तर जा तरी! आता दोन तासांच्या आत तुमचं घर रिकामं करतो!"

"घर रिकामं करशील रे! पण दौलत...."

तात्यांचा घसा घोगरा झाला. तो आवाज ऐकताच दौलतच्या मनाला नवल वाटले. त्याने तात्यांकडे निरखून पाहिले. डोळ्यांतले निखारे थंड झाले होते. त्यांनी विचारले,

"कुठं जाणार आता?"

"माझ्या घरात."

"पण तिथं ओल असेल. अजून गाळसुद्धा सुकला नसेल!"

"वहिवाट सुरू झाली म्हणजे आपोआपच वाळंल सगळं!"

"असा हटवादीपणा करण्यापेक्षा....! नरमाई दाखवलीस, विनवणी केलीस, हातापाया पडलास तर ते चांगलं नाही का होणार?"

"तात्या, आता मी बोललो तर तुम्हांला राग येईल. वाईट वाटेल. माझा नाइलाज आहे. विनवणी माणसाची करतात."

"अरे दौलत, मीही एक माणूसच आहे. तुझ्यापेक्षा शहाणा अन वेडाही! पण आज माझ्यावर कडी केलीस तू. बळीची जखम पाहताच तुझ्यातला माणूस जागा झाला. तू सगळ्या गावाची आज भलाई मिळवलीस."

तात्या पुढं झाले. दौलतचा त्यांनी हात धरला अन ते थरथरत बोलू लागले, "राहू दे ते सामान. असा तू इथून बाहेर पडलास तर मला बाहेर तोंड काढायला जागा राहणार नाही! मी तुला इथून हालू देणार नाही."

"तात्या, तात्या," गहिवरून दौलत बोलला, "तुम्हीच बोलताय का हे? तुम्हांला माणूस कसं म्हणावं? देव आहात तुम्ही!"

बेंदूर – पोळा; जेन – अंथरण्याकरता केवळ लाटून केलेले लोकरीचे मोठे बस्कर.

**अभ्यास :**

१. दौलतने तात्यांना बैलगाडी का नाकारली? २. दौलतला ताबडतोब घर सोडण्यास तात्यांनी का सांगितले? ३. "पण आज माझ्यावर कडी केलीस तू."—असे तात्या दौलतला उद्देशून का म्हणाले? ४. 'देव आहात तुम्ही!' असे दौलतने का म्हटले? ५. या गोष्टीत दौलत व तात्या यांची कोणती स्वभाववैशिष्ट्ये दिसतात? ६. या गोष्टीस दुसरे कोणते नाव दयाल?

६

# ऑलिंपिक वर्तुळांचा गोफ

बाळ ज. पंडित





बाळ ज. पंडित (जन्म : १९२९.) हे स्वतः उत्तम खेळाडू आहेत. क्रिकेट या खेळाविषयी त्यांना विशेष आवड आहे. त्यावर त्यांनी लेखनही केले आहे. त्यांची 'पहिले शतक', 'कुमारांचे खेळ', 'क्रिकेटमधील नवलकथा' ही व इतरही पुस्तके प्रसिद्ध आहेत. खेळांविषयीचा त्यांचा अभ्यासही चांगला असून खेळांचे समालोचन ते उत्तम प्रकारे करतात.

पुढील पाठात जागतिक क्रीडास्पर्धांसंबंधी त्यांनी माहिती दिली आहे.

ऑलिंपिक गावाकडे आमची मोटार भरधाव वेगाने जात होती. गर्दी प्रचंड असली तरी रहदारीला अडचण मुळीच नव्हती. येण्याजाण्यासाठी वेगवेगळे रस्ते होते. खेळांचे मैदान जवळ येऊ लागले, तसे आमचे डोळे समोरील क्षितिजाकडे लागले. खूपच उंच अशा स्तंभावर एक भला मोठा ध्वज फडफडत असलेला आम्हांला दिसला. ऑलिंपिक सामन्यांचे ते स्वतंत्र निशाण होते. ध्वजावरील पांढऱ्याशुभ्र पार्श्वभूमीवर लाल, पिवळ्या, निळ्या, हिरव्या व काळ्या रंगांची वर्तुळे एकमेकांत गुंफलेली होती. जणू पाच मित्रच हातांत हात घालून आपल्या मैत्रीची साक्ष जगाला देत होते! ही पाच वर्तुळे म्हणजे जगातील पाच खंड आणि त्यांची शुभ्रधवल पार्श्वभूमी म्हणजे विशाल अंतराळ. या ध्वजावर ऑलिंपिकचे ब्रीदवाक्य लिहिलेले आहे—'सिटियस, ऑल्टियस, फॉर्टियस.' म्हणजे गतिमानता, उच्चता, तेजस्विता. प्रत्येक खेळाडूने जास्तीत जास्त गतिमान होण्याचा प्रयत्न केला पाहिजे, अधिकाधिक उंची गाठण्याची शिकस्त केली पाहिजे आणि बलसंवर्धनासाठी जास्तीत जास्त श्रम केले पाहिजेत असा संदेश हा ध्वज खेळाडूंना देत असतो. या ध्वजस्तंभाजवळ एक स्फूर्तिदायक मशाल सतत तेवत असते.

ऑलिंपिक सामने म्हणजे क्रीडापटूंसाठी आणि क्रीडाशौकिनांसाठी एक पर्वणीच असते. पृथ्वीच्या पाठीवरील सर्व राष्ट्रांतील सुमारे पाच ते सहा हजार खेळाडू या सामन्यांमध्ये भाग घेतात. स्त्री–खेळाडूंचीही संख्या दोन हजारांच्या आसपास असते. प्रेक्षागारात सुमारे सत्तर ते ऐंशी हजार प्रेक्षक बसण्याची सोय असते. याशिवाय सुमारे पंचवीस हजार लोकांना हे सामने उभे राहून पाहता येतात. पोहण्याच्या शर्यतीसाठी चारपाच तलावही बांधलेले असतात.

खेळांचे विशाल मैदान, त्याभोवतालचे प्रचंड प्रेक्षागार, रहदारीसाठी मुद्दाम बांधलेल्या अनेक सडका, लोहमार्ग, पुरुष व स्त्री–खेळाडू यांच्या निवासासाठी बांधलेल्या असंख्य खोल्या असलेल्या इमारती, वसतिगृहे, प्रेक्षकांच्या श्रमपरिहारासाठी सुसज्ज अशी विशाल उपाहारगृहे–असे हे एक मोठे गावच असते! याला 'ऑलिंपिक व्हिलेज' असे म्हणतात. 'ऑलिंपिक व्हिलेज' वसवण्याची कल्पना इ. स. १९५६ मध्ये मेलबोर्न येथे सुचली. पहिले 'ऑलिंपिक व्हिलेज' तिथलेच. ऑलिंपिक सामने दर चार वर्षांनी होतात आणि दर चार वर्षांनी असलेच एक 'ऑलिंपिक व्हिलेज' सामन्यांच्या ठिकाणी वसवले जाते.

स्पर्धांत भाग घेणाऱ्या सर्व खेळाडूंच्या संचलनाने कार्यक्रमाला आरंभ होतो. खेळाडू आपापले गणवेश घालून आपल्या देशाच्या ध्वजामागे मोठ्या शिस्तीने लयबद्ध पावले टाकत जात असतात. सर्व जातिजमातींचे, विविध धर्मांचे, निरनिराळ्या देशांतील खेळाडू या सामन्यांत भाग घेतात. सामन्यांत भाग घेणाऱ्या देशांचे प्रतिनिधी–खेळाडू संचलनानंतर मैदानाच्या मध्यभागी जमतात व लवादासमोर शपथ घेतात, "आम्ही अशी शपथ घेतो, की केवळ श्रद्धापूर्वक भावनेनेच या चढाओढींत आम्ही भाग घेऊ. नियमांचे काटेकोरपणे पालन करू. चढाओढींत भाग घेताना स्पर्धाभावना, शिस्त व खिलाडूवृत्ती यांचे आम्ही जिवाभावाने पालन करू. सामन्यांत आम्ही जो भाग घेत आहोत तो आमच्या देशाचा मान राखण्यासाठी, तो वाढवण्यासाठी आणि क्रीडाप्रकारांची प्रतिष्ठा राखण्यासाठी." अशा मित्रत्वाच्या भावनेने या मैदानावर अनेक संघ परस्परांविरुद्ध खेळतात. त्यांच्या मनात द्वेषाला थारा नसतो. यशाचे शिखर गाठण्याची ईर्षा मात्र त्यांच्या मनात असते. इथे स्पर्धेचे, ईर्षेचे, शिस्तीचे, विश्वबंधुत्वाचे व सद्भावनेचे साम्राज्य असते.

प्राचीन काळी ग्रीस देशात ऑलिंपिक सामन्यांना फार महत्त्व होते. ऑलिंपिक पर्वतावर राहणाऱ्या देवादिकांबद्दल श्रद्धा व्यक्त करण्यासाठी हे सामने दर चार

वर्षांनी होत. हे सामने पाच दिवस चालत. इ. स. पूर्व ७७६ मध्ये हे सामने झाल्याची पहिली नोंद ग्रीस देशाच्या इतिहासात सापडते. त्या वेळी स्पर्धेत यशस्वी होणाऱ्या खेळाडूंचा ऑलिव्ह वृक्षाच्या फांदीची माळ घालून गौरव करण्यात येत असे. ग्रीस देशातील अनेक शहरे परस्परांतील भेदभाव विसरून या यशस्वी स्पर्धकांचे प्रचंड स्वागत करत. या सामन्यांतील खेळाडूंना राष्ट्रीय सणासमारंभाच्या वेळी मानाचे स्थान मिळत असे. पुढे ग्रीक सत्तेचा ऱ्हास झाला आणि त्याबरोबर इ. स. पूर्वी ३९४ मध्ये हे सामने बंद पडले.

मैत्रीचा मंत्र सांगणाऱ्या या ऑलिंपिक सामन्यांची त्यानंतर इ. स. १८९४ साली आधुनिक जगाला आठवण झाली. त्या वर्षी फ्रान्स देशात एक 'ऑलिंपिक कॉंग्रेस' भरवण्यात आली होती. त्या कॉंग्रेसला अनेक राष्ट्रांचे प्रतिनिधी हजर होते. कुबरटीन नावाच्या फ्रेंच क्रीडातज्ज्ञाने या कॉंग्रेसमध्ये ऑलिंपिक सामन्यांचे पुनरुज्जीवन केले. शरीरसंपदा वाढवण्यासाठी, बलसंवर्धन करण्यासाठी आणि प्रामुख्याने देशादेशांतील मैत्री वाढून त्यांच्यांत मित्रत्वाची स्पर्धा व्हावी यासाठी प्राचीन ऑलिंपिक सामन्यांप्रमाणेच यापुढे आंतरराष्ट्रीय क्रीडास्पर्धा भरवाव्यात असे ठरले. १८९६ पासून ऑलिंपिक सामने दर चार वर्षांनी वेगवेगळ्या देशांत भरवले जातात. त्या निमित्ताने जगात सद्भावना, समता, मैत्री, विश्वबंधुत्व, शिस्त व ऐक्य या भावना वाढीस लागतात.

या सामन्यांत निरनिराळ्या एकवीस खेळांची तरतूद आहे. पुरुषांसाठी व स्त्रियांसाठी वेगवेगळे सामने होतात. या सामन्यांच्या व्यवस्थेसाठी एक आंतरराष्ट्रीय ऑलिंपिक समिती नेमली आहे. या स्पर्धांत भाग घेणाऱ्या प्रत्येक देशाचे एक ते तीन प्रतिनिधी या समितीत असतात. या समितीमध्ये खेळांची व्यवस्था त्या त्या खेळांच्या आंतरराष्ट्रीय संघाकडे असते. ऑलिंपिक सामन्यांसाठी लागणारा खर्च फारच मोठा असतो. हा सर्व पैसा स्पर्धक देश उभा करतात.

क्रीडेच्या क्षेत्रात जातिभेद नाही, धर्मभेद नाही की वर्णभेद नाही. येथे सर्वांना समान संधी मिळते. अमेरिकेतील जेसी ओवेन्स हा वंशाने आफ्रिकी खेळाडू. १९३६ मध्ये बर्लिनला झालेल्या ऑलिंपिक स्पर्धेत त्याने चार अजिंक्यपदे मिळवली. इतकेच नव्हे, तर त्या चारही बाबतींत त्याने नवे उच्चांक प्रस्थापित केले. अमेरिकेच्या यशाचा तो मोठा शिल्पकार ठरला. अमेरिकेनेच नव्हे, तर साऱ्या जगाने या खेळाडूचा त्या वेळी केवढा गौरव केला ! केवढे कौतुक केले ! ओवेन्सचा वर्ण, त्याचा देश हे सर्व विसरून साऱ्या जगाने त्याची प्रशंसा केली.

एमिल झेटोपेक हा झेकोस्लोव्हाकियाचा खेळाडू. १९२५ साली त्याने हेलसिंकीचे मैदान गाजवले. तेथे त्याने ५,००० मीटर धावणे व मॅरेथॉन या लांब पल्ल्याच्या शर्यतीत नवीन विक्रम केले व नवा इतिहास घडवला. जगातील एक 'मानवी रेल्वे इंजिन' अशी झेटोपेकने ख्याती मिळवली. यामुळे जगातील सर्व लोकांना झेटोपेक-बद्दल तर अभिमान वाटलाच पण त्याबरोबर झेकोस्लोव्हाकिया देशाबद्दलही त्यांच्या मनात आदर निर्माण झाला.

आफ्रिकेतील इथियोपियाचा अबेबे बिकिला या खेळाडूने तर अनवाणी पायाने मॅरेथॉन—लांब पल्ल्याची शर्यत—जिंकली! एवढे मोठे अंतर त्याने २ तास १५ मिनिटांत काटले. फॅनी बँकर्स या स्त्री-खेळाडूने तर १९४८ साली ऑलिंपिकचे मैदान दणाणून सोडले. १०० व २०० मीटरच्या शर्यतीत प्रथम क्रमांक मिळवला. भारताने हॉकीच्या स्पर्धेत अनेक वर्षे अजिंक्यपद टिकवले. सुप्रसिद्ध भारतीय हॉकी खेळाडू ध्यानचंद याचे नाव कित्येक वर्षे जगात सर्वांच्या जिभेवर नाचत होते.

ऑलिंपिकच्या मैदानावर खेळाडू खेळत असतात तेव्हा खेळाडूंना पराक्रमाचा व प्रयत्नवादाचा संदेश देणारा ध्वज डौलाने फडकत असतो. त्या ध्वजावरील पाच खंडांची पाच वर्तुळे समतेचा व विश्वबंधुत्वाचा संदेश जगाला देत असतात; तर त्याच्या शेजारीच क्षुद्र विचारांचा अंधकार घालवणारी ज्योत तेवत असते.



अभ्यास :

१. ऑलिंपिकच्या ध्वजावर कोणते ब्रीदवाक्य लिहिलेले असते? त्यातून खेळाडूंना कोणता संदेश मिळतो?
२. ऑलिंपिक ध्वजावरील निरनिराळी पाच वर्तुळे ही कशाची निदर्शक असतात?
३. ऑलिंपिक सामन्यातील स्पर्धक खेळण्यापूर्वी कोणती शपथ घेतात?
४. ऑलिंपिक सामन्यांची सुरुवात केव्हा व कुठे झाली? या सामन्यांना ऑलिंपिक हे नाव कसे प्राप्त झाले?
५. ऑलिंपिक सामन्यांचे पुनरुज्जीवन केव्हा झाले? ते कोणी केले?
६. ऑलिंपिक सामन्यांत अजिंक्यपदे मिळवणाऱ्या कोणत्या खेळाडूंची माहिती या पाठात आली आहे? त्यांनी कोणते विक्रम केले?
७. (अ) ऑलिंपिक सामन्यांत ज्या खेळांची तरतूद केली आहे त्यांची नावे, त्या प्रत्येक खेळाच्या बाबतीत प्रस्थापित झालेले उच्चांक यांची माहिती मिळवा.
(आ) भारतीय हॉकीसंघाने ऑलिंपिक सामन्यांत केलेल्या पराक्रमाची माहिती मिळवा.



७

# —आणि माणसांचा दिवस सुरू झाला

**रणजित देसाई**

रणजित देसाई (जन्म : १९२८.) यांनी विदयार्थिदशेतच लेखनाला प्रारंभ केला. 'स्वामी' आणि 'श्रीमान योगी' या कादंबऱ्या, 'जाण' आणि 'कणव' हे कथासंग्रह ही त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील कथा त्यांच्या 'कणव' या कथासंग्रहातून घेतली आहे.

या कथेत त्यांनी जंगलातील पशुपक्ष्यांच्या हालचालींचे कसे बारकाव्याने वर्णन केले आहे, ते पाहा.

वळवाच्या पावसाची सर जशी अचानक आली तशीच ती अचानक थांबली. वारा वाहू लागला. साऱ्या जंगलावर मातीचा सुगंध दरवळला. ढग विरळ होऊ लागले आणि बघता बघता पश्चिमेच्या डोंगरावर कललेल्या सूर्याचे किरण जंगलावर फाकले.

त्या पावसाच्या सरीने सारे जंगल हिरवेगार दिसत होते. संध्यांकाळची शेवटची पिवळी किरणे पानापानांतून चमकत होती. पक्षी आपापले कळप करून झाडाझाडांवर किलबिलाट करत होते. एखाददुसरा जंगलात राहिलेला प्रवासी पायवाटेने झपझप जंगलातून परतत होता. हळूहळू जंगलात शांतता पसरत होती.

जंगलात शांतता पसरली, तशा रानकोंबडया बाहेर पडल्या. गवतावर टोची मारत मारत त्या फिरू लागल्या. त्याच वेळी आपला पिसारा सावरत जाळीआडून मोर बाहेर आला. त्याच्या पाठोपाठ तीन लांडोरी चारपाच पिलांसह बाहेर पडल्या. तकाकणारी निळी छाती पुढे काढून आपले एक एक पिवळे पाऊल टाकत मोर ऐटीने पुढे सरकत होता. प्रत्येक पाऊल टाकत असताना तो मान वेळावून आजूबाजूला पाहात होता. लांडोरी व पिले त्याच्यामागून चरत जात होती. एका मोकळ्या जागेत मोर थबकला आणि क्षणात त्याने आपला पिसारा फुलवला. थर्रर्र असा आवाज करत तो पिसारा

त्याच्या अंगाबरोबर फिरत होता. सूर्यकिरण त्याच्या पिसाऱ्यावर ठरत नव्हते. अचानक मोर कशाने तरी थिरला. त्याचा पिसारा मिटला गेला. 'म्याओ'–असा आवाज काढून तो उडाला. पाठोपाठ लांडोरी फडफडल्या. त्याही जाळीत दिसेनाशा झाल्या, तेव्हा सूर्य मावळला होता.

जंगलावर हळूहळू रात्र पसरत होती. सारे जंगल शांत होते. जंगलाच्या पायथ्या-खालून जाणाऱ्या रस्त्यावरची रहदारी कमी होत होती. रस्त्यापलीकडल्या झाडीतून गेलेला नदीचा रुपेरी पट्टा नजरेत भरत होता. अंधार जसा पसरू लागला तसा एक, एक रातकिडा किरकिरू लागला. बघता बघता जंगलावर रात्र पडली आणि रात-किडयांचा अखंड नाद जंगलावर उमटू लागला. झाडाझाडांतून काजव्यांचे पुंजके चकाकू लागले. आकाशात चांदण्या चमकू लागल्या. चंद्र वर आला आणि सारे जंगल चांदण्यात न्हाऊन निघाले.

काही तरी खसफसले. पायवाटेने एक कोल्हा दबकत पुढे येत होता. क्षणाक्षणाला तो दबकत होता. जमीन हुंगत होता. आपले चिंचोळे तोंड उंचावून कसलातरी वास घेत तो पावले टाकत होता. पायाखाली काटकी जरी मोडली तरी तो भेदरत होता आणि फुगवलेली शेपटी क्षणात पायांत घालत होता. एके ठिकाणी तो कोल्हा थांबला. त्याने जागा हुंगली आणि आकाशाकडे तोंड करून 'हुं की हू हूं' असा दीर्घ आवाज केला. तो आवाज देत असताना त्याची मान वरखाली होत होती. तो आवाज क्षणभर जंगलावर रेंगाळला. कुठून तरी तसलाच आवाज आला. नदीकाठाने, शिवारातून तसलेच आवाज उठले. ते आवाज ऐकताच कोल्ह्याने आपली गती वाढवली. टिप्पूर चांदण्यात तो रस्त्यापर्यंत पोचला. थोडा वेळ थांबून त्याने कानोसा घेतला आणि चटकन रस्ता पार करून तो पलीकडच्या झाडीत घुसला.

दिवसभराच्या उन्हाच्या तावाने जंगलातल्या साऱ्या जनावरांचे प्राण तहानेने व्याकुळले होते. नदी हेच त्यांच्या पाण्याचे ठिकाण होते. रात्र होताच आपापल्या जागेतून एक एक जनावर जंगल उतरत होते. दिवसभर जाळीत बसून मोडलेली अंगे मोकळी करत ती पाण्यासाठी जात होती.

पावसाच्या थेंबांनी माती फुलली होती. तिच्या सुगंधाने वेडावलेला एक भला मोठा नाग 'फस्स' असा आवाज काढत त्या मातीत आपले अंग घोळवत होता. त्याचे पिवळे धमक अंग चंद्रकिरणांत चकाकत होते. क्षणाक्षणाला त्याच्या अंगाची हालचाल होत होती. मध्येच त्याने आपला फणा उभारला. त्याने आजूबाजूला नजर

टाकली. त्याची दृष्टी हिरवळीवर उडी मारणाऱ्या बेडकावर पडली. त्या बेडकाला पाहताच नागाने 'स् स्' असा आवाज केला आणि फणा मिटवून उभारलेले आपले मस्तक जमिनीला टेकले व जिभळ्या चाटत तो बेडकाच्या दिशेने सरपटू लागला. बेडकाला नागाची चाहूलही नव्हती. क्षणाक्षणाला बेडकातले व नागातले अंतर कमी होत होते. हिरवळीवर उड्या मारणाऱ्या बेडकाच्या ते ध्यानी आले तेव्हा फार उशीर झाला होता. बेडकाने एक जोराची उडी घेतली, असेल नसेल ते बळ खर्चून दुसरी झेप घेतली. पण तिसरी उडी तो घेऊ शकला नाही. ज्या जागी त्याची उडी पडली तिथेच तो पडून राहिला. पुढे येणाऱ्या नागाकडे तो थंड नजरेने पाहात होता. जवळच्या वडाच्या ढोलीतून याच वेळी एक मोठे घुबड बाहेर पडले. ते बाहेर येताच झाडावरची वाघळे चीत्कार करत चारी दिशांना उडाली आणि फांदीवर बसून अंग साफ करणाऱ्या घुबडाने 'घुर्क' असा आवाज केला. त्या आवाजासरशी नागाची गती एकदम थांबली. त्याने मागे वळून पाहिले आणि क्षणार्धात तो घाणेरीच्या जाळीत दिसेनासा झाला. नाग गेला तरी बराच वेळ बेडूक तिथेच पडून होता.

मध्यरात्र उलटून गेली होती. चंद्र जंगलावर आला होता. जंगलात डांगळ ओरडत



होते. दोन भेकरे येऊन उंबराच्या झाडाखाली पडलेल्या उंबरांवर ताव मारू लागली. निर्धास्तपणे उंबरे खात असताना अचानक ती दचकली. त्यांनी शेपट्या उभारल्या. ती गडबडीने पुढे सरकली आणि जंगलाच्या उतरणीवर ती दिसेनाशी झाली. थोड्याच वेळात त्यांच्या जागी एक डांगळ उड्या मारत आला. त्याचे लांबसडक तोंड, पसरलेली शिंगे, अंगावरचे काळे-पांढरे ठिपके चांदण्यात उठून दिसत होते. डांगळाने अचानक आपले कान ताठ केले. नाकपुड्या फुगवल्या आणि मान वर करून त्याने वास घेतला. त्याच्या टपोऱ्या डोळ्यांत भीती दिसत होती. त्याने 'मॅक' असा आवाज केला आणि त्याबरोबर सारा कळप पुढे धावला. थोडे अंतर कापताच त्यांची भीती कमी झाली आणि ती सावकाश जंगल उतरू लागली.

त्या उंबराखाली चितळांच्या पाठोपाठ जाळीतून तरस आले. त्यांच्या खुरट्या केसांतील ठिपके चांदण्यात धूसर दिसत होते. पुढच्या लांब व फेंगड्या पायांपेक्षा पाठीमागे त्यांचे पाय गिड्डे होते. खुरडत, फेंगडत चालत ते उंबर हुंगत होते. ज्या दिशेने ती चितळे गेली त्या दिशेने ते हुंगत जाऊ लागले.

चंद्र क्षितिजावर झुकला होता. हळूहळू विरळ धुके पसरत होते. जंगलात पसरलेल्या, धुरकट दिसणाऱ्या असंख्य पायवाटांपैकी एका पायवाटेने एक डुकराची मादी व पाचसहा पिले रेकत जंगल उतरत होती. पाण्यावर जाण्यासाठी ती अत्यंत आतुर झाली होती. वाटेत तोंडाला येईल ते चाफलत ती मादी दुडक्या चालीने पुढे जात होती. तिची पिले ओरडत तिला गाठण्याचा प्रयत्न करत पाठीमागून पळत होती.

सारी जनावरे रस्ता गाठीपर्यंत रमतगमत जात. पण जसजसा रस्ता जवळ येई, तसतसे त्यांचे पाय थबकत. ती अस्वस्थ होत. एक एक पाऊल उचलत, कानोसा घेत, झाडाच्या आडोशाने ती रस्ता गाठत. रस्त्याच्या कडेला काही क्षण थबकून कानोसा घेत. मग रस्त्याच्या पलीकडच्या झाडीतून जाणाऱ्या नदीच्या दिशेला पाहात आणि सर्व सुरक्षित वाटताच वेगाने रस्ता ओलांडून पलीकडच्या झाडीत दिसेनाशी होत. पाण्याकडे जाणारी ती जनावरे रस्ता पार करत असताना रस्त्याच्या कडेला चरणारे ससे मात्र गोंधळून इकडे तिकडे धावत.

कोल्हे, तरस बिचकत बिचकत रस्ता पार करून गेले. चितळांनी दोन उड्यांत रस्ता पार केला. डुकराची मादी बराच वेळ रस्ता निरखत जाळीत थांबली आणि मुसंडी मारून ती व तिची पिले रेषा ओढल्यासारखी सरळ रेषेत रस्ता ओलांडून पलीकडच्या झाडीत घुसली.

भल्या पहाटेपर्यंत सारी जनावरे नदीवर पाण्यात उतरली. अद्यापही जंगलात रमलेले एखादे जनावर गडबडीने पायवाटेने सरसरत जाई. तेवढीच जाग जंगलात राहिली होती.

अचानक नदीकाठावरून लागोपाठ दोन बार झाले.

त्या शांत वातावरणात ते बार केवढ्याने तरी घुमले! रातकिडे क्षणभर थांबले. साऱ्या रानावर स्तब्धता पसरली. त्या क्षणानंतर परत रातकिडे किरकिरू लागले. रस्त्यापलीकडच्या झाडात खसफसले आणि लांबरुंद रस्त्यावरून भेकरे, चितळे, डुकरे जंगलाकडे धावू लागली. कोल्हे सारखे मागे वळून पाहात पुढे धावत होते.

जंगलात खूप आत शिरेपर्यंत त्या जनावरांच्या जिवात जीव नव्हता. त्यांची ठिकाणे अद्यापही दूर होती. सूर्य किरणांनी त्यांना गाठायच्या आत त्यांना आपापली ठिकाणे गाठायची होती.

जंगलावरच्या टापूवर करवंदीच्या जाळ्यांतून चितळे विसावली. जाळीखाली पाय मोडून ती रवंथ करत बसली; तरी त्यांचे कान कानोसा घेतच होते. पानांतून ठिबकणारे धुक्याचे थेंब त्यांच्या अंगावर पडत होते. त्या थेंबांनी त्यांची अंगे शहारत होती. कोल्हे, तरस आपापल्या घळणींत होते. वाघळे झाडावर लटकली होती. घुबड वडाच्या ढोलीत शिरले होते. ससे बिळाबाहेर तोंड काढून समोरच्या गवतावर पडणाऱ्या दवाकडे पाहात होते. आकाशात चंद्र पांढरा पडला होता. साऱ्या जंगलावर पहाटेचा प्रकाश फाकत होता.

एका बोडक्या झाडावर उभे राहून एका रानकोंबड्याने आपला तुरा फुलवून बांग दिली. कुठूनतरी लाकूड तोडण्याचा 'खाट्खाट्' असा आवाज जंगलात उठू लागला. ....आणि तिथून माणसांचा दिवस सुरू झाला.

**अभ्यास :**

१. या कथेतील कालावधी कोणता? त्यातील प्रमुख टप्पे सांगा.

२. या पाठात निसर्गाची व प्राण्यांची अनेक वर्णने आहेत. त्यांपैकी कोणते वर्णन तुम्हांला अधिक सुंदर वाटते? का?

३. या कथेत मोराच्या सुंदर हालचालींचे अचूक वर्णन तुम्ही वाचले आहे. यासारखी डांगळ, कोल्हा, नाग व तरस यांच्या हालचालींची अचूक वर्णने करणारी तुम्हांला आवडणारी वाक्ये सांगा.

४. '—आणि तिथून माणसांचा दिवस सुरू झाला.' असे लेखकाने का म्हटले आहे?



८

# लोकमान्य टिळक



## आपटे गुरुजी

पांडुरंग श्रीधर आपटे (जन्म : १८८७, मृत्यू : १९५६.) हे 'आपटे गुरुजी' या नावाने परिचित आहेत. ते नासिक जिल्ह्यातील येवल्याच्या राष्ट्रीय शाळेचे प्रमुख होते. त्यांनी मुलांसाठी 'महात्मा गांधी-दर्शन' व इतर अनेक पुस्तके लिहिली आहेत.

पुढील उतारा त्यांच्या 'स्वराज्यमार्गदर्शक लोकमान्य टिळक' या पुस्तकातून घेतला आहे. त्यातून तुम्हांला टिळकांच्या स्वभावातील विविध पैलूंचे दर्शन घडेल.

लोकमान्य टिळक हे मध्यम उंचीचे, सावळया वर्णाचे होते. त्यांचे उन्नत कपाळ हे विशेष बुद्धिमत्तेचे निदर्शक होते. त्यांच्या छायाचित्रावरूनही त्यांच्या तेजस्वी स्वभावाची खात्री पटते. अगदी म्हातारपणी शरीर मधुमेहाने पोखरले गेले असताही त्यांच्या मनाचा उत्साह व त्यांची कर्तृत्वशक्ती कायम होती. ते एकदा कामाला लागले म्हणजे मधे विश्रांती न घेता बारा बारा तास काम करत. एकदा त्यांनी सलग छत्तीस तास काम करण्याचा विक्रम केला होता. त्यांच्याबरोबर काम करणारे लोक थकत अगर कंटाळत; पण त्यांची स्वतःची गिरणी अखंड चालू असे.

त्यांचा पोशाख चारचौघांसारखा अगदी साधा असे. कपडयाचा रंग, पोत, शिलाई यांकडे त्यांचे लक्ष कधीच जात नसे. बडेजाव, भपका ह्यांकडे ते लक्ष पुरवत नसत. खाण्याच्या पदार्थांतही त्यांनी आवडनावड अशी कधी ठेवली नाही. देहयात्रा चालण्याला अन्न लागते म्हणून ते खात इतकेच.

टिळकांचा विशेष गुण म्हणजे कळकळ. या कळकळीच्या पोटी त्यांचा प्रचंड पराक्रम जन्माला आला होता. कॉलेजात शिकत असताना आपल्या देशाची दुःस्थिती त्यांच्या ध्यानात आल्यावर व बुद्धिमान लोकांनी ती पालटण्याचा प्रयत्न केला पाहिजे

हे पटल्यावर, त्यांनी देशसेवेचे जे एकदा व्रत घेतले ते अखेरपर्यंत चालवले. हे व्रत चालवताना दारिद्र्य आले ते स्वीकारले व स्वजनांकडून अपमान झाला तोही गिळला. तुरुंगात जाण्याचा अनेकदा प्रसंग आला तरी ते डगमगले नाहीत. मित्रांचे मन मोडण्याचा प्रसंग आला त्यालाही मान तुकवली. ज्यांच्यावर त्वेषाने तुटून पडले त्यांच्याशी सहकार करण्याचा प्रसंग आला, तरी त्यालाही कबुली! कष्ट पडले, देहाचे हाल झाले, त्याची क्षिती बाळगली नाही. असे खडतर व्रत त्यांनी चाळीस वर्षे पाळले. हे करत असता त्यांनी अनेक माणसे जोडली.

द्रव्य हातात धरणे ते पाप समजत नसत. 'प्रपंची पाहिजे सुवर्ण' ही गोष्ट त्यांना पटली होती; तरी द्रव्याचा कचरा उपयोगापेक्षा जास्त जमवण्याचा त्यांनी हव्यास धरला नाही. 'केसरी' ने दिलेला पैसा लोकसेवेतच वर्षाच्या अखेरपर्यंत खर्च होत राही. पुढील वर्षाची तरतूद काय करायची हा प्रश्न त्यांना नेहमी पडे.

त्यांनी आपल्या मुलांवर प्रेम केले; पण लाड केले नाहीत. मुलांच्या शिक्षणाची अनेक प्रकारे काळजी वाहिली. मुलींनाही उत्तम शिक्षण दिले. वेळ सापडे तेव्हा ते स्वतः शिकवत. जेवताना टिळक अनेक विषयांची माहिती इतकी सांगत, की त्यामुळे त्यांना जेवण कमी जात असे. ही गोष्ट लक्षात येताच जेवताना काही प्रश्न विचारायचे नाहीत असे त्यांच्या मुलांनी ठरवून टाकले होते.

पत्नीशी त्यांची वागणूक जुन्या वळणात वाढलेल्या प्रेमळ पतीसारखी होती. जुनी माणसे आपल्या भावना बोलून दाखवत नसत. त्या त्यांच्या कृतीवरून प्रत्ययाला येत. सौ. सत्यभामाबाईंनी टिळकांची सेवा साध्वीपणाला शोभेशी केली व टिळकांनीही त्यांना कधी काही कमी पडू दिले नाही. टिळक तुरुंगात गेल्यावर बाई जवळजवळ तपस्विनीच बनल्या होत्या. कोणत्याही संकटात न डगमगणारे टिळक पत्नीच्या मृत्यूची बातमी ऐकून 'मी अगदी हादरून गेलो आहे. माझ्या जीविताचा एक भाग समाप्त झाला. दुसराही आता लवकरच समाप्त होईल.' असे त्यांनी एका पत्रात लिहिले आहे. हे सर्व पाहिले म्हणजे रामचरित्राची आठवण झाल्याशिवाय राहात नाही.

सार्वजनिक कार्यात त्यांना पुष्कळाशी झुंज घेण्याचे प्रसंग आले. त्यांच्या भावना तीव्र असल्यामुळे त्यांच्या लेखणीतून प्रसंगविशेषी कठोर शब्द निघून जात. पण प्रसंग संपला की एखाद्या निष्पाप बालकासारखे ते मृदू बनत. जी सरळ वागणूक हिंदी माणसाशी तीच परकीयांशी. ज्या थोड्या इंग्रजांशी त्यांचा संबंध आला, त्यांनी अशी साक्ष दिली आहे, की टिळकांसारखा सभ्य गृहस्थ क्वचितच सापडेल. 'केसरी'तून

ते जे हल्ले चढवत ते इंग्रज व्यक्तींवर कधीच नसत, तर इंग्रजी राज्यपद्धतीवर असत. व्यक्ती आणि संस्था ह्यांमधला फरक दृष्टिआड होऊ न देण्याला जी संयमशक्ती लागते ती त्यांनी दीर्घ प्रयत्नाने मिळवली होती.

टिळकांचे आयुष्य एकंदरीने मोठे यशस्वी झाले यात संशय नाही. विद्यार्थिदशेत त्यांनी शरीर कमावले व विद्यासाधन केले. विद्यासाधन करत असता आयुष्याची इतिकर्तव्यता काय आहे, हे बरोबर ओळखून त्याप्रमाणे पुढील जीवनक्रमाची त्यांनी आखणी केली. भावनेच्या भरात तरुण मनुष्य मोठाले मनोरथ रचतो; पण कृती करण्याचा प्रसंग आला की कच खातो. अशी स्थिती टिळकांची न होता संकल्पाप्रमाणे कृती करण्याचे त्यांना यश मिळाले. ज्या शिक्षणसंस्थेत ते शिरले तिला त्यांनी नावारूपाला आणले. पुढे मतभेद होऊन संस्था सोडण्याचा प्रसंग आल्यावरही जनता-शिक्षणाचे त्यांचे ध्येय सुटले नाही. शाळा सोडल्यावर त्यांनी छापखाना व वर्तनमापत्रे हाती घेतली आणि ती कल्पनातीत यशस्वी केली. त्यांच्या ह्यातीपर्यंत 'केसरी' हा आपल्या प्रभावाने अग्रेसरच राहिला.

मंडालेच्या तुरुंगात अगदी एकाकी असताना त्यांनी तेथील वेळेचा किती सदुपयोग केला! याच काळात त्यांनी 'गीतारहस्य' हा अमोल ग्रंथ लिहिला. जी पुस्तके त्यांनी लिहिली त्यांतील मतांबद्दल वाद झाले असले तरी त्यांतील अनेक गुणांची स्तुती परपक्षांकडूनही झाली. जनतेचे धुरीणत्व सुशिक्षितांनीच घेतले पाहिजे, ही गोष्ट त्यांना पटली होती. त्यांनी त्याप्रमाणे वागणूक ठेवून स्वीकारलेले धुरीणत्वही यशस्वी केले आणि ते लोकमान्य झाले.



इतिकर्तव्यता–सार्थकता; कर्तव्यपूर्ती. धुरीण–नेता.



**अभ्यास :**

१. टिळकांनी आपल्या आयुष्याचे ध्येय कोणते ठरवले होते? ते त्यांनी केव्हा निश्चित केले?
२. टिळकांचे आयुष्य मोठे यशस्वी झाले असे लेखक का म्हणतो?
३. पिता म्हणून त्यांनी कोणकोणती जबाबदारी पार पाडली?
४. पत्नीच्या मृत्यूनंतर त्यांनी कोणते उद्गार काढले? यावरून त्यांच्या स्वभावाचा कोणता विशेष दिसून येतो?
५. त्यांना जनतेने कोणती पदवी दिली होती? कशासाठी?
६. टिळकांच्या स्वभावातील विशेष गोष्टी सांगणारी वाक्ये शोधा व ती वहीत लिहून ठेवा.

९

# श्रावण

दुर्गा भागवत



दुर्गा भागवत (जन्म १९१०.) यांनी खेड्यापाड्यांत हिंडून तेथील लोककथा व लोकगीते यांचा संग्रह केला आहे. त्यावर त्यांनी अभ्यासपूर्ण लेखन केले आहे. 'लोकसाहित्याची रूपरेखा', 'ऋतुचक्र' इत्यादी त्यांची अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. शासनाने त्यांच्या 'ऋतुचक्र' या पुस्तकास पारितोषिक देऊन त्यांचा गौरव केला आहे. त्या पुस्तकातून 'श्रावण' हा उतारा घेतला आहे.

या उताऱ्यात त्यांनी 'श्रावणातील निसर्गा'चे चित्रण केले आहे.

श्रावणातल्या पावसाची आणि ढगांची मजा किती आणि कशी सांगावी ! सूर्यबिंब तर अगदी दिसत नाहीसे झाले आहे. जरा पाऊस थांबला आहे. वारा खूप सुटला आहे. ढग पांगताहेत आणि दूर जाता जाता त्यांचे रंग सरड्याप्रमाणे बदलताहेत. किती हे रंग ! पश्चिमेच्या क्षितिजाजवळ मोठे जांभळे ढग आकाशावर पसरलेल्या काळ्या काळ्या ढगांतून एकदम उसळी मारतात. मग ते पांगू लागतात आणि त्यांतून तांबूस जांभळे ढग निघतात. त्यांच्यांतून तांबडे ढग निघतात आणि मग लिंबी रंगाचे पिवळेजर्द ढग हसू लागतात. ते जरा फाकून एक सुंदर केशरी कडे जांभळ्या ढगांत लोळू लागते. पिवळा प्रकाश खुलतो. वातावरण उजळते. जवळजवळ अर्धा तास ही रंगपंचमी चालू असते आणि मग जांभळे ढग फिरून आक्रमण करून लाल पिवळ्या छटा दाखवतात आणि काळ्या धूसर ढगांचे पांघरूण घेऊन पावसाच्या सरीचे गाणे ऐकत ते झोपून जातात. काही क्षण ढगांचा गुलाबी आणि काळा रंग एकत्र होऊन एक भयाण छटा पश्चिमेला दिसू लागते. नुसता काळा रंग असा भयाण कधीच दिसत नाही. भारी उदास वाटते मला तो रंग पाहून. पण लवकरच रात्र होते आणि गडद काळोखाचे तरंग दाट होत होत सारे आकाश एका रंगाचे, काळे धूसर होते.

वीज चमकली की काळे, पांढरे ढग तेवढे अलग दिसतात. अंधाऱ्या वातावरणात जरासाही पांढरा रंग अधिकच पांढरा दिसतो. तसेच संध्याकाळी धुरकट वाटणारे ढगच आकाशाला पांढरेपणा देतात. एरवी आपल्या आजूबाजूला काळोख दिसला तरी आकाशातला उजाळा मंद का होईना टिकूनच असतो.

सकाळ झाली तरी पूर्वेला गुलाबी रंग आता नाचत नाहीत. पांढरेपणाचा उजाळाच तिथे दिसतो. रुप्याच्या रंगासारखे तेज ढगांतून कडाकडांनी धावत असते. सोनेरी मुलामा नेहमीप्रमाणे नसतोच. श्रावणातल्या झाकल्या सूर्याचा हा रुपेरी प्रकाश मला फार आवडतो.

एक दिवस दुपारची वेळ होती. श्रावणाचा मध्य होता तो. पावसाच्या सरी आल्या की झोडपल्याप्रमाणे येत होत्या. पण मध्ये तासच्यातास पावसावाचूनही जात होते. माध्यान्ह टळल्यामुळे सूर्य किंचित पश्चिमेकडे झुकला होता. पावसाची काळोखी जाऊन एकदम रुपेरी प्रकाशाची झळक दिसल्यामुळे मी वर पाहिले, तो काय? ढगांच्या आवरणाखाली दडलेल्या, मोत्यासारख्या सौम्य रंगाच्या सूर्याचे दर्शन मला झाले. पहिल्याने भुरकट रंगाचे ढग फाकले. बाजूला गडद निळ्याकाळ्या ढगांच्या राशी जमलेल्या होत्या. मग वाऱ्याच्या झुळकीने भुरकट ढग पांगू लागले. अधिकाधिक पारदर्शक होऊ लागले आणि मग मधेच आकाशाची पोकळी थोडी दिसू लागली. पहिल्याने धुरकट, मग निळी, मग अभ्रे आणि ऊन एक झाल्यामुळे हिरवी अशी ती लहानशी पोकळी दिसू लागली. बाकी आकाशावर ढग पसरले होते. पण सूर्यबिंबाच्या जवळच्या टीचभर जागेतच हे सारे खेळ होत होते. मग ती पोकळी मोठी होऊ लागली. ढग विरळ होत होते. अधिक पोपटी छटा तिथे नाचत होत्या. मग त्या पोपटी छटाही विरत गेल्या. शिंपलीसारखे रुपेरी सूर्यबिंब–त्याला सूर्याचे बिंब केवळ वाटोळ्या आकारावरून म्हणायचे. किरणांचा पसारा नाही. ते सुवर्णजाल नाही, काही नाही. तरी पण थिजल्यासारखी होऊन मंद झालेली, ती किरणे या श्रावणातल्या सूर्याला अपूर्व शोभा देत होती. अनिमिष नेत्रांनी तो रुपेरी सूर्य मी पाहात होते. जाईजुईच्या झेल्यासारखा हातात धरून त्याला हुंगावे असे वाटत होते. सूर्यबिंब इतके जवळचे, आपल्या आटोक्यातले, सौम्य आणि आनंददायक एरवी कधीच वाटत नाही. पावसाळ्यातले हे पांढरे सूर्यबिंब पाहणे हा माझा एक आवडीचा छंद आहे.

श्रावण म्हणजे हिरव्या रंगाचे मुक्त प्रदर्शन. आषाढात जोरजोराने पाऊस कोसळू लागला, की जे जे बीज धरणीत पडले असेल ते ते उगवून वर येते. कोवळ्या हिरवळीने पृथ्वीचे विशाल अंग तर झाकून जातेच; पण ते उघडेबोडके दगडही, त्यांच्या



आसपासच्या डबक्यात पाणी साचले, की हिरव्या गर्द शेवाळ्याची मखमल पांघरून बसतात. उन्हाळ्यात ढग नसल्यामुळे आकाश उंच उंच जाते. खाली धरणी उघडी पडते. झाडेही पुष्कळशी उघडीवाघडी असतात. हिरव्या रंगाची विशाल वस्त्रे एकावर एक लपेटून या सर्वांना उभे असलेले पाहिले, की खरोखर डोळ्यांचे पारणे फिटते. मऊ माती नटली तर नवल नाहीच, पण ही पाणथळे आणि कठीण काळे फत्तर! यांना मखमलीचे पांघरूण घेताना पाहिले, की मोठी मौज वाटते. श्रावणात खरोखर किती तृणे, वनस्पती उगवतात त्यांची काही गणती? पण या शेवाळ्याच्या गालिच्याची सर काही कुणाला नाही!

एवढा मोठा समुद्र, तोही आता काळेकबरे रूप टाकून आपल्या लाटांतून हिरवट छटांचे प्रदर्शन करतो आहे. सागराचा हा हिरवा रंग काही अलौकिकच असतो. शुभ्र फेसाने नटलेला हा हिरवा रंगच जणू पातळ होऊन नाचत असतो. मध्येच उन्हाची तिरीप लागली की रुप्याचा वर्ख त्या दाट पाण्याच्या पृष्ठावर बसल्यासारखा वाटतो.

घरासमोरची शिरीषाची झाडे गर्द नव्या पालवीने भरून गेली आहेत. वासंतिक पालवी उघडया झाडांवर फुलते, तर ही पालवी जुनी पाने जाऊन त्यांच्या जागी उमटते. किती फरक आहे या दोन ऋतूंतल्या पालवींच्या रंगात! एकाच झाडावर

हिरव्या रंगाच्या तीन-चार छटा दिसताहेत. एक दिवस या झाडाच्या खोडाच्या मोठ्या थोरल्या गाठीवर, मोठ्या फांदीला लागूनच काहीतरी फडफडताना दिसले. सारखे पंखासारखे हालत होते. पहिल्याने मला वाटले की पारव्याचे जोडपे आहे म्हणून. मग एकाच जागी दिवस दिवस कशी बसतील ? कुणी त्यांना मारत, टोचत कसे नाही ? आणि एक दिवस सकाळी उन्हाची तिरीप आली म्हणून दिसले. वडाची ती दोन पाने नव्याने त्या झाडावर उगवली होती. बांडगुळे आपण नेहमी पाहतो. वडापिंपळाची रोपे भिंतीतून उगवलेलीही पाहतो. पण झाडावर उगवताना दिसलेले हे नवलपरीचे बांडगूळ पाहून मला मोठे नवल वाटले.

आणि श्रावणाचा हा असा बहर पूर्ततेला येतो तो नव्या फुलांच्या आगमनाने. ग्रीष्मात झडलेली शिरीषांची फुले फिरून अधिक टपोरी होऊन झाडांवर दिसू लागतात आणि पारिजातकाच्या मोत्यांपोवळ्यांच्या राशींतून श्रावणाचे हसू फुटते.



धूसर – अस्पष्ट; आवरण – झाकण; पारदर्शक – ज्यातून आरपार दिसते ते; अनिमिष – एकटक; डोळ्याची पापणीही न लवता; अलौकिक – अपूर्व.

**अभ्यास :**

१. लेखिकेचा श्रावण महिन्यातील आवडीचा छंद कोणता ? २. श्रावणात ढगांच्या रंगांत कसकसा बदल होत जातो ? ३. 'श्रावण म्हणजे हिरव्या रंगाचे मुक्त प्रदर्शन' असे लेखिका का म्हणते ? ४. शिरीषाच्या झाडावर लेखिकेला एकदा कोणते नवल दिसले ? ५. पारिजातकाच्या फुलांबद्दल या पाठात काय म्हटले आहे ? का ? ६. खालील वाक्प्रचारांचा अर्थ स्पष्ट करा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा : सरड्याप्रमाणे रंग बदलणे, पारणे फिटणे, सर न येणे. ७. 'मला आवडणारा महिना' यावर एक छोटासा निबंध लिहा.

१०

# निसर्गाचा विलक्षण दीप

**वसंत कर्डिले**



**वसंत कर्डिले** (जन्म : १९४०.) यांचे 'विज्ञानछंद-मंडळ' हे पुस्तक प्रसिद्ध आहे. पुढील पाठात काजव्यासंबंधी शास्त्रीय माहिती त्यांनी मनोरंजक रीतीने सांगितली आहे.

अंधाऱ्या रात्री आसमंतात फिरणारे, क्षणात पेटणारे व क्षणात विझणारे निसर्गाचे दिवे पाहून आबालवृद्धांना कितीतरी मजा वाटते! मुले तर त्यांना पकडण्यासाठी त्यांच्यामागे किती जोरजोराने धावतात! मुलांना आकर्षित करणाऱ्या काजव्यांच्या प्रकाशाने मुलांइतकेच शास्त्रज्ञांना व कवींनासुद्धा गुंगवले आहे. एका कवीने म्हटले आहे—चंद्र उगवेपर्यंत काजवा चमकून जातो; परंतु एकदा सूर्योदय झाला की कोठला काजवा अन कोठला चंद्र!

प्राचीन ग्रीक व रोमन काळांत गुलाम काजवे पकडून आणून आपल्या मालकिणींना देत असत. मालकिणी काजव्यांच्या चमकत्या शेपट्या तोडून घेत. या काजव्यांच्या शेपट्या श्रीमंत स्त्रिया आपल्या हातांवर व केसांवर चिकटवून रात्रीच्या वेळी होणाऱ्या मोठमोठ्या समारंभाला जात असत. त्या शेपट्यांच्या प्रकाशामुळे त्यांचे शरीर चमचम चमकताना दिसे. अमेरिकेचा शोध लावून १५३२ साली जेव्हा स्पॅनिश खलाशी स्पेनला परत आले तेव्हा त्यांनी राणीला नजर करण्यासाठी वेस्ट इंडीज बेटांतील रहिवासी वापरत ते दिवेच आणले होते. हे दिवे म्हणजे दुसरे तिसरे काही नसून काजव्यांच्या शेपट्यांनी भरलेली मातीची भांडीच होती. जगातील काही मागासलेल्या जातींत अजूनही काजव्यांची देवांप्रमाणे पूजा केली जाते. काजव्यांचे थवे उडू लागले म्हणजे लवकरच उबदार हवा पडणार, असे उत्तर अमेरिकेतील काही लोक अजूनही समजतात. जपानमध्ये राजाच्या सन्मानार्थ त्याच्या राजवाड्याभोवती काजव्यांचे

थवेच्या थवे सोडले जातात. मोठ्या लोकांना त्यांच्या सन्मानार्थ काजव्यांनी भरलेल्या काचेच्या बाटल्या नजर केल्या जातात. बुकर टी वॉशिंग्टन या प्रसिद्ध समाज-सुधारकाने तर आपला शालेय अभ्यास काजव्यांच्या प्रकाशात केला!

अगदी प्राचीन कालापासून काजव्याच्या प्रकाशाचे गूढ उलगडण्यासाठी संशोधक झटत होते. त्यांचा असा विश्वास होता की काजव्यांच्या प्रकाशाचे गूढ उलगडले म्हणजे मानवी शरीरातील शक्तीचे गूढही सहज उलगडेल. काजव्याच्या प्रकाशा-संबंधीचा पहिला सिद्धान्त असा होता, की काजव्याच्या शरीरातच अग्नी भरलेला आहे व तोच त्याच्या त्वचेतून प्रकाशाच्या स्वरूपात बाहेर पडतो. प्राचीन काळी उष्णता, अग्नी व प्रकाश यांचे अतूट नाते सर्वश्रुत असल्याने अशी समजूत होणे सहज शक्य होते. पण लवकरच ही चूक उमजली; कारण काजवा हातात पकडला तर तो हाताला गरम न लागता इतर कीटकांप्रमाणे गार लागतो. आता शास्त्रज्ञ काजव्याच्या प्रकाशाला 'थंड प्रकाश' किंवा 'ल्यूमिनेसेन्स' असे म्हणतात. कारण हा प्रकाश निर्माण होताना तपमानात अतिशय सूक्ष्म फरक होतो.

काजव्याचा प्रकाश थंड आहे हे समजल्यानंतर शास्त्रज्ञ एक मनोरंजक प्रश्न सोडवण्याच्या मागे लागले. तो प्रश्न म्हणजे, 'काजवा मेल्यानंतर त्याचा प्रकाश नष्ट होतो काय?' या प्रश्नाचे उत्तर शोधणे सोपे असले तरी त्यात एक अडचण होतीच. सतराव्या शतकातील कोपनहेगन विद्यापीठातील शिक्षक थॉमस बालेलिन् याने म्हटले आहे—'वरील प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी मी काही काजवे पकडले ते माझ्या हातातून निसटून गेले आणि जाताना आपला प्रकाशही घेऊन गेले. काही यशस्वी प्रयोगांत दिसून आले, की काजव्याचा प्रकाश त्यांच्या शेपटांत असलेल्या पिवळसर, पांढरट पदार्थापासून निर्माण होतो. हा पदार्थ काजव्याच्या अंगातून बाहेर काढला तरी काही वेळ तो प्रकाशतो, परंतु त्यासाठी प्राणवायू मात्र आवश्यक असतो.'

काही वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. अमेरिकेतील मेरीलँड या प्रांतात बाल्टिमोर नावाच्या गावातील मुले उन्हाळा सुरू झाला, की काजवे पकडून ते बाटल्यांत अगर मडक्यांत भरण्याचा उद्योग सुरू करत. बाटल्या पॅकबंद करून प्रयोगशाळांकडे रवाना होत. मुले ज्यांच्याकडे काजवे पाठवत त्या संशोधकाचे नाव आहे विल्यम् मॅक्लेरॉय. ते अमेरिकेतील सुप्रसिद्ध जॉन हॉप्किन्स विद्यापीठात प्राध्यापक आहेत. अगदी लहानपणापासून काजवा का प्रकाशतो या कुतुहलाने त्यांना वेडे केले होते व या प्रश्नाची उकल करायचीच असा त्यांनी मनोमन निश्चय केला होता.

जून महिना सुरू झाला की शेकडो मुले विद्यापीठात येत. काजवे पकडण्यासाठी त्यांना जाळी दिली जात. कुरणांमधून व उद्यानांमधून जाळी लावून काजवे पकडले जात. मडकी व बाटल्या भरून त्या मॅक्लेरॉय यांच्या कार्यालयात पोचवल्या जात. काजव्यांच्या संख्येच्या प्रमाणात मुलांना पैसे पण मिळत. प्रयोगशाळेतील मदतनीस यंत्रांनी हे काजवे निर्जल करत. प्रयोगासाठी त्यांच्या शेपट्या बाजूला काढून ठेवत. निर्जल शेपट्यांचे पीठ करून ते पाण्यात मिसळण्यात येई. हे मिश्रण अंधारात चमकू लागे.

काजव्याविषयीच्या काही गोष्टी शंभर वर्षांपूर्वीही माहीत होत्या. उदाहरणार्थ, १८५५ साली एका शास्त्रज्ञाने असे सिद्ध केले होते, की काजव्याच्या शेपटीत




ल्युसिफेरिन व ल्यूसिफेरस ही दोन रसायने असतात. त्यांपैकी ल्यूसिफेरिन न तापता प्रकाशते, तर ल्यूसिफेरस ल्यूसिफेरिनला जलद प्रकाशण्यास साहाय्य करते.

या गोष्टी माहीत असल्याने मॅक्लेरॉयने प्रथम ल्यूसिफेरिन व ल्यूसिफेरस ही रसायने वेगळी केली. ही रसायने एकमेकांत मिसळण्यात आली तेव्हा त्यांच्यापासून काजव्याचा प्रकाश निर्माण झाला. काजव्याच्या शेपटीतील शिलकी गोष्टीचा शोध घेण्यात आला. तेव्हा तीत प्राणवायू, मॅग्नेशियम सल्फेट व एक विशिष्ट रसायन आढळून आले. यालाच त्याने 'एटीपी' हे नाव दिले. काजव्याच्या शेपटीतील सर्व पदार्थ काढून घेऊन त्यांचे निरनिराळ्या प्रकारे व निरनिराळ्या प्रमाणांत मिश्रण करण्यात आले. या दोघांत 'एटीपी' मिसळण्यात आले. काही मिश्रणे उत्कृष्ट प्रकाश देत होती तर

काहींपासून अजिबात प्रकाश मिळत नव्हता. मॅक्लेरायने निष्कर्ष काढला, की शेपटीतून बाहेर पडणाऱ्या प्रकाशाचे नियंत्रण 'एटीपी' हे रसायन करते.

सजीव काजव्याच्या शेपटीत वर उल्लेख केलेले सर्व पदार्थ असतात. 'एटीपी'च्या नियंत्रणाने काजवा प्रकाशतो किंवा विझतो; परंतु शेपटी सतत प्रकाशत का नाही? प्रकाशण्या–विझण्याची क्रिया इतकी झटपट कशी होते? यासाठी अधिक प्रयोग केले तेव्हा असे आढळले, की काजव्याच्या शरीरातील एक रसायन त्याला प्रकाशण्यास प्रतिबंध करते. जोपर्यंत ते रसायन प्रकाश देणाऱ्या रसायनास बांधून ठेवते तोपर्यंत काजवा चमकत नाही. काजवा चमकण्याच्या वेळी त्याच्या मज्जातंतूंमधून दुसऱ्या रसायनाला संदेश दिला जातो. ते रसायन बांधून ठेवणाऱ्या रसायनावर हल्ला करून प्रकाश देणाऱ्या रसायनाची मुक्तता करते व काजवा प्रकाशतो. काही वेळाने हल्ला थांबवण्याचा संदेश मज्जातंतूंमार्फत दिला जातो व काजवा विझतो. ही व्यवस्था अत्यंत निर्दोष व जलद असल्यामुळे डोळ्याची पापणी लवते न लवते तोच काजवा चमकतो आणि विझतो.

काजव्याचा प्रकाश हिरवा असतो. परंतु तो काचेच्या त्रिकोणी लोलकातून नेला तर हिरव्याच्या जोडीला तांबडा व पिवळा प्रकाशही दिसतो. या प्रकाशात उष्णतेचा मागमूसही नसतो.

जगात काजव्याच्या दोन हजारांवर जाती आहेत. काही जातींत नर-मादी उडू शकतात व प्रकाशतात. काही जातींत फक्त नरच उडू शकतात; तर काही जातींत फक्त माद्याच प्रकाशू शकतात. ज्या माद्यांना व त्यांच्या पिलांना पंख नसतात त्यांना प्रकाशमान किडे म्हणतात. काही जातींत काजवे थव्याथव्यांनी प्रकाशतात व विझतात. थायलंडमध्ये काजव्यांचे थवे झाडांवर बसून क्षणात प्रकाशतात व क्षणात विझतात.

**अभ्यास :**

१. काजव्यांचा कसकसा उपयोग केला जात होता?

२. काजवा का प्रकाशतो याबद्दल संशोधन कोणी केले? या संशोधनातून त्यांनी कोणता निष्कर्ष काढला?

३. स्पॅनिश खलाशांनी राणीला कशाची भेट नजर केली?

४. मेलेल्या काजव्यांच्या शेपट्यांतील प्रकाश मिळावा यासाठी कोणकोणते प्रयोग केले गेले?

५. काजव्यांबद्दल कोणती विशेष माहिती सांगितली आहे?

६. 'एटीपी' कशास म्हटले आहे? त्याचा काय उपयोग केला जातो?

७. भावार्थ, सन्मानार्थ हे शब्द ज्या वाक्यांत वापरलेले आढळतात त्या वाक्यांचे अर्थ लिहा.

११

# भाऊजींस पत्र

## आनंदीबाई जोशी



डॉ. आनंदीबाई जोशी (जन्म : १८६५, मृत्यू : १८८७.) इ. स. १८८६ सालची गोष्ट. त्या वेळी आपल्याकडील फार थोडे लोक शिकायला परदेशात जात असत. स्त्रिया तर क्वचितच जात. अशा काळात आनंदीबाई जोशी अमेरिकेत वैद्यकशास्त्राचा अभ्यास करण्यासाठी गेल्या. तेथे त्यांनी वैद्यकशास्त्रातील पदवी मिळवली.

अमेरिकेतून त्यांनी आपल्या दिरांना लिहिलेले पत्र पुढे दिले आहे. या पत्रातील विचार आजही किती तेजस्वी वाटतात, ते पाहा.

रोशेल, न्यू जेर्सी,
जानेवारी २–१८८६.

प्रिय भाऊजी यांस,

सा. न. वि. वि.

माझी कॉलेजातील कालक्रमणा संपण्याच्या बेतात आली आहे व येत्या मार्च महिन्यात माझा पदवी मिळविण्याचा इच्छित हेतू सिद्धीस जाईल अशी आशा आहे. हे लिहिण्याचे माझ्या मनात बरेच दिवस होते, परंतु वेळ मिळाला नाही.

आपण पूर्वी एकदा जो काही बेत केला होता, तो मला वाटते सुटला व सरकारी नोकरीची महत्वाकांक्षा तुमच्या मनात पूर्ण बिंबली. आता आपल्या मनोवृत्तीत जो हा बदल झाला, त्यासंबंधाने मला वाईट वाटल्यावाचून राहावत नाही. माझी चूक असेल, परंतु आपली शुभेच्छू वहिनी या नात्याने काही सूचना कराव्या म्हणून मी हे पत्र लिहीत आहे.

आपण जेव्हा एके ठिकाणी होतो, तेव्हाचे आपल्या मनातील विचार व शहाण-

पणाचे बोलणे, ही आपण विसरला की काय? स्वदेशाविषयी कळवळत असलेल्या अंतःकरणातील स्वतंत्रतेचे ते विचार कोठे गेले? मि. जेम्स यांच्या दयाळूपणाने जी एक उत्तम संधी आली होती, त्या वेळी माझेही मन हीच चूक करण्यास अतिशय प्रवृत्त झाले होते. परंतु सुदैवाने निराळयाच विचारांची स्फूर्ती माझ्या मनात झाली; तीमुळे माझ्या आयुष्यस्थितीचा क्रम अगदीच बदलून गेला. अशी एकदा वेळ होती, की तेव्हा पोस्ट खात्यातील नोकरीकरता मला लोकांची पायधरणी करणे भाग पडले होते. तीस रुपये दरमहाची एक चांगलीशी नोकरी मेहरबानीने व माझ्या योग्यतेप्रमाणे मला मिळत होती; परंतु निश्चयाने जेव्हा होय की नाही सांगण्याची वेळ येऊन पोहोचली, तेव्हा एवढया पगाराचे तरं काय, परंतु याच्यापेक्षा पाचपट अधिक दरमहाच्या नोकरीकरतादेखील आपली स्वतंत्रता विकण्यास माझे मन धजले नाही. परंतु त्यामुळे आता मला फक्त एकाच गोष्टीविषयी थोडे वाईट वाटते, की तेव्हा माझे उदाहरण दुसऱ्या पुष्कळ स्त्रियांस मिळून ज्या कित्येक नोकरीसाठी आज तडफडत आहेत, त्यांना नोकऱ्या मिळाल्या असत्या. तसे घडले नाही.

नोकरांपेक्षा नोकऱ्या जर अधिक आहेत तर मग तुम्ही अशी कुरकूर का करावी? ज्याच्या योगाने आपल्या देशाची सेवा करता येईल अशी कला, शास्त्र, व्यापार, अगर धंदा आपल्या मनातदेखील येत नाही काय? माझी पक्की खात्री आहे, की जे कदाकाळी आपणांस करता आले असते, ते आपण केले नाही याबद्दल पुढे आपणास वाईट वाटेल. माझी सगळी आशा तुम्हांवर व माझ्या भावावर होती व वयात आल्यावर एखादा व्यापार अगर धंदा करून, अंशतः तरी आपल्या हतभाग्य देशाची चाकरी कराल असे मला वाटत होते; परंतु व्यर्थ! तुमची सर्व महत्वाकांक्षा काय ती त्या रुपेरी बेडीविषयी! 'रुपेरी बेडीच' मी तिला म्हणते. होय. थोडक्याशा पैशाकरता आपले स्वातंत्र्य विकून त्यापासून कोणत्याही प्रकारची सुटका नसणे, ही कायदेशीर शृंखलाच आहे!

तुम्ही निराशेच्या इतके स्वाधीन व्हावे, याचे मला आश्चर्य वाटते. व्यवसाय करावयाचा हे ठरल्यास आपणांस पुष्कळ आयुष्य व संधी आहेच. शिक्षण हे आम्हांमध्ये ढोंग व खर्चाचे मात्र काम झाले आहे. मिळालेल्या शिक्षणाचा उपयोग करून दाखवणे, हे एक महत्वाचे काम आपल्या आर्यमातेने आपणांवर सोपविले आहे व या कामात आपण हयगय करीत गेलो तर आपण दोषी होऊ. अशा लोकांपासून प्रजेस काय उपयोग होणार?

गरीब रे गरीब बिचारा हिंदुस्थान! ही तुझी लेकरे शुद्धीवर येऊन त्यांच्या मनात योग्य अभिमान केव्हा जागृत होणार? आपली इच्छा, अभिमान व महत्त्वाकांक्षा ही सर्व दबून गेली आहेत. आपली हिंमत व चेतना ह्या तर अजिबात नाहीशा झाल्या आहेत....जर तुमच्या विचारात व पुढील बेतात काही फेरबदल झाला नसला व कोठेतरी एखादा लहानसा कारकून होण्याची इच्छाच असली; तर तुम्ही मला लिहा. परंतु मला अद्यापही वाटते, की तुम्ही आपल्या स्वतःचा अधिक चांगला उपयोग करावा व अधिक उपयोगी पडावे. मी उद्या फिलाडेल्फिया येथे परत जाणार; तर तुम्ही मला पत्र या पत्त्यावर येथे पाठवा.

कळावे, लोभ असावा, हे विज्ञापना.

आपली शुभेच्छु,
**वहिनी**

रोशेल, न्यू जेर्सी – अमेरिकेतील न्यू जेर्सी या राज्यातील रोशेल हे गाव.

**अभ्यास**

१. हे पत्र लिहिण्यामागील मुख्य उद्देश कोणता?
२. भाऊजींबद्दल आनंदीबाईंच्या कोणत्या अपेक्षा होत्या?
३. आनंदीबाईंना लिहिलेल्या पत्रात भाऊजींनी कशाची मागणी केली असावी? कशावरून?
४. खालील सामासिक शब्दांची फोड करा व त्यांचे अर्थ सांगा :
मनोवृत्ती, कालक्रमण, महत्त्वाकांक्षा, स्वदेश.
५. 'मला काय व्हावेसे वाटते?' यावर बारा-पंधरा ओळींचे एक पत्र तुमच्या भावास किंवा वहिनीस लिहा.







१२

# शाप आणि उःशाप

**ना. ग. गोरे**

**ना. ग. गोरे (जन्म : १९०७.) यांनी लिहिलेला 'मार्टिन् ल्यूथर किंग' हा पाठ तुम्ही सहावीच्या पुस्तकात वाचलाच आहे. श्री. गोरे यांनी लहान मुलांसाठी नाटुकलीही लिहिली आहेत. 'शाप आणि उःशाप' हे त्यांनी लिहिलेले चिमुकले नाटक आहे.**

**आपण दर वर्षी वनमहोत्सव साजरा करतो. हाच विषय महाभारतातील एका कथेच्या रूपाने लेखकाने कसा मांडला आहे, पाहा.**

## अंक पहिला

(पडदा वर जातो तेव्हा मेघांचा गडगडाट होऊन मग एक छानशी पावसाची सर पडून जाते. नंतर सुरेख पिवळे धमक ऊन पडते व आकाशात इंद्रधनुष्याचे तोरण दिसते. गंगेच्या तीरावरील वनातील एक मोकळी चराईची जागा, हिरवळीवर रानशेवंतीची वेलबुट्टी व त्यावर निळ्या आकाशाचा चांदवा असे दृश्य.

मैदानाच्या एका बाजूला एक प्रचंड वटवृक्ष दिसतो. त्याच्या अंगाला साग, ऐन, फणस असे वृक्ष हारीने उभे असून दुसऱ्या अंगाला आंबा, चाफा, जांभूळ इत्यादी वृक्ष जणू रांग लावून उभे आहेत.)

कोकिळ गात आहे—

कुहू कुहूऽऽ ही वेळ अमृताची ॥ ध्रु० ॥

निळ्या नभाची झरली माया
त्यात उन्हाची मिसळे किमया
त्यातुन प्रगटे हिरवी हसरी....
जादू वनदेवीची

येथ निवारा यक्षकिन्नरा
येथे चारा पशुपाखरा
इथे सावली शिणला त्याला....
सत्ता आनंदाची

**वटराज** : काय प्रधानजी, राज्याचा बंदोबस्त ठीक आहे ना ?

**प्रधान** : महाराजांच्या कृपेनं सर्व काही कुशल आहे. वृक्षराज्यातील सर्व प्रजाजन सुखात असून यंदा पाऊसपाणी उत्तम झाल्याकारणानं सगळीकडं आनंदीआनंद आहे. झाडंझुडपं, वेली, तृणं टवटवीत आणि जोरदार झाली आहेत. मात्र मंदाकिनीला यंदा महापूर आल्यानं आपले काही प्रजाजन पुरात वाहून गेले, ही दुःखाची गोष्ट!

**वटराज** : फार वाईट गोष्ट झाली!

**प्रधान** : पण महाराज, अशा घटना घडणारच. भूमीला आणि अखिल प्राणिजातीला पाणी लाभावं म्हणून आपण स्वर्गापर्यंत हात उंचावून ते खेचून खाली आणतो; पण कधी कधी आपलाच त्यामध्ये शेवट होतो!

**वटराज** : प्रधानजी, वृक्षकुलाचं हे व्रतच नाही का, की स्वतः तापावं पण इतरांच्यावर सावली धरावी. स्वतः भिजावं, इतरांना निवारा दयावा. स्वतः स्वर्गीय मेघ भूमीवर खेचून आणावे आणि कधी कधी त्यांत स्वतःची आहुती दयावी! चालायचंच! बरं, आपले पक्षी व प्राणिराज्याशी संबंध कसे आहेत ?

**प्रधान** : उत्तम आहेत. त्यात अजून तरी काहीही कटकटी नाहीत. त्यांपैकी अनेकांची घरं आपल्या राज्यात आहेत. महाराज, रखवालीचं खातं प्राणिराज्यातील फौजदार कुत्रे यांच्याकडं असून संदेशवाहनाचं खातं पक्षीराज्यातील संदेशवाहक कावळे यांच्याकडं—

('काव काव' शब्द येतो आणि महाराजांसमोर कावळे उतरतात.)

**प्रधान** : हे कावळे आलेच महाराज. त्यांच्या लगबगीवरून त्यांनी काहीतरी महत्वाची बातमी आणली असावी असं वाटतं. ऐकावं महाराज.

**कावळे** : घात झाला महाराज, घात झाला! (भीतीने पंख फडफडवीत उभा राहतो.)

**वटराज** : अहो, असं झालं तरी काय घाबरायला ?

**प्रधान** : तुम्ची घाबरगुंडी कशामुळं उडाली ? का कुठं भूतपिशाच पाहिलंत वाटेत ?

**कावळे** : भूतपिशाचाहून भयंकर, फार भयंकर अशी माणसं पाहिलीत मी!

**सगळे दरबारी :** (एकदम) भूतपिशाचाहून फार भयंकर माणसं पाहिलीत? आणि ती कुठं?

**कावळे :** धर्मराजाच्या राजवाड्यात.

**सगळे दरबारी :** कोण होती ती?

**कावळे :** वसुदेवपुत्र कृष्ण आणि कुंतीपुत्र पार्थ!

**प्रधान :** आम्हांला तुमच्या बोलण्याचा अर्थच समजत नाही. वसुदेवपुत्र कृष्ण आणि कुंतीपुत्र पार्थ यांना तुम्ही भूतपिशाचाहून भयंकर म्हणता याचा अर्थ आम्ही काय समजायचा?

**कावळे :** महाराज माझं म्हणणं पुरतेपणी ऐका आणि नंतर कोणाला काय म्हणायचं ते ठरवा. महाराजांचा संदेशवाहक म्हणून माझी आपण नेमणूक केलेली आहे. तेव्हा माझ्या डोळयांना जे जे दिसेल आणि कानांनं जे जे ऐकू येईल ते जसंच्या तसं महाराजांच्या पायाशी आणून सादर करायचं एवढंच मी जाणतो. या क्षणापर्यंत माझ्या हातून कधी कसूर झाली असली तर कान पकडावा महाराजानी.

**प्रधान :** नाही बाबा, तुझ्याकडून कसूर झालेली नाही. सांग आता तू काय पाहिलंस नि काय ऐकलंस ते.

**कावळे :** महाराज, काल सकाळी धर्मराजांच्या उद्यानातील कुंजामध्ये बसून कृष्ण आणि अर्जुन यांनी एक घोर निर्धार केला, तो मी ऐकला.

**महाराज :** असेल काहीतरी कौरवांबद्दलची गोष्ट. असंच ना मग? त्यामुळं एवढं गडबडून जाण्याचं काय कारण?

**कावळे :** कृष्णार्जुनांनी खांडववन जाळून भस्मसात करण्याचा निर्धार केला आहे, महाराज.

**महाराज व प्रधान :** काय? खांडववन जाळून भस्मसात करण्याचा निर्धार! इतका कठोर बेत त्यांनी करण्याचं कारण तरी काय? पांडवांचं व यदूचं काय घोडं मारलं खांडववनानं?

**कावळे :** महाराज, खांडववनात नागांची वस्ती आहे ना?

**महाराज :** होय आहे, मग? गेल्या पंचवीस पिढ्या ते खांडववनाच्या आश्रयानं राहात आहेत. पांडवांना तिथं राहायचं असेल तर त्यांचंही तिथं स्वागतच होईल. अशी वस्तुस्थिती असताना अशी राक्षसी प्रतिज्ञा कृष्णार्जुनांनी काय म्हणून करावी?

**कावळे :** महाराज, आपण सरळ, सीध्यासाध्या उदार मनाचे. पण पांडव तसे नाहीत.

त्यांना सर्व दूर आपली सत्ता स्थापायची आहे. नागांनी पांडवांचं प्रभुत्व मान्य केलं असतं तर त्यांना कदाचित जिवंत राहू देण्यास पांडव तयार झाले असते. पण नाग मानी आहेत. ते कोणाचं प्रभुत्व मानायला तयार नाहीत. म्हणून पांडवांनी ठरवलं, की नागांची मुख्य कुळं ज्या खांडववनात राहतात त्यालाच चौबाजूंनी घेरून ते पेटवून दयायचं, म्हणजे सगळाच प्रश्न निकालात निघेल. आणि तोदेखील कायमचा निकालात निघेल.

**प्रधान :** किती भयंकर कारस्थान आहे हे!

**महाराज :** केव्हा पार पाडायचा आहे हा क्रूर बेत? किती दिवसांनी?

**कावळे :** किती दिवसांनी? महाराज, काय सांगू मी तुम्हांला! या क्षणी, आपण बोलत आहोत ना, या क्षणी तिकडं खांडववन चहूंकडून पेटलेलं असेल. ते पाहा, मला जणू त्या ज्वाळा, आकाशाला भिडणारे ते धुरांचे लोट, इथूनच दिसताहेत. घात झाला महाराज, घात झाला!

(काव, काव—असा आर्त आवाज करत कावळा पश्चिमेकडे उड्डाण करतो.)

## अंक दुसरा

(पडदा वर जातो तेव्हा वणव्याचे दृश्य दिसते. मोठमोठे वृक्ष मशालींसारखे पेटलेले दिसतात. कोल्हे, हरणे, डुकरे सैरावैरा पळत सुटतात. नाग कुटुंबे मुलांना खांद्या-



डोक्यांवर घेऊन पळत असतात. रंगमंचाच्या पुढच्या बाजूला कृष्णार्जुन हातात धनुष्यबाण घेऊन नागांवर शरसंधान करत असतात. त्यांचे शिपाई 'ठोका, मारा, पकडा' असे ओरडत या बाजूकडून त्या बाजूकडे जातात, येतात. करुण किंकाळ्या ऐकू येतात.)

**अर्जुन :** कृष्णा, आपला बेत तर शंभर टक्के यशस्वी झाला. आता या खांडववनात आमचे शत्रू राहू शकणार नाहीत. हे सगळं वन आता आमचं, पांडवांचं होणार. इथं आम्ही शहरे बांधू, शेती करू, क्रीडा-मंच, उदयानं उभारू. आमची फत्ते झाली. नागांचा फडशा पडला. पांडवांचा पराक्रम सगळ्या जगाला दिसला. इतःपर, नाग, दस्यू, अनार्य, वनचर, गिरिचर कोणी कोणीसुद्धा पांडवांच्या सामर्थ्यासमोर उभं राहू शकणार नाही! हे माझं धनुष्य आणि हे माझे बाण—

(कोठून तरी ध्वनी येतो—'सगळ्यांचा संहार करतील. अगदी सगळ्यांचा! हाः हाः हाः हाः!')

**अर्जुन** (रागाने) **:** कोण बोललं ते? कोण अजून उर्मटपणानं माझ्यासमोर हसत आहे? कृष्णा, तुला कोणी दिसलं?

**कृष्ण :** या बाजूनं आवाज आल्यासारखा वाटला खरा.

**अर्जुन :** कोणाचा आवाज? अजून या वनात कोणी शत्रू दडून बसला आहे काय? कोणी असेल तर वीरासारखं पुढं या, हा अर्जुन तुमचा समाचार घेण्यास सिद्ध आहे.

(पडद्यामागून)

आम्ही स्वामी सर्व जगाचे!
विशाल तरु वा गवत बापुडे
वनराजा की हरिण छबुकडे
मानव अथवा वन्य माकडे
आम्ही मालक सर्वांचे
या धरणीवर जो जो मानव
देव म्हणा त्या अथवा दानव
हूण, नाग, शक नावे अभिनव
किंकर ते अमुचे!

(पडदा बाजूला सरतो आणि एक पेटलेला अर्जुनवृक्ष दृष्टीसमोर येतो. तो वृक्षच बोलू लागतो.)

**अर्जुनवृक्ष :** हे वीरा, आता तू खरोखरच जगज्जेता झालास, त्रिभुवनवीर ठरलास!

कारण तू केवळ नागांचा नव्हे, तर पशू, पक्षी, वृक्षवल्ली, सगळ्यांचा उच्छेद केलास! हाः हाः हाः! तू विजयानं धुंद होऊन विचारतो आहेस—'अर्जुन या वनात कोणी शत्रू दडून बसला असेल तर त्यानं पुढं यावं.' हाः, हाः, हाः, ! अरे या वनात आता दडून बसता येणार नाही! आता इथं थकलेला वाटसरू आपला शीण घालवण्यासाठी घटकाभर विसावणार नाही. गायीगुरं सावलीत बसून स्वस्थपणे रवंथ करणार नाहीत. आता इथं गुराख्यांचा पावा कधी ऐकू येणार नाही. करवंदं, जांभळं गोळा करण्यासाठी आलेल्या बालकांच्या आरोळ्यांनी रानाच्या अंगावर कधी रोमांच उठणार नाहीत. हा तुझा मित्र—वनमाळी म्हणतात ना याला? कुंजविहारी ना हा? हाः हाः हाः! यानं हे वनाचं स्मशान करण्यात तुला साहाय्य केलं! वा रे वा!

(कृष्ण आणि अर्जुन दोघेही एकमेकांकडे लज्जित होऊन पाहतात. त्यांच्या तोंडून शब्द फुटत नाहीत. शेवटी कृष्ण कसाबसा बोलतो.)

**कृष्ण** : हे प्राचीन वृक्षा, नागांचं पारिपत्य करण्यासाठी आम्हांला हा मार्ग पत्करावा लागला. तुमच्या आश्रयाला राहून ते आमच्यावर हल्ले करू लागले. आम्हांला त्रास देऊ लागले. या दुर्गम वनात पाठलाग करणं आम्हांला शक्य होईना. मग आम्ही तरी काय करावं? तुझ्या अंगाचा भडका होत असल्यामुळं तू क्रोधानं जे बोललास त्याची आम्ही तुला क्षमा करतो.

**अर्जुनवृक्ष** : हे कृष्णा, पाचशे वर्षं मी या जागी उभा राहून जग पाहतो आहे. नागांशी पांडवांचं भांडण होतं आणि नागांना युद्धात तुम्ही जेरीला आणू शकला नाहीत, हे मला माहीत होतं. पण त्यामुळं तुम्ही आपलं डोकं फिरवून घ्याल आणि सगळ्या खांडववनाचा दाह करण्याइतके आत्मघातकी ठराल याची कल्पना मला नव्हती. घरात मच्छरांचा त्रास होऊ लागला म्हणून घर पेटवून देणाऱ्या माणसाला शहाणं कोण म्हणेल? अर्जुन नगरवासी आहे. वनाचं माहात्म्य त्याच्या लक्षात कदाचित आलं नसेल; पण तू गोप, तुझ्या तरी ते लक्षात यायला हवं होतं. तुझ्या हातून ही घोडचूक घडली आणि परत मला क्षमा करण्याची भाषा वर करतोस? पण मी तुला क्षमा करणार नाही—

**अर्जुन** : (हसून) काय करणार आहेस रे झाडोऱ्या? म्हणे क्षमा करणार नाही!

**अर्जुनवृक्ष** : काय करणार आहे? शाप देणार आहे तुम्हां दोघांना.

**अर्जुन** : दे, दे शाप. कावळ्याच्या शापानं ढोर मरत नसतं.

(याच क्षणी कावळा कर्कश 'काव काव' करत आकाशात घिरट्या घालत राहतो आणि अर्जुनवृक्षामधून शापवाणी बाहेर पडते–)

**अर्जुनवृक्ष :** आमचा संहार करणाऱ्या तुम्हांला तुमच्या कुळांचेही संहार उघड्या डोळ्यांनी पाहावे लागतील आणि जे वन तुम्ही आज जाळून टाकलंत तेच तुमच्या घरा–नगरांनाही खाऊन टाकील........

**कृष्ण :** हे वृक्षराज! केवढी भयंकर शापवाणी उच्चारलीत आपण! आता आपणच उःशाप सांगा. आम्ही काय केलं म्हणजे आमच्यावरचं हे खडतर संकट टळेल?

**अर्जुनवृक्ष :** तुम्हांला मी दिलेला शाप आता फिरवता येणार नाही. पण तुमचे मुलगे, नातू, पणतू जेव्हा हे ओळखतील की वृक्षवल्लरींच्या सृष्टीवाचून आपण जगू शकणार नाही, तेव्हा स्मशानाचं पुन्हा नंदनवन बनेल.

(अर्जुनवृक्ष काडकन मध्येच मोडून रंगमंचावर तिरका कोसळतो. कृष्णार्जुन खाली माना घालून उभे राहतात.)

## अंक तिसरा

(गंगेच्या तीरावरील तेच वन. पहिल्या अंकातल्या घनदाट वनराजीऐवजी तेथे आता रखरखीत मैदान पसरलेले आहे. लांबवर सिमेंटची काड्याच्या पेटीसारखी घरे, एक धूर ओकणारी गिरणी व मैदानाच्या एका कडेला झोपडपट्टी आहे. मैदानात ज्या जागी पहिल्या अंकात वटराज उभा होता तेथे दोनतीन पारंब्यांवर कसेबसे उभे राहिलेले वडाचे जीर्ण झाड, त्याचा पार उलथलेला आणि झाडाच्या फांदीवर एक कावळा बसलेला दिसतो.)

**वड :** काय कावळे, काय विशेष बातमी? बाकी तुम्हांला बातमी तरी कशाला विचारायची म्हणा!

**कावळे :** असं का म्हणता?

**वड :** जग बुडायची वेळ आली! आमची अखेरी आली. आता कशाला चौकशा हव्यात रिकामटेकड्या?

**कावळे :** असं हताश होऊन कसं चालेल?

**वड :** हताश होऊन कसं चालेल! खरं आहे. पण असं पाहा, आमचं रूप काय होतं, वैभव केवढं होतं, कुळ केवढं मोठं होतं आणि आज आमची काय स्थिती आहे! वटराज होते तेव्हा तुमचे आजोबाच त्यांचे संदेशवाहक होते ना? तुमची ही तिसरी पिढी ना?

**कावळे :** हो तिसरीच. हजार वर्षांची एकेक पिढी आमच्या कावळ्यांची.

वड : आमचीदेखील पिढी दीर्घायुषीच. पण एवढया लांबलचक आयुष्याचा उपयोग काय? आमच्या दृष्टीला वैभवाची भरती कधी दिसलीच नाही. गेली तीन सहस्र वर्षं आमची लांडगेतोड चालू आहे. पूर्वीचं सारं सौंदर्य आता नष्ट झालं. पूर्वीच्या आम्रमंजिरी गेल्या, चंपक गेले. आता उरली नुसती घाण! रात्रंदिवस जीव गुदमरवणारी घाण....!

कावळे : असं झालंय खरं विपरीत. पण तरीदेखील....

वड : पुरे तुमचं पण आणि परंतु! वटराजांच्या बंधूंचं खांडववन पांडवांनी जाळलं तेव्हापासून आमचं नष्टचर्य जे सुरू झालं ते कधी संपलंय का?

कावळे : मानवानं वनाचा नाश केला त्याबरोबरच स्वतःचा नाश नाही का करून घेतला? जे खांडववन जाळून पांडवांनी आपली राजधानी वसवली त्या इंद्रप्रस्थाचं तरी काय मागं उरलं आहे? तिथं परत बाभळी–बोरींची झाडंच उगवली आहेत ना? आणि भरदिवसा भालू भटकतात ना?

वड : तुम्ही म्हणता ते खरं; पण आमच्या कुळाचं उच्चाटन झालं, निर्वंश झाला तो भरून का येणार आहे?

कावळे : असं बोलू नका. निर्वंश कसा होईल? तुम्ही आहातच की त्या थोर कुळातले.

वड : आम्ही आहोत! होय, या घटकेला तरी आहोत. कावळे, माझी काय अवस्था झालेली आहे हे ठाऊक असून कशाला असं बोलता तोंडदेखलं? अहो, मी आतून पोखरलो आहे. माझ्या बुंध्यावरची साल त्या दुष्ट माणसांनी तासून टाकली आहे. आणि एवढं पुरेसं नाही म्हणून की काय, माझ्याभोवती सगळीकडं चर खणून माझी पाळंमुळं तोडण्याचं काम चालू आहे. कावळे, मी आता चारदोन दिवसांहून अधिक काळ उभा राहू शकणार नाही. तीन पिढया तुम्ही आमच्या आश्रयानं राहिलात, तेव्हा तुम्हांला आधी सूचना दयावी असं वाटलं म्हणून सांगतो, की दुसऱ्या कुठं तरी आसरा शोधा. संपला तुमचा–आमचा ऋणानुबंध.

कावळे : नाही संपला. परत सुरू झाला, महाराज.

वड : महाराज! कोणी उच्चारला तो शब्द? कावळे, तुम्ही? आमची थट्टा करता आहात? तेवढंच बाकी राहिलं होतं!

कावळे : महाराज! आपल्या आश्रयाला आम्ही तीन पिढया राहिलो. आपल्या अन्नावर जगलो. आपल्याबरोबर सुख अनुभवलं, दुःख सोसलं. आपली थट्टा मी कशी करीन? पशुपक्षी, झाडंवेली यांच्याशी वैर करून आपल्याला वैभव मिळणार

नाही, हे मानवानं अनुभवानं जाणलं आहे. जिथं जाळलं तिथं तो आता शिंपणार आहे. तोडलं तिथं रुजवणार आहे. तो पाहा मानव येतो आहे—त्याच्या हाती कुदळ आहे. तो जलकुंभ घेऊन येत आहे. पुरुष, स्त्रिया, मुलं. ती पाहा आलीच सारी. ती हे वन पुन्हा वसवणार आहेत.

(मोठा जमाव मिरवणुकीने येतो आहे. प्रत्येकाच्या खांद्यावर कुदळ आहे, हातांत एकेक रोपाची कुंडी आहे. मिरवणूक वडाच्या पारापाशी थांबते. मग माणसं त्याच्या सभोवती कडे करतात. संघगीत सुरू होते.)

वृक्षराजी नगरवासी एकमेकां भूषण
वृक्षहीना धरति म्हणजे मानवाला दूषण
वाळवंटे फुलवु आम्ही डोंगरांना लेववू
हरित वस्त्रे शाद्वलांची, पाखरांना जोजवू
सृष्टिची बाळे अम्हांला एक ठायी नांदु द्या
एकमेळी खेळु द्या अन् एक पात्री जेवु द्या.

(कावळा आकाशात एकदम भरारी घेतो व म्हणतो—'उःशाप, उःशाप!' वडाला एकदम पालवी फुटते आणि पहिल्या अंकातील वनाचे दृश्य पुन्हा दिसू लागते. फरक एवढाच, की या वेळी मोकळ्या कुरणात माणसेही दिसतात.)

चांदवा – छत; कसूर होणे – हयगय होणे, चूक होणे.

अभ्यास :

१. वृक्षकुलांचे व्रत कोणते?
२. संदेशवाहक कावळे यांनी वटराजांना कोणती भयानक बातमी सांगितली?
३. पांडवांनी खांडववन का जाळून टाकले?
४. अर्जुनवृक्षाने कृष्णार्जुनाला कोणता शाप दिला?
५. अर्जुनवृक्ष आपली व्यथा व्यक्त करत असताना अर्जुन रागावतो तर कृष्ण लज्जित होतो, असे का?
६. 'मानवानं वनाचा नाश केला, त्याबरोबर स्वतःचाही नाश नाही का करून घेतला?' असे कावळे का म्हणतात?
७. अर्जुनवृक्षाने दिलेला उःशाप आज कसा खरा ठरत आहे?
८. (अ) खालील शब्दांचा वाक्यांत उपयोग करा : दुर्गम, आत्मघातकी, नष्टचर्य, ऋणानुबंध.
(आ) पुढील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा : घोडे मारणे, फत्ते होणे, फडशा पाडणे, समाचार घेणे, पारिपत्य करणे, नंदनवन होणे, लांडगेतोड करणे.

१३

# असा आमचा डोंगरगाव

बाबा मोहोड



बाबा मोहोड (जन्म : १९३०) हे कवी व कथाकार आहेत. यांची 'पाचोळा', 'ढगाआडचा चांदोबा' ही व इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. पुढील उतारा त्यांच्या 'लादेवरचे शिंपले' या कादंबरीतून घेतला आहे.

'डोंगरगाव' हे विदर्भातील एक चिमुकले गाव. पानशेतचे धरण फुटून पुण्यामध्ये जलप्रलय झाला ही बातमी कळताच डोंगरगावातील लोकांनी आपली सहानुभूती व प्रेम कसे व्यक्त केले, ते पाहा.

डोंगरगाव !—

हो, डोंगरगावच.

पण तसा डोंगराचा अगदीच कमी संबंध या गावाशी आहे. एखादया बाईने दूर उभे राहून आपल्या चिमण्या बाळाचे संरक्षण करावे तसा. गावाच्या पाठीशी हा डोंगर उभा आहे. एखादया भव्य पुरुषासारखा. सपाट, काळीशार जमीन, मुबलक पाणी व डेरेदार आम्रवृक्षांची घनदाट छाया असे या गावाचे वैभव आहे. हा डोंगर म्हणजे लहानशा गावाला एक वरदानच आहे. आणि याच कारणाने असेल कदाचित, डोंगरगावच्या कुणा आजोबा–पणजोबा–खापरपणजोबांनी गावाला पहिली हाक मारली असेल—'डोंगरगाव !'

जेमतेम हजारएक लोकवस्तीचा आमचा डोंगरगाव तसा गरीब आहे. सातपुडयाच्या पायथ्याशी वसला असल्यामुळे गाव निसर्गसौंदर्याने समृद्ध आहे. गावाभोवती आंब्याची चारपाच हजार डेरेदार झाडे आहेत. जमीन सुपीक आहे. मूठभर दाणे पेरले, की गाडीभर पदरात पडतील अशी. नवराबायको सकाळी कामाला लागले, की

सायंकाळपर्यंत डोंगरगावात विहीरसुद्धा तयार होऊ शकते. गावाला डाव्या कुशीत घेऊन गोड पाण्याची मेघा नदी वर्षभर वाहत असते. निसर्गाने डोंगरगावाला असे भरपूर दिले आहे; पण पोटापुरते. संग्रहासाठी मात्र डोंगरगावाजवळ कधीच नसते.

असा हा विदर्भाच्या अनेक गावांपैकी एक आमचा डोंगरगाव.

आमच्या डोंगरगावात वर्तमानपत्रही येते; पण रोज नाही. आठवड्यातून दोनदा. टपालवाला ते वर्तमानपत्र कुणाच्यातरी स्वाधीन करून मोकळा होतो आणि सायंकाळचा अंधार होईपर्यंत फिरत, भटकत ते आमच्या हातांत येऊन पडते.

आजही नेहमीच्या पद्धतीने ते वर्तमानपत्र माझ्या हातात पडले. पिंपळाच्या पारावर बसल्या बसल्या मी ते उघडले आणि वाचले. बापरे!....केवढी भयंकर बातमी होती त्यात!

....पुण्यास महापूर....अर्धेअधिक पुणे जलमय....लाखो निराधार....पानशेत धरण फुटले.

मी वर्तमानपत्र हातात घेऊन लगेच गावात फेरी मारली. पंधरा मिनिटांत अवघ्या डोंगरगावभर बातमी पसरली. मुलेमाणसे माझ्याभोवती गोळा झाली.

गावात सायंकाळी सभा झाली. मारुतीच्या ओटयावर सगळे गावकरी जमा झाले. कुणी मूठपसा धान्य आणले, कुणी जुने कपडे आणले. हां हां म्हणता गावाची मदत एके ठिकाणी गोळा झाली.

गावचा शंकरभाऊ म्हणाला, "हे कपळे तसे नेवू नोका."

"मंग कसे न्याचे?"

"माहया धंदा हाय ना तो! बस तर मंग. सकाय ते सारे कपळे मी धून देतो. हे कपळे पुन्यात जानार. कपळे सोच्छ नोको?"

"अरे,पन तू त बेमार हाय गा?"

"असलो म्हनून काय झालं? हे पंचाचं काम हाय. पंचाचं म्हंजेच देवाचं."

"पन तुले पैसे नाई भेटणार या कामाचे."

"अरे,तिकळे लोकाइचे घरं वाहत गेले आन् इकळे मले पैशाच्या गोष्टी सांगते? या डोंगरगावचा वठ्ठी आजून मेला नाई म्हनलं!"

या वेळी शंकरभाऊचा आवेश काही और होता! जणू अवघ्या डोंगरगावाला तो आव्हान देत होता. मग गंगाराम शिंपी पुढे झाला आणि म्हणाला, "आता ते समदे कपळे मले दया. रातभर मी ते शिवून ठेवतो."

झाले. त्या रात्री गंगाराम फाटक्या कपड्यांना ठिगळे लावत रात्रभर जागला. दुसऱ्या दिवशी दिवसभर शंकर ते कपडे मेधामाईच्या शुभ्र धारेत धूत राहिला.

दुसऱ्या दिवशी पुन्हा मारुतीच्या पारावर सभा झाली. गावचे म्हातारे आबा म्हणाले, "हे कपळे आन् पैसे तसे नोका पाठवू. आपल्या शेशाले पाठवा हे सामान घिऊन. त्यानं पुनं पायलं हाय. सायबलोकइ त्याले ओळखतेत."

आबा हे सारे माझ्याबद्दलच बोलत होते. मला हसू आले. आबांनी माझ्याबद्दल काय काय समजुती करून घेतल्या होत्या देवाला माहीत! मला सारी दुनिया ओळखते असा त्यांचा भोळा समज.

शेवटी आबा मला म्हणाले, "शेशा, तू नाई म्हनू नोको. हे गरिबाची मीठभाकर हाय. सुदाम्याचे पोहे हाय. देवाचा परसाद देवाजवळच निऊन देला पायजे. तुई तिथं ओयख हाय. आमी उम्रावतीच्या पल्याड काई पायलं नाही रे!"

आबांनी आपल्या खांद्यावरील शुभ्र दुपट्याचे एक टोक हातात धरले आणि सुरकुतलेले डोळे टिपले. मी आबांच्या जवळ गेलो आणि त्यांच्या पायावर डोके ठेवून म्हणालो, "आबा, जातो मी पुण्याला."



दुसऱ्या दिवशी मी पुण्याला जायला निघालो. धान्य विकून आलेले पैसे आणि कपड्यांचे गाठोडे सोबत घेतले. सारा डोंगरगाव मला निरोप देण्यासाठी शिवेपर्यंत आला होता.

एक म्हातारी म्हणाली, "तिथं कोणती का नदी हाय ना? त्या नदीत माहचं नारय टाकजो. आन् तिले म्हंजो, मायबाई, आता तरी किरपा कर."

शेवटी डोळ्यापर्यंत पदर ओढलेली सखूवहिनी म्हणाली, "शशिकांत भाऊजी, कुठं तरी माणसं मेली म्हंतात ना? तिच्ची माती माझ्यासाठी घिऊन येजा. मी तिले देवाजवय ठीन. रोज रोज तिची पुंजा करीन."

मी सर्वांचं म्हणणं ऐकून घेतलं आणि निघालो. इतक्यात पाठीमागून मुलांनी आवाज दिला, "शशीदा........"

"काय रे?"

"आमचा हा चेंडू घिऊन जा."

"कशाला?"

"वा रे शशीदा! पुन्याच्या पोराइचा चेंडू वाहत गेला नसंल का? मग त्यांना खेळायला चेंडू नको? हा चेंडू त्यायले दे आन् आमचा जयहिंद सांग."

प्रसंग अगदीच लहानसा होता; पण माझे हृदय त्यामुळे भरून आले. चेंडू तो केवढासा! पण त्याच्या पाठीमागचं हृदय? भावना? मुलं पुण्याची काय आणि डोंगरगावची काय! पृथ्वीवरील साऱ्या लहान मुलांच्या भावना त्या चेंडूभोवती गुंफल्या गेल्या आहेत, हेच खरं! माझ्या डोंगरगावच्या मुलांनी मला दिलेला तो चेंडू म्हणजे माझ्या हातात आलेली सर्वांत मौल्यवान वस्तू होती जणू!

मला निरोप देण्याचा थाटसुद्धा कमी नव्हता. डोंगरगावचा गजादा म्हणाला होता, "शशीदा, तुमी आता पुन्याला जानार आपल्या गावाचं पिरम घिऊन. पन आमी मुक्या मुक्या नाइ पाठवनार तुमाले. शिवेपावतर बँड वाजवू."

डोंगरगावच्या शिवेपर्यंत माझ्यासमोर गजादाचा बँड होता. कारण त्याच्या गावाच्या सद्भावनाच आज पाखरासारख्या दूर दूर चालल्या नव्हत्या का? खूप खूप दूर. त्याने पाहिले नाही इतक्या दूर. पुण्यापर्यंत!

शेवटी मी सर्वांचा निरोप घेतला. मी वळणावर दिसेनासा होईपर्यंत पाठीमागून सारखे आवाज येत होते. हात हालत होते.

....गाडी वेगात आली. बडनेरा....अकोला....शेगाव....एकामागून एक स्थानके

मागे पडत होती. सहजपणे माझे लक्ष कपड्यांच्या ढिगाऱ्याकडे गेले. किती व्यवस्थित होता तो! शंकरभाऊंचा, गंगादाचा हात लागला होता ना त्याला! वास्तविक या चिंध्या. पण त्या साऱ्या द्रौपदीच्या चिंध्या होत्या! सुभद्रेच्या भरजरी पातळाहूनदेखील भारी किमतीच्या!

मला आठवले....इकडे निघताना मी सखूवहिनीला विचारले होते, "वहिनी, इतकं फाटकं पातळ नेसतेस तू?"

"अं....जरा धडकं होतं ते तुमच्यासोबत दिलं. दुसऱ्याला चांगलं द्यावं. निभतील यानंही चार दिवस."

वास्तविक आमची सखूवहिनी म्हणजे काही श्रीमंत स्त्री नव्हती. मोलमजुरी हा तिचा धंदा. चारसहा आणे रोजी मिळवून कसेतरी पोट जाळायची. पण तिचे मन!–

गाडीच्या हेलकाव्याबरोबर मीही हेलकावत होतो. मानवाचे मूळ स्वरूप शुद्ध, सात्विक आणि पवित्र असल्याचा अनुभव घेत होतो.

कपळे–कपडे; नोका–नका; ओयख–ओळख; वठ्ठी–परीट.

**अभ्यास :**

१. शशीदादाला कोणती भयंकर बातमी वाचायला मिळाली?
२. ती भयंकर बातमी ऐकून डोंगरगावच्या लोकांनी काय केले?
३. पुण्यास शशीदादालाच का पाठवले? निरोप घेताना त्याच्या मनात कोणकोणते विचार आले?
४. लहानापासून तो थोरापर्यंत डोंगरगावचे सारेच लोक मदत करायला तयार होते, हे कशावरून दिसते?
५. स्वतःचे सुख विसरून दुसऱ्यांना सुख देण्याची तयारी आहे, असे दाखवणारी या पाठातील वाक्ये शोधा.
६. 'पृथ्वीवरील साऱ्या......हेच खरं!' या वाक्याचा अर्थ स्पष्ट करा.
७. 'आमचा गाव' यावर दहा-पंधरा ओळी लिहा.

१४

# देशोदेशींचे ज्ञानेश्वर

**श्री. म. माटे**



प्रा. श्री. म. माटे (जन्म : १८८६; मृत्यू : १९५७.) हे मराठीचे प्राध्यापक होते. 'उपेक्षितांचे अंतरंग', 'माणुसकीचा गहिवर' इत्यादी त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. सांगली येथे भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे ते अध्यक्ष होते.

आपण 'ज्ञानेश्वरी'चे कर्ते ज्ञानेश्वर यांना ओळखतो. इतर देशांतही त्यांच्यासारखे अलौकिक पुरुष होऊन गेले. या लेखात प्रा. माटे यांनी त्यांचा थोडक्यात परिचय करून दिला आहे.

पुण्याजवळ इंद्रायणीच्या काठी आळंदी गावात ज्ञानेश्वरांची समाधी आहे. या ज्ञानेश्वरांनी वयाच्या सोळाव्या वर्षी 'ज्ञानेश्वरी' नावाचा प्रख्यात ग्रंथ रचला. त्या ग्रंथातील विचार, भाषा व मांडणी ही उत्तम आहेत. इतक्या लहान वयात इतका मोठा आणि विद्वानाला शोभण्यासारखा ग्रंथ त्यांनी लिहिला, याचे सर्वांनाच नवल वाटते. आपल्या महाराष्ट्रातील लोकांना तर या गोष्टीचा मोठा अभिमान वाटतो आणि तो तसा वाटावा, हे अगदी योग्यच आहे.

काही लोकांना वाटते, की असा अलौकिक पुरुष फक्त आपल्या देशातच जन्माला आला; पण हा त्यांचा अभिमान बरोबर नाही. पृथ्वीवरील अनेक देशांतही अशी माणसे जन्मली आहेत. ज्ञानेश्वरांबद्दल आपल्याला पराकाष्ठेचा आदर असला पाहिजे. तसेच आपल्या ज्ञानेश्वरांबद्दल आपला आदर कायम राखून इतर देशांतल्या बुद्धिमान लोकांविषयीही आपल्याला आदर राखता आला पाहिजे. ज्ञानेश्वर म्हणजे अतिशय बुद्धिमान, अतिशय विद्वान. इतर देशांतही असे ज्ञानेश्वर होऊन गेले आहेत व आजही असतील.

तेराव्या शतकाच्या आरंभी इंग्लंडमध्ये रॉजर बेकन या नावाचा एक पुरुष होऊन गेला. त्या वेळी सर्व लोक ॲरिस्टॉटल या ग्रीक तत्वज्ञान्याची मते प्रमाण मानत

असत. रॉजर बेकन याने सतराव्या वर्षीच लोकांना पटवून दिले, की ॲरिस्टॉटलची मते चुकीची आहेत. तेव्हापासून माणसे जास्त चौकस बनू लागली व जुने ज्ञान सारेच्या सारे खरे आहे, असे मानण्याची पद्धती त्यांनी सोडली. रॉजर बेकन हा इंग्लंडमधील ज्ञानेश्वरच समजला पाहिजे.

गॅलिलिओ नावाचा एक मोठा शास्त्रज्ञ इटलीत सोळाव्या शतकात जन्माला आला. सोळा वर्षांचा असतानाच तो नवे नवे शोध लावू लागला. देवळातले लामणदिवे सारेच पाहतात. ते दिवे हालत असताना गॅलिलिओने पाहिले. दिव्याला झोका मिळाल्यावर तो दिवा किती वेळात किती अंतरावर जातो, हे त्याने पाहिले आणि या लहानशा मुलाने गतिशास्त्रातला नवा शोध लावला. पुढे या शोधाचा उपयोग शास्त्रज्ञांना केवढा तरी झाला !

यापूर्वी शेकडो लोकांनी लामणदिव्यांचे हे झोके रोज पाहिले होते; पण त्यावरून गतिशास्त्रातला एखादा शोध लावता येईल, हे त्यांना कधी सुचले नाही. फक्त ते गॅलिलिओ याला सुचले. या गॅलिलिओने पुढे खगोलशास्त्रात महत्त्वाचे शोध लावले. गॅलिलिओ हा इटलीचा ज्ञानेश्वरच.

केलविन हा इंग्रज बालकही असाच विद्वान होता. त्याचे वडील प्राध्यापक होते. केलविनचे वय पुरे दहा वर्षांचे असतानाच तो वडलांना कठीण कठीण उदाहरणे सोडवून दाखवत असे. एकदा एक अवघड उदाहरण त्याच्या वडलांनाही अडले. रात्री जेवल्यावर केलविन ते उदाहरण सोडवण्यात एकचित्त झाला होता. मध्यरात्रीच्या सुमारास माडीवरच्या आपल्या खोलीतून तो ओरडला, "सुटले ! उदाहरण सुटले !" वडील चटकन वर गेले व पाहतात तो दगडी पाटीवर उदाहरणाची रीत मुलाने लिहिलेली दिसली. बाराव्या वर्षी त्याने 'देवाचा संवाद' या लॅटिन पुस्तकाचे भाषांतर करून बक्षीस मिळवले. सोळाव्या वर्षी त्याने 'पृथ्वीचे स्वरूप' या विषयावर एक प्रबंध लिहिला. ज्ञानेश्वरांप्रमाणेच हादेखील फार थोर पुरुष म्हटला पाहिजे.

'बिनतारी संदेश' हे शब्द आता आपल्या सर्वांच्या ओळखीचे झाले आहेत. अमेरिकेत बोललेला शब्द आपल्याला आपल्या देशात ऐकायला येतो. खरोखरच ही केवढी किमया आहे! या दोन देशांत हजारो मैलांचे अंतर आहे ! पण तिकडे टेबलावर मारलेली टिचकी इकडे त्याच क्षणी ऐकू येते. प्रथम मार्कोनीने हा प्रयोग एक मैलाच्या अंतरावर करून पाहिला. नंतर तो इंग्लंडात आला आणि तेथून त्याने आपला संदेश यूरोपच्या भूमीवर एका पळात ऐकवला. इटली देशातील ज्या मार्कोनीने हा चमत्कार

करून दाखवला, तो ह्या शोध लावण्याच्या वेळी केवळ बावीस वर्षांचा होता! मार्कोनी हाही इटली देशाचा ज्ञानेश्वरच होय.

आणखी एक मौजेचे उदाहरण सांगतो. आर्थर यंग या मुलाचे कौतुक सृष्टीने असेच केले. तो दोन वर्षांचा झाला नाही तोच आपल्या बोबडया वाणीने भराभर वाचू लागला. सहाव्या वर्षी त्याने एक मोठे काव्यच पाठ म्हणून दाखवले; पण त्याच्याही आधी त्याने सगळे बायबल चौथ्या वर्षी वाचून दाखवले. सतरा-अठरा वर्षांचा असतानाच तो निरनिराळ्या बारा भाषा बोलू लागला. लॅटिन, ग्रीक या भाषा त्याच्या घरी पाणी भरू लागल्या. कुस्तीच्या हौद्यात उतरला म्हणजे तो भल्याभल्यांचा पराभव करू लागला. नामांकित वैद्य म्हणून त्याची कीर्ती झाली. गायनाच्या मैफलीत त्याचे सुस्वर गायन केव्हा सुरू होते त्याची लोक वाट पाहू लागले. आर्थर यंग ही सृष्टीची एक मोठी कलाकृती समजली पाहिजे. हाही एक ज्ञानेश्वरच.

न्यूटनने चौदा वर्षांचा असतानाच एक पाणघड्याळ व एक सावलीचे घड्याळ तयार केले. पांढऱ्या रंगात सात निरनिराळे रंग असतात हा शोध त्याने सतराव्या वर्षी लावला. गणितातले मोठे सिद्धान्त व गुरुत्वाकर्षणाचा नियम हे त्याने तेविसाव्या व चोविसाव्या वर्षी सिद्ध केले. ह्या न्यूटनसुद्धा इंग्लंडमधील एक ज्ञानेश्वरच समजला पाहिजे.

तात्पर्य हे, की आपल्या ज्ञानेश्वराप्रमाणेच देशोदेशी ज्ञानेश्वर झाले आहेत. या सर्व ज्ञानेश्वरांची ओळख आपण करून घेतली पाहिजे. आपल्या ज्ञानेश्वरांबद्दल आदर हवाच; पण या ज्ञानेश्वरांबद्दलही तितकाच आदर बाळगला पाहिजे.

भाषा पाणी भरू लागल्या--भाषा पूर्णपणे आत्मसात झाल्या, भाषांवर अलौकिक प्रभुत्व आले.

**अभ्यास :**

१. या पाठात सांगितलेले देशोदेशींचे ज्ञानेश्वर कोणते?
२. गॅलिलिओ, मार्कोनी व न्यूटन यांनी लावलेल्या काही मुख्य शोधांची माहिती सांगा.
३. पुढील शब्दांचे अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा : पराकाष्ठा, किमया, चौकस, विद्वत्ताप्रचुर, कलाकृती.
४. पांढऱ्या रंगात कोणकोणते सात रंग असतात? न्यूटनने ही गोष्ट कोणत्या साधनाने पटवून दिली याची माहिती मिळवा.
५. देशोदेशींच्या ज्ञानेश्वरांबद्दल आपण आदर का बाळगला पाहिजे?
६. श्री. यदुनाथ थत्ते यांनी लिहिलेले 'भारतीय वैज्ञानिक' हे पुस्तक मिळवून वाचा व त्यातील वैज्ञानिकांची माहिती थोडक्यात लिहून ठेवा.

१५

# नागा जगत

**जगद्याल बवेजा**



**जगद्याल बवेजा यांनी आसाम व नेफा राज्यांतील वन्य विभागांत प्रवास केला. या प्रवासाचे रसाळ वर्णन त्यांनी आपल्या इंग्रजी पुस्तकात केले आहे. या पुस्तकाचा मराठी अनुवाद प्रा. सु. का. जोशी यांनी 'हिमालयाच्या कुशीत' या नावाने केला आहे. त्यातून पुढील उतारा घेतला आहे.**

**आपल्या देशाच्या एका टोकास राहणाऱ्या नागा लोकांच्या जीवनासंबंधी तुम्हांला या पाठात कितीतरी नवीन माहिती मिळेल!**

२६ जानेवारी १९५९ रोजी कोहिमा येथे प्रजासत्ताक दिनाची कवायत पाहायला मी हजर होतो. अंगामी नागांच्या मुलखात मी आलो होतो. नागांच्या जीवनपद्धतीविषयी मी बरेच ऐकले होते आणि त्यांना भेटायला उत्सुक होतो.

बहुतेक नागा एकसारखे दिसतात. त्यांचा पोशाख आणि कपड्यांवरील नक्षीकाम यांमुळेच त्यांच्यातील फरक कळू शकतो. हे लोक निरनिराळ्या बोलभाषा बोलत असले तरी त्यांच्या रंगरूपांत खूपच साधर्म्य आहे. नागा ही नृत्यप्रेमी जमात आहे. मोकोकेचुंग येथे आओ, सेमा, संगतम यांनी केलेली पुष्कळ नागानृत्ये मी पाहिली होती. सपाट प्रदेशात मी अनेक नागानृत्ये पाहिली होती आणि त्यांतील नानाविधतेमुळे मी मंत्रमुग्ध झालो होतो. मोकोकेचुंग येथील नागांनीही हातांत भाले घेऊन नृत्य केले आणि मोठ्याने युद्धघोष केले. नागा स्त्रियांचा नाच मी पाहिला. कोहिमा येथेही सुंदर नागानृत्यांपैकी अंगामींनी सादर केलेली काही नृत्ये पाहण्याची दुर्लभ संधी मला लाभली.

कोहिमा येथे असताना 'आंतरराष्ट्रीय स्मशानभूमी' या स्थळाने माझे लक्ष वेधून घेतले. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी या भागात कामी आलेले अनेक देशांचे सैनिक या स्मशानभूमीत पुरले आहेत. या महायुद्धातील हालचाली ज्याने पाहिल्या होत्या,

असा एक वृद्ध अंगामी नागा माझ्याबरोबर त्या स्थळापर्यंत आला होता. जपान्यांशी लढत असताना कोहिमा येथे ज्यांनी आपले प्राण अर्पण केले, त्या जवानांच्या हृदयद्रावक कथा मी ऐकल्या. दिवंगत वीरांस मी श्रद्धांजली अर्पण केली आणि या कोरलेल्या ओळींप्रमाणे वागण्याचे मनातल्या मनात कबूल केले—

'जेव्हा आपण स्वगृही परताल,
तेव्हा आमची बहादुरी त्यांना कळवा
आणि सांगा—
त्यांच्या भवितव्यासाठी
आम्ही आमच्या प्राणांचे बलिदान केले.'

कोहिमा खेड्यासंबंधी काही अतिशय चटकदार लोककथा मला सांगण्यात आल्या. एका वृद्ध नागाने मला खेलसंबंधी हकीकत सांगितली. तो म्हणाला, "एके काळी आम्ही दूर अरण्यात राहत होतो. या जागेपासून फार फार दूर आमची घरं होती. खेड्यासाठी नवीन सोयीस्कर जागा निवडण्याकरिता एकदिवशी नागा लढवय्यांची एक तुकडी निघाली. ते या जागी आले आणि त्यांना ती जागा आवडली. त्यांनी इथं काही पानं पसरली आणि जागेवर खुणा केल्या. या ठिकाणी वस्ती करायचे त्यांनी ठरवले. आपली कुटुंबं आणायला ते गेले. जेव्हा जेव्हा आम्ही एखादी जागा निवडतो, तेव्हा तेव्हा आम्ही अशा खुणा करतो. अशानं ही जमीन काही लोकांनी निवडली असल्याचं दुसऱ्यांना कळू शकतं. इतर नागांही त्यास मान देतात."

नागांच्या विवाहविषयक चालीरीतींविषयी मनोरंजक हकीकत मला सांगितली गेली. दोन्ही पक्षांतील मंडळींनी लग्न निश्चित केले, की हातात भाला घेतलेला वधूचा धाकटा भाऊ तिच्याबरोबर वराच्या घरी जातो. मुलाच्या घरी विवाह साजरा होतो. वधूमूल्य देण्याची पद्धतही या मुलखात नसल्याचे मला कळले.

अंगामी हे हाडाचे शेतकरी आहेत. इतर बहुतेक जमाती टोळ्यांप्रमाणेच ते शेती करतात. उत्पन्नही उत्तम असते. पण टेकड्यांच्या अगदी माथ्याजवळ तालीची शेती करणे शक्य नसल्याचे खेडुतांनी मला सांगितले. इतर बहुतेक वन्य विभागातल्याप्रमाणे सर्व जमिनी खेड्याच्या मालकीच्या असतात आणि कोणताही भाग खेडायची खेडुतास मोकळीक असते. शेतीची अवजारे आणि घरगुती सामानसुमान हीच ते संपत्ती मानतात आणि वारसाहक्काने ती कनिष्ठ पुत्रास प्राप्त होते. अंगामीसुद्धा सुगीचा सण साजरा करतात, असे मला समजले. फेब्रुवारी महिन्यात साजरा होणारा 'सेकेन्यपूजा' हा

अंगामींचा सर्वांत मोठा उत्सव. या प्रसंगी खेडयांतील मुले झकपक कपडे घालतात. शेतात नाचायच्या वेळी ते कापडी टोपही घालतात. या प्रसंगी परिधान करण्यात येणारा शेला फारच नक्षीदार असतो. त्याच्या विणकामास कित्येक महिने लागतात.

मी अंगामी नृत्य बघितले आहे. इतर नागांप्रमाणेच तेही हातांत भाले घेऊन नाचतात. सेमा नागांच्या नृत्यात हवेत उंच उंच उडया मारतात आणि अक्राळविक्राळ चेहरे करतात. त्या मानाने अंगामींच्या नृत्यात अधिक हळुवारपणा आढळतो. अंगामी युद्धघोषही सेमा किंवा आओ यांच्याइतके कर्कश नसतात. अंगामी संगीत गोंडस आणि मधुर असते. गीतेही बहुधा हळुवारपणेच गायिली जातात. कथानकातील आशयानुसार आपल्या आवाजावर नियंत्रण ठेवण्याचे विलक्षण कसबही त्यांच्यात आढळते. काही अंगामी गीते तर इतकी हळू म्हटली जातात, की काही वेळा थोडया अंतरावर असलेल्या माणसासही ती ऐकू येऊ शकत नाहीत. अंगामी मुली गाण्यात अधिक तरबेज दिसल्या. साधारणतः त्या वाद्ये वाजवत नाहीत. गायिकांच्या पाठीमागे उभे राहणाऱ्या काही व्यक्तींकडून आवश्यक ती सुरावट निर्माण केली जाते.

खेडुतांसमवेत मोठया मजेत मी काही तास घालवले. छायाचित्र घेण्यासाठी आणि लोकांशी गप्पागोष्टी करण्यासाठी मी खेडयांतूनही हिंडलो. कित्येक मुली त्यांच्या साध्यासुध्या मागावर आकर्षक अंगामी शाली विणत असलेल्या मला आढळल्या. आपले कपडे आपणच विणण्याच्या बाबतीत अंगामींचा कटाक्ष असतो.

कोहिमा-मणिपूर रस्त्यावर कोहिमापासून सुमारे दहा मैल असलेल्या खुजमा खेडयास जायला मी दुसऱ्या दिवशी निघालो. या खेड्यातील माझ्या भेटीची पूर्वसूचना मी गावप्रमुखास देऊन ठेवली होती. खेडयाच्या प्रवेशद्वारापाशीच तो मला भेटला आणि अंगामी पद्धतीने त्याने माझे स्वागत केले. त्याने हवेत उंच उडी मारून खास स्वागतपर आरोळी ठोकली. त्याचा परिचय नसला तरी माझ्याबरोबर असलेल्या अधिकाऱ्यांशी त्याची खूपच ओळख होती. मीसुद्धा उंच उडी मारली आणि अस्सल नागा पद्धतीत युद्धघोष केला. त्यामुळे खूष होऊन त्याने अतिशय आपुलकीने माझ्याशी हस्तांदोलन केले. प्रवेशद्वारावर हातात भाला घेतलेल्या नागा लढवय्याचे चित्र काढलेले होते. त्या प्रवेशद्वाराचे छायाचित्र मी घेतले.

त्यानंतर आम्ही खेड्यात फिरलो आणि पुष्कळशा झोपडयांसही भेटी दिल्या. मी त्यांच्या खोपटांस का भेट देत आहे हे न समजल्याने पुष्कळ मुले आणि मुली आमच्या मागोमाग येत होत्या. आम्ही शेतापर्यंत फिरत गेलो आणि विश्रांती घेत तेथे

बसलो. खेड्यातून काही गावकरी मंडळीही तेथे आली. त्यांच्याबरोबर गप्पा मारत आम्ही बसलो. खुजमा गीते ऐकायची उत्कंठा मला वाटत होती. नाच आणि गाणी यांसाठी हे सर्वोत्कृष्ट खेडे आहे असे मला समजले. मी एका मुलीला गाणे म्हणायला सांगितले. ती बरीच धीट होती. तिने मलाच प्रथम म्हणायला सांगितले. मी काही गायक नाही आणि येथे तर मला गाणे म्हणायची विनंती करण्यात आली होती. मला आठवत असलेल्या काही पर्शियन काव्यपंक्ती मी त्यांना म्हणून दाखवल्या. माझे गाणे त्यांना बरेच गमतीदार वाटले असावे. माझे गाणे म्हणून होईपर्यंत त्यांच्यापैकी सर्व स्तब्ध राहिले होते. त्यानंतर खेडुतांनी गाणी म्हणणारांचे छोटे छोटे गट केले आणि मला काही सुंदर अंगामी गीते ऐकायला मिळाली. वेळ भराभर निघून जात होता. काळोख पडू लागला होता. मी कोहिमाला परत जायचे ठरवले. गावप्रमुखाने अंगामी भाषेत निरोपादाखल भाषण केले. मी त्याला मोजक्या शब्दांत उत्तर दिले. मैत्री दृढ ठेवण्याचे आम्ही आश्वासन दिले आणि खास पठाणी पद्धतीने कडकडून भेटलो.

त्या विभागातील अनेक खेड्यांस मी भेटी दिल्या. प्रत्येक ठिकाणी लोक मला अगत्याने भेटले. माझे त्यांनी आदरातिथ्यही उत्तम केले. आपल्या भूमीशी एकनिष्ठ असणारे नागा हे अतिशय स्नेहशील आहेत. मात्र फसवणूक झाली किंवा गैरसमज केला की ते खूप कठोर होतात. गैरसमजाच्या वेळी तर ते फार लवकर संतापतात आणि मग मात्र मागेपुढे पाहत नाहीत. आओ, अंगामी, लोथा, सेमा, संगतम, चांग आणि इतर कितीतरी नागांना मी त्यांच्या निवासस्थानी भेटलो आहे. त्यांच्यात मिसळणे मला अगदी सहजसोपे वाटले. आपण मनमोकळेपणाने आणि मित्रत्वाने त्यांच्याजवळ गेलो, तर ते आपल्यावर मायाच करतात.

खेल – नागा खेड्यातील एक मोहल्ला किंवा आळी; पदन्यास – पावलांची मनोहर हालचाल; खेडणे – जमीन कसणे.

**अभ्यास :**

१. आंतरराष्ट्रीय स्मशानभूमी कोठे आहे? लेखकाचे लक्ष तिच्याकडे का वेधले गेले? तेथे कोरलेल्या त्या ओळींचा अर्थ काय? २. खुजमा खेड्याची कशाविषयी प्रसिद्धी होती? खुजमा खेड्यात लेखकास कोणकोणते गमतीचे अनुभव आले? ३. अंगामींचा सर्वांत मोठा उत्सव कोणता? तो ते कसा साजरा करतात? ४. नागांसंबंधी पंधरावीस ओळी लिहा. लिहिताना त्यांचे नृत्य, पोशाख, विवाहपद्धती, आतिथ्य व स्वभाव यांचा उल्लेख करा. ५. पुढील शब्दांचा वाक्यांत उपयोग करा : मंत्रमुग्ध, दुर्लभ, एकनिष्ठ, बलिदान.

१६

# माझे बालपण

## (बाबासाहेब आंबेडकर)

स. बा. हुदलीकर



प्रा. स. बा. हुदलीकर (जन्मः १८९०) हे जर्मन भाषेचे गाढे अभ्यासक असून त्या भाषेतील काही साहित्य त्यांनी मराठीत प्रकाशित केले आहे. 'शाळकरी मुले', 'बूबी' इत्यादी पुस्तके त्यांनी मुलांसाठी लिहिली आहेत. डॉ. आंबेडकर यांनी आपल्या बालपणातील काही आठवणी प्रा. हुदलीकर यांना सांगितल्या व त्यांनी त्या लिहून ठेवल्या त्या आठवणी या पाठात तुम्हांस वाचायला मिळतील.

डॉ. भी. रा. आंबेडकर हे भारतीय राज्यघटनेचे शिल्पकार होत. त्यांनी दलितांना सामाजिक प्रतिष्ठा मिळवून देण्यासाठी चळवळी केल्या व त्यांच्यात प्रचंड जागृती केली. डॉ. आंबेडकरांचे व्यक्तिमत्त्व कसे घडले याची कल्पना या पाठात येईल.

आमचे वडील शिक्षक होते. ईस्ट इंडिया कंपनी सरकारचा एक फार चांगला नियम होता. तो नियम म्हणजे कंपनी सरकारच्या सैन्यातील सैनिकांना सक्तीचे शिक्षण दिले जात असे व सैनिकांच्या मुलामुलींसाठी दिवसाच्या शाळा असून प्रौढ लोकांसाठी रात्रीच्या शाळा असत. प्रत्येक पलटणीसाठी स्वतंत्र शाळा असे. अशा एका शाळेमध्ये माझे वडील चौदा वर्षे मुख्याध्यापक होते. सैनिकांसाठी चांगले शिक्षक तयार करण्यासाठी पुण्यास एक 'नॉर्मल शाळा' होती. त्या नॉर्मल शाळेत शिकून माझ्या वडलांनी 'शिक्षकाचे प्रमाणपत्र' मिळवले होते. त्यांची शिकवण्याची पद्धत वाखाणण्यासारखी होती. आमच्या वडलांमध्ये शिक्षणाविषयी आवड व आस्था निर्माण झालेली होती. आमच्या घरातील बायकामुलांनासुद्धा उत्तम लिहिता–वाचता येत होते. इतकेच नव्हे तर वडलांच्या प्रोत्साहनाने पांडवप्रताप, रामायण यांसारखे ग्रंथ वाचून त्यांवर निरूपण करण्याची शक्तीही माझ्या थोरल्या बहिणीत आली होती.

आमच्या वडलांना गणिताचा फार नाद असे. गोखल्यांच्या अंकगणितातील

एकूण एक उदाहरणे त्यांनी स्वतः सोडवलीहोतीव चांगल्या सुबक अक्षरांत, एका मोठ्या वहीत ती सारी उतरून ठेवली होती. इच्छा ही, की ती वही मी वेळोवेळी चाळून पाहावी व गणित विषयात खूप हुशारी मिळवावी.

इंग्रजी शिक्षणासाठी पुढे मी मुंबईला आलो व 'मराठी हायस्कुलात' शिकू लागलो. पहिल्याने आमची घरची स्थिती बऱ्यापैकी होती; पण पुढे ती फारच हलाखीची झाली. माझ्या वडलांना थोडेसे पेन्शन होते. पण मुंबईची राहणी व मोठे कुटुंब यांमुळे मला लागतील ती पुस्तके आणून देणे व मला चांगले कपडेलत्ते करून देणे हे आमच्या वडलांच्या आटोक्याबाहेरचे असे. तरीपण झीज सोसून ते माझ्या सुखसोयींची तरतूद करण्यास नेहमी तयार असत. ही गोष्ट मला आठवली म्हणजे मला वडलांचा अत्यंत अभिमान वाटतो.

मला पहिल्यापासूनच शाळेच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष करून इतर पुस्तके वाचण्याचा भारी नाद असे. पण ते माझ्या वडलांना पसंत नव्हते. त्यांचे म्हणणे असे, की शाळेचा अभ्यास हा अगदी चोख केलाच पाहिजे. मग हवे असल्यास दुसरे वाचन करावे. स्वतःची पुस्तके असावीत, म्हणजे फक्त स्वतःच्या मालकीची,एवढीच त्या वेळी माझी महत्त्वाकांक्षा होती. त्या महत्त्वाकांक्षेमधूनच माझे ग्रंथालय निर्माण झाले! त्या वेळीसुद्‌धा नवीन पुस्तके आणून देण्यासाठी मी माझ्या वडलांजवळ हट्ट धरी. मी एखादे पुस्तक मागितले की ते संध्याकाळपर्यंत माझ्या वडलांनी आणून दिले नाही, असे कधीच झाले नाही.

आमचे कुटुंब गरीब असले तरी घरातील वातावरण पुढारलेल्या सुशिक्षित कुटुंबाला शोभेल असे होते. आमच्यात विद्येची अभिरुची उत्पन्न व्हावी, आमचे चारित्र्य सोज्ज्वळ बनावे यासाठी आमचे वडील अतिशय दक्ष असत. सकाळी जेवायला बसायच्या आधी ते आम्हांला देवघरात बसून भजने, अभंग, दोहे म्हणायला लावत. अर्थात आम्ही सारेच, त्यांपैकी विशेषतः मी, नेहमीच अळंटळं करायचा. कसेतरी दोनचार अभंग अर्धेमुर्धे म्हणून आम्ही जेवणासाठी ताटावर येऊन बसायचे! लगेच वडील आम्हांला हटकून विचारायचेच, "का रे, आज लवकर संपलं तुमचं भजन?" त्यांच्या या प्रश्नाला उत्तर देण्याच्या आधीच आम्ही तेथून पसार झालेले असायचे! पण ही सकाळची धांदल संध्याकाळच्या वेळी मात्र आमचे वडील केव्हाही चालू देत नसत. रात्रीचे आठ वाजले की माझ्या दोघी बहिणी, माझे वडील बंधू व मी देवघरापाशी जमा झालेच पाहिजे असा त्यांचा कडक नियम होता. कोणी गैरहजर राहिल्यास त्याला ते कधीच क्षमा करत नसत. ज्या वेळी ते मोठ्या भक्तिभावाने संतांचे अभंग



आणि कबिराचे दोहे म्हणू लागत, त्या वेळी अतिशय गंभीर व पवित्र वातावरण निर्माण होत असे. आमच्या वडलांचे पाठांतर फार असे. ते अभंगामागून अभंग म्हणू शकत. वडलांच्या पाठांतराचे आम्हांला आश्चर्य वाटे. त्याचप्रमाणे माझ्या बहिणीसुद्‌धा गोड गळ्यांनी जेव्हा अभंग म्हणत त्या वेळी धर्म व धार्मिक शिक्षण मनुष्याच्या जीवनात अत्यंत आवश्यक आहे असे मलासुद्‌धा पटत असे.

माझ्या लहानपणची एक गोष्ट सांगतो. मला वाटते, मी इंग्रजी दुसऱ्या इयत्तेत शिकत होतो. आमची शाळा होती साताऱ्याला कँपमध्ये. त्या वेळी पेंडसे नावाचे एक शिक्षक होते आम्हांला. त्यांचे माझ्यावर अतिशय प्रेम होते. माझा स्वभाव हट्टी आहे हे माझ्या सवंगड्यांना माहीत असल्यामुळे 'एखादी गोष्ट करू नकोस' म्हणून मला सांगितल्याबरोबर मी ती हटकून करणार, हे त्यांना माहीत होते.

एकदा खूप पाऊस पडत होता व आमची शाळेत जाण्याची वेळ झालेली होती. माझ्या मित्रांनी मला सांगितले, "बघ रे बुवा, पाऊस पडतोय खूप. तू आपला पावसात जाऊ नकोस हं! उगाच चिंब भिजशील!"

मला तेच पाहिजे होते. माझा थोरला भाऊ छत्री घेऊन निघाला. मी त्याला साफ सांगितले, "तू आपली छत्री घेऊन जा कसा! मी एकटा पावसात भिजत जाणार!" भावाने माझे मन वळवण्याचा खूप प्रयत्न केला; पण मी त्याचे म्हणणे धुडकावून लावले. आमची स्वारी छत्रीबित्री न घेता थेट पावसातून जायचे ठरवून निघाली. मी त्या वेळी वेलबुट्टीची टोपी वापरत असे. पावसात भिजेल म्हणून ती व माझी पाटी-पुस्तके मी माझ्या भावाच्या स्वाधीन केली. तो पुढे निघून गेल्यावर मी पावसातून भिजत भिजत शाळेच्या रस्त्याने निघालो. पाऊस अगदी मुसळधार पडत होता. मी शाळेत येऊन पोहोचलो, तो काय? अगदी नखशिखान्त भिजलेला! मला तशा स्थितीत आलेला पाहिल्यावर शिक्षकांना फार वाईट वाटले. त्यांनी मला विचारले, "अरे, पावसात छत्री घेऊन का नाही निघालास?"

मी जबाब दिला, "छत्री एकच होती आम्हा दोघा भावांमध्ये. छत्री एकच होती म्हणून मी भिजलो." ही माझी निव्वळ थाप होती हे काही माझ्या शिक्षकांच्या ध्यानात आले नाही. लगेच माझ्या थोरल्या भावास त्यांनी बोलावून घेतले. तो तेव्हा चौथीत शिकत होता. त्याला शिक्षकांनी विचारले, "दाखव पाहू तुझ्या अंगात किती सदरे आहेत ते?"

माझ्या भावाच्या अंगात एकच सदरा होता. तेव्हा त्यांनी आपल्या स्वतःच्या मुलाला माझ्याबरोबर घरी पाठवले व त्याला सांगितले, "याला अंघोळ करायला गरम पाणी दे. त्याला एक लंगोटी दे आणि त्याचे कपडे वाळत घालायला लाव; म्हणजे ते संध्याकाळी घालून तो आपल्या घरी जाईल."

त्याप्रमाणे त्या शिक्षकांच्या मुलाने मला आपल्या घरी नेऊन गरम पाण्याची अंघोळ घातली व नेसायला एक लंगोटी दिली. संध्याकाळपर्यंत शाळेच्या तडाख्यातून आपण सुटलो म्हणून मला खूप आनंद झाला. मी टिवल्याबावल्या करत व तोंडाने

शिट्ट्या वाजवत असाच शाळेच्या बाहेर हिंडत होतो. मी वर्गात आलो नाही असे पाहून मला वर्गात आणण्यासाठी पुन्हा शिक्षकांनी एका मुलाला सांगितले. नुसता लंगोटी घालून साऱ्या मुलांच्या देखत वर्गात बसण्याची मला विलक्षण लाज वाटत होती. पण शिक्षक म्हणाले, "अरे, इथं तर सारी मुलंच आहेत. त्यांची लाज तुला वाटायचं काय कारण?" मी आपला तसाच रडत रडत वर्गात बसलो. पण या गोष्टीची मला इतकी लाज वाटली, की त्याच वेळी माझ्या स्वभावातील हा हट्टीपणा काढून टाकण्याचा मी निश्चय केला.

आमचे आडनाव 'आंबेडकर' नव्हते. आमचे खरे आडनाव 'आंबावडेंकर.' आंबावडे या नावाचे खेड तालुक्यातील दापोलीजवळ पाच मैलांवर एक लहानसे खेडे आहे. त्यामुळे आम्हांला 'आंबावडेकर' या नावाने लोक ओळखत असत. या आंबावडेकर आडनावाचे 'आंबेडकर' हे नाव कसे झाले त्याला इतिहास आहे–

आम्हांला 'आंबेडकर' नावाचे एक ब्राम्हण शिक्षक होते. माझ्यावर त्यांचे फार प्रेम होते. मधल्या सुट्टीत मला भाकरी खाण्यासाठी शाळेपासून दूर असलेल्या आमच्या घरी जावे लागे. हे आंबेडकर शिक्षकांना पसंत नव्हते. पण तेवढाच वेळ बाहेर भटकायला मोकळीक मिळे म्हणून मलाही भाकरीसाठी मधल्या सुट्टीत घरी जाण्याची फार मजा वाटायची. पण आमच्या या शिक्षकांनी एक युक्ती योजली. ते आपल्या-बरोबर भाजी-भाकरी बांधून आणत असत व रोज मधल्या सुट्टीत कधीही न चुकता मला बोलावून आपल्यातली भाजी-भाकरी मला खायला देत. मला सांगायला अभिमान वाटतो, की त्या प्रेमाच्या भाजी-भाकरीची काही अवीट गोडी असे. या गोष्टीची आठवण झाली म्हणजे माझा गळा दाटून येतो.

एके दिवशी या शिक्षकांनी मला सांगितले, की हे तुझे 'आंबावडेकर' नाव आडनिडे आहे. त्यापेक्षा 'आंबेडकर' हे माझे नाव छान आहे. हेच तू यापुढे लाव. आणि त्यांनी कॅटलॉगमध्ये तशी नोंदसुद्धा करून टाकली.



अभ्यास :

१. डॉ. आंबेडकर यांनी मोठे व्हावे म्हणून त्यांच्या वडलांनी कोणकोणती काळजी घेतली?
२. डॉ. आंबेडकर यांच्या मनात भक्तिभाव कसा निर्माण झाला?
३. आपल्या स्वभावातील हट्टीपणा काढून टाकण्याचा निश्चय त्यांनी का केला?
४. डॉ. आंबेडकरांचे सर्वच कुटुंब सुसंस्कृत होते, हे कोणकोणत्या उदाहरणांवरून दिसून येते?
५. 'मी इयत्ता पहिलीत होतो तेव्हा'— यावर पंधरावीस ओळी लिहा.

१७

# दगडफोड्या

**वि. स. खांडेकर**

वि. स. खांडेकर (जन्म : १८९८; मृत्यू : १९७६) यांनी लघुकथा, लघुनिबंध, कादंबरी इत्यादी विविध प्रकारचे व विपुल लेखन केले आहे. भारत सरकारने 'पद्मभूषण' हा किताब देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला आहे. त्यांच्या रूपककथांचा संग्रह 'सोनेरी सावल्या' या नावाने प्रसिद्ध आहे. त्यातून 'दगडफोड्या' ही रूपककथा घेतली आहे.

**एका कष्ट करणाऱ्या गरीब दगडफोड्याला आपल्या दुर्दैवाचे दुःख वाटते; पण शेवटी त्याला कोणता प्रत्यय येतो, ते पाहा.**

फार जुन्या काळातील गोष्ट आहे ही!

एका खेडेगावात एक मनुष्य राहत असे. खडक फोडून काढायचा धंदा करत असे तो. हे काम मोठे कष्टाचे होते. रक्ताचे पाणी करावे लागे तिथे!

आपल्या मजुरीवर तो मनुष्य उजाडल्यापासून दिवस मावळेपर्यंत काम करत राही. घाम गाळत राही. पण उभ्या दिवसाच्या कामाचे दाम पाहिले, की त्याला आपल्या दुर्दैवाचे दुःख अधिकच तीव्रतेने जाणवे!

त्याच्या मनात येई, छानदार मच्छरदाणीने झाकलेल्या पलंगावर विश्रांती घेत पडण्याइतका मी श्रीमंत झालो तर काय बहार येईल!

त्याच क्षणी आकाशातून एक देवदूत खाली उतरला आणि त्याच्या पुढे उभा राहून म्हणाला, "अभागी मनुष्या, तुझी इच्छा तृप्त होईल."

त्याचे मधुर सुखस्वप्न सत्यसृष्टीत उतरले. लक्षाधीश होऊन रेशमाच्या मच्छर–दाणीने आच्छादलेल्या मंचकावर तो अहोरात्र लोळू लागला.

एके दिवशी त्या देशाच्या राजाची स्वारी त्याच्या वाड्यावरून गेली. राजाच्या रथाच्या पुढे आणि मागे घोडेस्वार धावत होते. राजाच्या मस्तकावर एका सेवकाने

सोनेरी छत्र धरले होते.

हे दृश्य पाहताच तो श्रीमंत मनुष्य अस्वस्थ झाला. आपल्या मस्तकावर सोनेरी छत्र नाही, याचे त्याला वैषम्य वाटू लागले. तो स्वतःशीच उद्‌गारला, "किती दुर्दैवी आहे मी! कुणी मला राजा केलं तर—"

त्याच क्षणी तो देवदूत पृथ्वीवर आला आणि म्हणाला, "अभागी माणसा, तुझी इच्छा सफल होईल."

तो राजा झाला. त्याच्या पुढे आणि मागे घोडेस्वार धावू लागले. त्याच्या डोक्यावर सोनेरी छत्र झुलू लागले.

उन्हाळ्याचे दिवस आले. सूर्य आग ओकू लागला. धरणीचे अंग भाजून निघू लागले. गवताचे पाते नि पाते वाळून गेले. सूर्य आपल्यापेक्षा श्रेष्ठ असल्यामुळे उन्हाने आपला चेहरा भाजून निघतो अशी तक्रार हा राजा आता करू लागला. तो स्वतःशीच उद्‌गारला, "किती दुर्दैवी आहे मी! मी सूर्य झालो असतो तर काय मजा झाली असती!"

त्या देवदूताच्या कृपेने तो तत्काळ सूर्य झाला. त्याने पृथ्वीवरल्या सर्व लहानथोर प्राण्यांना भाजून काढून सळो की पळो करून सोडले!

पण एके दिवशी या सूर्याच्या आड एक भला मोठा ढग आला. सावली मिळाली म्हणून पृथ्वीने सुटकेचा सुस्कारा सोडला.



आपल्या शक्तीला असा विरोध झालेला पाहून सूर्य म्हणाला, "मेघांचं माहात्म्य काही निराळंच आहे. मेघांची शक्ती जर मला मिळाली तर...."

देवदूताने त्याची तीही इच्छा क्षणार्धात तृप्त केली. मेघ होऊन तो सूर्य आणि पृथ्वी यांच्यामध्ये संचार करू लागला. पृथ्वीवरले वाळून गेलेले गवत हिरवेगार होऊ लागले.

एके दिवशी या मेघाने मुसळधार पाऊस पाडला. नद्यांना पूर आले. गुरेढोरे त्या पुरात वाहून जाऊ लागली. शेतात गुडघाभर पाणी उभे राहिले. पिके बुडाली म्हणून शेतकऱ्यांच्या डोळ्यांतून पाऊस गळू लागला.

पण या मेघाने एका खडकावर संततधार धरली असूनही त्याला भेगसुद्धा पडली नाही. मेघाने सरीवर सरी पाडल्या पण खडक अभंग राहिला.

खडकाची शक्ती आपल्यापेक्षा अधिक आहे हे पाहून त्याला राग आला. स्वतःवर चडफडत तो म्हणाला, "किती दुर्दैवी आहे मी! मी खडक झालो तर—"

तो खडक झाला. उन्हात आणि पावसात हा खडक एखाद्या समाधी लावलेल्या साधूप्रमाणे स्वस्थ बसून राही.

एके दिवशी एक दगडफोड्या कुदळ, हातोडा वगैरे हत्यारे घेऊन तेथे आला. खडक उद्गारला, "या मनुष्याची शक्ती माझ्यापेक्षा मोठी आहे. हा माझे तुकडे तुकडे केल्याशिवाय राहणार नाही! छे, छे, छे! किती दुर्दैवी आहे मी! कुणी देवदूत प्रसन्न झाला तर त्याच्यापाशी मी एकच वर मागेन—मला या मनुष्याचं रूप दे!"

स्वर्गातून देवदूत खाली उतरला आणि म्हणाला, "अभागी मनुष्या! तुझी इच्छा तृप्त होईल."

आणि तो पुन्हा दगडफोड्या झाला!



रक्ताचे पाणी करणे—घाम गाळणे, खूप परिश्रम करणे; मंचक—पलंग; सळो की पळो करणे—अतिशय त्रास देणे; संततधार—पावसाची एकसारखी झड.



**अभ्यास :**

१. दगडफोड्याने कोणकोणते वर मागितले? २. मिळालेल्या प्रत्येक वरानंतर दगफोड्याने काय काय केले? ३. दगडफोड्याला देवदूताने अभागी का म्हटले आहे? ४. तुमच्या वाक्यांत उपयोग करा—रक्ताचे पाणी करणे, सळो की पळो करणे, घाम गाळणे. ५. तुम्हांस पडलेल्या एका मजेदार स्वप्नाचे वर्णन पंधरा ओळींत लिहा. ६. दगडफोड्या स्वतः ही गोष्ट सांगत आहे अशी कल्पना करा व ती थोडक्यात लिहा.



‘ रावणेश्वर ’ चित्रकार : आबालाल रहिमान

निसर्गाचे सौंदर्य पाहून आपण सर्वजणच मोहून जातो. पावसाळा संपता संपता निसर्ग अधिकच सुंदर वाटू लागतो. गालिच्यासारखे हिरवेगार गवत, मधूनमधून साठलेले नितळ पाणी, झाडावरची स्वच्छ हिरवीगार पाने, आकाशात पाठशिवणीचा खेळ खेळणारे वेगवेगळ्या आकारांचे ढग आणि झुळझुळ वाहणारा थंडगार वारा—असे दृश्य अनुभवताना आपण क्षणभर स्वतःला विसरून जातो. आपल्याला वाटू लागते, की हा अनुभव कधीच संपू नये.

जो अनुभव आपणा सर्वांना येतो तोच चित्रकारालाही येतो. फरक इतकाच की आपण सामान्य लोक एखादे सुंदर दृश्य आपल्या समोरून नाहीसे झाल्यानंतर चुटपुटत राहतो. चित्रकार मात्र आपल्या रंगसाहित्यामधून, आपल्या अंगचे सर्व कसब पणाला लावून, ते दृश्य चित्राच्या रूपाने आपल्यासमोर उभे करतो. ते चित्र पाहताना आपण पुन्हा त्या सुंदर निसर्गाच्या सहवासात असल्याचा भास होतो.

आता आबालाल रहिमान यांचे ‘रावणेश्वर’ हे चित्र पाहा. या चित्रात आपल्याला काय दिसते? वाऱ्याने डोलणारे छान हिरवे गवत, लवचिक फांद्यांची झाडे, मधूनच चमकणारे निळे पाणी, लहान लहान ढगांच्या रांगा व स्वच्छ आकाश!

चित्र पाहाताच आपणांसमोर प्रत्यक्ष निसर्गच उभा राहातो. सर्व गोष्टी आपल्या डोळ्यांत भरतात. परंतु या सर्व सुंदर गोष्टी एकमेकांत पार मिसळून गेल्यासारख्या दिसतात. त्या वेगवेगळ्या वाटत नाहीत. या चित्रात निसर्गातील बारीकसारीक हालचालीसुद्धा चित्रकाराने मोठ्या कौशल्याने चित्रित केल्या आहेत. गवताकडे पाहाताच वाऱ्याच्या झुळकीने होणारी त्यातील हालचाल आपल्या नजरेत भरते. त्याचप्रमाणे दूरवरच्या झाडातील रंगाच्या छटा पाहताना मध्ये असणाऱ्या अंतराचा भास झाल्याशिवाय राहात नाही. शिवाय हे सर्व हुबेहूब दाखवण्याकरता चित्रकाराने आपल्या कुंचल्याचा किती कौशल्याने उपयोग केला असेल हेही चटकन ध्यानात येते.

हे चित्र तैलरंगांत रंगवले आहे. तैलचित्रात अशा प्रकारचा काव्यमय भाव दाखवणे तितकेसे सोपे नसते. त्याकरता चित्रकाराच्या अंगी उत्तम कलागुणांबरोबर निर्मल कविमनही असावे लागते. आबालाल यांच्यासारखे तपस्वी चित्रकारच अशी चित्रे रंगवू शकतात.

या चित्राकडे एकदा पाहिल्यानंतर ते पुन्हापुन्हा पाहावे, आणि ते पाहून आपणही तसे चित्र काढावे असे नाही का वाटत तुम्हांला?

‘कोल्हापूर-दर्शन : लोहिया अभिनंदन ग्रंथ’ या पुस्तकाच्या प्रकाशकांच्या सौजन्याने.

१८

# आबालाल रहिमान

**बाबूराव सडवेलकर**



**बाबूराव सडवेलकर (जन्म : १९२८.) हे प्रसिद्ध चित्रकार आहेत. अमेरिकेत जाऊन त्यांनी कलाशिक्षणपद्धतीचा विशेष अभ्यास केला आहे. चित्रकार व चित्रकला यांविषयी त्यांनी जिव्हाळ्याने लेखन केले आहे. 'माझी भाग्यरेषा' हा नानासाहेब करमरकरांचा पाठ तुम्ही पूर्वी वाचला आहे. नानासाहेबांना लहानपणापासून 'गणपती' करण्याचा छंद कसा लागला व ते पुढे नामवंत शिल्पकार कसे झाले हे तुम्ही वाचले आहे. या पाठात सुप्रसिद्ध चित्रकार आबालाल रहिमान यांचा परिचय श्री. सडवेलकर यांनी करून दिला आहे.**

१८९७चा सुमार असावा. छत्रपती शाहूमहाराजांचे चित्र काढण्यासाठी एकदा एक परदेशी चित्रकार आला होता. चित्र काढण्याचे त्याचे काम चालू झाले. मध्येच महाराजांना सहज कुणीतरी बोलले, "महाराज, आपल्याकडं मुंबईतील प्रख्यात कलाशाळेत शिकून आलेला चित्रकार असताना आपण बाहेरून चित्रकार कशासाठी मागवला? सरकारच्या मदतीवरच शिकून आलेला हा चित्रकार महाराजांची सेवा करू शकणार नाही असं महाराजांना वाटतं का?"

हे ऐकताच महाराजांनी तत्काळ त्या चित्रकारास बोलावणे पाठवले.

महाराजांचे दूत चित्रकारास आणण्यासाठी त्याच्या घरी गेले. तिथे त्यांना समजले, की सुमारे चारपाच वर्षांपूर्वी तो घरातून निघून गेला असून कोटितीर्थाच्या जंगलात त्याचे वास्तव्य आहे. लागलीच ते कोटितीर्थाच्या बाजूने निघाले आणि एका फकिराच्या सान्निध्यात असलेल्या त्या चित्रकाराला त्यांनी शोधून काढले. महाराजांची आज्ञा त्यास कळवली. त्याने सौम्य शब्दांत सांगितले, "महाराजांची मी काय सेवा करणार? मी इथं सुखी आहे म्हणून सांगा."

दूतांनी त्याचा निरोप महाराजांना सांगितला. पण कुणाकडून नकार ऐकून घेण्याचा महाराजांचा स्वभाव नव्हता. महाराज बोलले, "तो सरळ येत नसेल तर शिपाई घेऊन जा व त्याला कैद करून माझ्यासमोर आणा."

हुकमाप्रमाणे शिपाई गेले व त्या चित्रकाराला पकडून घेऊन आले. आपले सामान व अर्धवट राहिलेले एक चित्र घेऊन चित्रकार शिपायांसोबत महाराजांच्यासमोर गेला. महाराजांनी त्याला त्याचे नाव विचारले.

चित्रकाराने उत्तर दिले, "आबालाल रहिमान."

महाराजांनी त्याची चौकशी केली. त्याच्याजवळचे चित्र पाहिले. ते चित्र पाहून तो परदेशी चित्रकारही थक्क झाला. त्याने त्याच्या अंगच्या कलागुणांची महाराजांपाशी खूप स्तुती केली. आपल्या राज्यात एवढा मोठा कलाकार असल्याचा महाराजांना अभिमान वाटला. त्यांनी फर्मावले, "आबालाल, तुम्ही आजपासून आमच्या दरबारचे चित्रकार. दरबारमधून तुम्हांला तनखा मिळत जाईल."

आणि त्या दिवसापासून जंगलात रमलेला हा चित्रकार राजाचे कृपाछत्र असलेला सन्मान्य नगरवासी कलाकार झाला.

आबालाल रहिमान यांचा जन्म कोल्हापुरात झाला. त्यांचे मूळचे नाव अब्दुल अजीज. परंतु त्यांना घरी 'आबा' या टोपणनावाने संबोधले जाई. त्यावरून त्यांचे पुढे आबालाल हे नाव पडले.

आबालाल यांचे वडील खासगीमध्ये (दरबारात) कारकून होते. त्यांचे नाव अब्दुल रहिमान बाबाजी. त्यांची थोडीफार शेतीवाडीही होती. त्यामुळे त्यांचे कुटुंब खाऊनपिऊन सुखी होते. आबालाल यांच्या घराण्याचा मूळ धंदा कुराणाच्या हस्तलिखित प्रती तयार करणे हा होता. ते स्वतःही हा व्यवसाय एक छंद म्हणून करत होते. चित्रकलेचा छंदही आबालाल यांना त्यामुळेच लागला; कारण कुराणाच्या प्रत्येक पानाभोवती नक्षीकाम करण्याची प्रथा असल्यामुळे ते आपल्या वडलांच्या बरोबर स्वतःही हे नक्षीकाम करत असत. पुढे पुढे तर वडलांनी लिहायचे व आबालालांनी नक्षीकाम करायचे असे ठरूनच गेले.

सोन्याचांदीवरील नक्षीकामाचेही आबालाल यांच्यावर संस्कार होऊ लागले. अशा प्रकारचे काम करणाऱ्या कारागिरांची गुजरी या नावाने ओळखली जाणारी एक वसाहत त्यांच्या घरापासून जवळच होती. कोल्हापूर येथे होणारे चांदीवरील विशिष्ट प्रकारचे कोरीव काम त्या वेळी देशभर प्रसिद्ध होते. भोवतालच्या या सर्व

परिस्थितीचा परिणाम होऊन आबालाल लहान वयातच कसबी कारागीर झाले.

सन १८८० मध्ये कोल्हापूर-दरबारची शिष्यवृत्ती घेऊन आबालाल मुंबईच्या 'सर जे. जे. स्कूल ऑफ आर्ट'मध्ये दाखल झाले आणि थोड्याच अवधीत एक अत्यंत हुशार विद्यार्थी म्हणून ते तिथे चमकले.

शिक्षण घेऊन परत आल्यानंतर शहरी वातावरणात त्यांचे मन रमेना. अखेर कोटितीर्थ तलावाच्या तीरावर निसर्गाच्या सान्निध्यात ते राहू लागले.

कोटितीर्थ तलावाजवळील सर्व भाग त्या काळी अगदी निर्मनुष्य होता. तिथल्या काहीशा डोंगराळ जमिनीवर अनेक प्रकारचे वृक्ष होते. तलावाच्या काळ्याभोर पाण्यात मधून मधून कमळाची फुले व पाने यांचा सुंदर गालिचा पसरलेला असे. अनेक प्रकारचे पक्षी इकडून तिकडे उडताना दिसत. जमिनीवर हिरवेगार दाट गवत आणि माथ्यावर विशाल निळेभोर आकाश! अशा निसर्गसंपन्न वातावरणात आबालालांनी आपल्या नव्या आयुष्याला सुरुवात केली.

या एकांतवासात आबालाल यांची एका फकिराशी दोस्ती झाली आणि त्याचाही या तरुण कलाकारावर लोभ जडला. इतका की तोच जवळजवळ त्यांचा सांभाळ करू लागला. तिथे गुरे चारायला येणारे गुराखीही हळूहळू आबालालांशी मिसळून गेले. या काळात त्या वातावरणाशी ते एकरूप होऊन गेले होते. आकाशाबरोबर ते विशाल होत, झाडांच्याबरोबर हालत-डोलत, पाण्याबरोबर तरल होत. लव्हाळ्यासोबत



जमिनीशी खेळत, पशुपक्ष्यांची गाणी ऐकत. हा तरुण चित्रकार या वातावरणाशी पूर्णपणे एकरूप झाला म्हणूनच त्याच्याशी एकजीव झालेल्या सर्व गोष्टी त्याच्या छोटया छोटया चित्रांतून पुन्हा पुन्हा जन्माला आल्या असाव्यात.

१८९० पर्यंतचा पाच वर्षांचा हा काल त्यांनी कोटितीर्थ जंगलामध्ये ऋषिमुनीं-प्रमाणे काढला. अष्टौप्रहर चित्रकलेचीच आराधना केली. अशा वेळी त्यांना कागद मिळणेदेखील कठीण होते. मिळेल त्या कागदावर, मिळतील त्या प्रकारचे रंग, प्रसंगी खडू, कोळसा इत्यादी रंगसाहित्य वापरून त्यांनी असंख्य चित्रे रेखाटली आहेत. कमीत कमी रंगात, थोड्याशा रेषांतून भावनात्मक चित्रे कशी निर्माण होतात, हे पाहायचे झाल्यास आबालाल यांची त्या वेळची चित्रे जरूर पाहावी.

स्वतःमध्ये आणि निसर्गामध्ये संपूर्णपणे दंग झालेल्या आबालालांना एके दिवशी अचानक छत्रपती शाहूमहाराजांकडून बोलावणे आले. आबालाल दरबारचे चित्रकार झाले. आणि त्या दिवसापासून त्यांना दरबारातून जो तनखा मिळत होता त्यात अखेरपर्यंत खंड पडला नाही.

आबालाल दरबारचे चित्रकार झाले. आबालाल यांच्यातील कलागुणांचा इतरांना उपयोग व्हावा म्हणून महाराजांनी त्यांना एका शाळेत कलाशिक्षक म्हणून नेमले. त्या दिवसापासून ते 'आबालाल मास्तर' या नावाने ओळखले जाऊ लागले.

राजाश्रय मिळाल्यानंतरही त्यांच्या वृत्तीत फारसा फरक पडला नाही. सर्व गोष्टींकडे निरपेक्ष वृत्तीने पाहण्याचा त्यांचा स्वभाव कधीच बदलला नाही. त्यांनी स्वतःहून कोणतीही गोष्ट महाराजांकडे मागितली नाही. इतकेच काय, आपल्याला मिळणारा तनखाही घेण्यासाठी ते राजवाडयात जात नसत. कधी कधी महाराजांच्याच ते ध्यानी येई व तनखा यांच्या घरी पोचता करण्याची ते व्यवस्था करत. आबालाल मास्तर महाराजांना फारसे भेटतही नसत. ते स्वतःहून कधी त्यांच्याकडे जात नसत. मग महाराजच अनेक युक्त्या काढून त्यांना बोलावून घेत किंवा स्वतः त्यांच्याकडे जात. राधानगरी, दाजीपूर इत्यादी ठिकाणी महाराज शिकारीसाठी जात, तेव्हा ते मास्तरांना बरोबर नेत. मास्तर त्या ठिकाणी घोड्यांची, इतर जनावरांची व शिका-रीच्या दृश्यांची पुष्कळ चित्रे काढत. आजही त्यांपैकी काही चित्रे उपलब्ध आहेत. महाराजांच्या पदरी असूनही मास्तरांना कोणत्याही प्रकारची कामे करण्याची मुभा होती. त्यामुळे गरजेनुसार अनेक प्रकारची कामे करून ते आपल्या कलेचे संगोपन करण्याचा प्रयत्न करत. त्यासाठी वाटेल ते कष्ट करण्याची त्यांची तयारी असे; पण

आपल्याला मिळतो तो तनखा 'कलेचा संसार' चालवायला अपुरा आहे, असे महाराजांना त्यांनी कधीही सांगितले नाही. परिस्थितीच्या विरुद्ध तक्रार करणे त्यांच्या स्वभावातच नव्हते.

आबालाल यांनी या काळात (सुमारे १९२१–२२) अगणित कलाकृती निर्माण केल्या. त्यांची कलेची ही आराधना अखंड चालू होती. तीत कधी कसला व्यत्यय आला नाही; पण पुढे महाराज निवर्तले. महाराजांच्या मृत्यूचा मात्र त्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. त्यांचे मन उदास झाले. पंचगंगा नदीस पूर आला असताना त्यांनी आपली सर्व चित्रे एका गोणीत भरली व ती गोणी घेऊन ते पंचगंगेवर गेले. अगदी शांतपणे एकेक चित्र पाहून त्यांनी ती सर्व चित्रे त्या वेगवती गंगेच्या स्वाधीन केली.

मास्तरांच्या डोक्यावर परिणाम झाला असा समज होऊन काहींनी त्यांना या कृत्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा त्यांनी शांतपणे उत्तर दिले, "माझी जिंदगी या कलेसाठी खर्ची पडली आहे आणि कलेचा चाहता आता जगातून निघून गेला आहे. इतरांना याची काय पर्वा? म्हणून ही माझी चित्रं मी स्वतःच या गंगेच्या स्वाधीन करतो आहे."

फर्मावणे – आज्ञा करणे; उपजीविका – उदरनिर्वाह; निरपेक्ष – कशाचीही अपेक्षा नसणारा; उपलब्ध – प्राप्त; कोटितीर्थ – कोल्हापुरातील एक तलाव; तनखा – नेमून दिलेले मानद्रव्य; जे. जे. स्कूल ऑफ आर्ट – मुंबईतील कला-महाविद्यालयाचे नाव.

अभ्यास :

१. शाहूमहाराजांचे बोलावणे आले असता आबालाल जायला का तयार झाले नाहीत ?
२. आबालाल रहिमान यांना चित्रकलेचा छंद कशामुळे लागला ?
३. आबालाल रहिमान निसर्गातील कोणकोणत्या गोष्टींशी एकरूप झाले होते ?
४. चित्रे काढण्यासाठी त्यांनी कोणकोणत्या गोष्टींचा उपयोग केला ?
५. त्यांनी आपली चित्रे गंगेच्या स्वाधीन का केली ?
६. खालील वाक्प्रचारांचा वाक्यांत उपयोग करा :
गळ घालणे, गुमा असणे, पदरी पडणे, खर्ची पडणे.
७. 'माझा आवडता छंद' या विषयावर सुमारे पंधरा ओळींचा निबंध लिहा.



१९

# हिरवे कोकण

**मंगेश पाडगावकर**



**मंगेश पाडगावकर** (जन्म : १९२९.) हे कवी आणि लघुनिबंधकार आहेत. 'धारानृत्य' 'जिप्सी' इत्यादी कवितासंग्रह, 'निंबोणीच्या झाडामागे' हा लघुनिबंधसंग्रह व त्यांची इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'निंबोणीच्या झाडामागे' या लघुनिबंधसंग्रहातून पुढील पाठ घेतला आहे.

कोकणचे लोकजीवन व निसर्गसौंदर्य यांचे चित्र लेखकाने कसे रेखाटले आहे, पाहा.

आठ वर्षांपूर्वी बऱ्याच दिवसांनी मी कोकणात गेलो होतो. सारे बदललेले होते. मी लहानपणी पाहिलेले, अनुभवलेले ते जग मला कुठेच दिसेना. जपून ठेवलेले खेळणे हरवल्यावर पोर जसे कावरेबावरे होते, तसे माझे मन झाले. माझी खुणेची झाडे जाग्यावर नव्हती, जाती नव्हती, ओव्या नव्हत्या.

मी लहानपणी पाहिलेले जग याहून फार वेगळे होते.

सावंतवाडी, वेंगुर्ले, कुडाळ, शिरोडे, मालवण....कोकणचा बहुतेक भाग मी पाहिलेला आहे. दर दहा मैलांवर भाषा बदलते असे म्हणतात; पण हा बदल ढोबळ नसतो. तो इतका सूक्ष्म असतो, की जाणकारही सावध नसेल तर तो त्याच्या नजरेतून सुटावा. वाडीपासून आजगावपर्यंत, त्याहीपुढे मांजऱ्यापर्यंत भाषा एकच. घार कितीही उंच उडाली तरी तिच्या नजरेतून भक्ष्य सुटणे कठीण; त्याचप्रमाणे इथल्या माणसांच्या उच्चारांतून बारीकसाही अनुस्वार सुटणे कठीण. जेवणातून मासळी आणि बोलण्यातून अनुस्वार सोडून देणे अस्सल कोकणी माणसाला जमायचे नाही. धोतर, सदरा, कोट, टोपी आणि बायकांच्या बाबतीत नऊ वारी पातळ हा पोशाख या पट्ट्यात सर्वत्र सारखाच. शहरातल्या आधुनिकतेचे संस्कार हळूहळू येथे येऊ लागले आहेत.

मूठभर जोंधळे हातात घेऊन ते कोंबड्यांच्या पुढे भिरकवावे त्याप्रमाणे इथली घरे भिरकवल्यासारखी वाटतात. पाचसहा घरे जवळ जवळ का, आणि एखाददुसरे त्यांच्यापासून असे दूर फेकलेले का, याला उत्तर एकच; आणि ते म्हणजे योगायोग. घर या वास्तूची इथली व्याख्या अगदी सोपी, सरळ आहे. चार भिंती, वर लाल नळयांचे छप्पर, एखादी खिडकी, इतके असले म्हणजे पुरे. मातीच्या भिंती बांधणे ज्यांच्या उत्पन्नात बसत नाही तेथे सुकलेल्या झावळयांच्या भिंती असतात. पावसाळ्यात थोडा त्रास होतो; पण माणूस आहे तिथे दुःख आहे, त्रास आहे. हे दुःख सोसले पाहिजे हे इतक्या स्वाभाविकपणे इथल्या माणसांना कळलेले असते, की ते श्वासोच्छ्वास करण्याइतक्याच सहजतेने ते सोसतात. घराचे दरवाजे अभिजात नम्रता शिकवणारे. वाकून चालले नाही तर डोक्याला टेंगूळ हे ठरलेले! घरासमोर तुळस,



आजूबाजूला माड, एखादे फणसाचे झाड, असा एकूण परिसर. अशी ही ठेंगणी मळकट घरे. धुराने काळवंडलेली आणि तरीही आजूबाजूच्या निसर्गाच्या पार्श्व-भूमीवर टुमदार, रेखीव दिसणारी, चित्रकाराच्या कुंचल्याला आवाहन करणारी.

या घरांचे दरवाजे ठेंगणे असले तरी या घरांच्या आतिथ्याला मात्र बुटकेपणा अजूनही आलेला नाही. इथली आतिथ्याची उमेद कधी खुरटली नाही. कद्रूपणाने तिला घेरले नाही. काही नाही तरी गुळाचा खडा आणि पाणी कधी चुकले नाही. निदान माडावर चढून तो एखादे 'आडसार' नक्कीच काढून देईल. एरव्ही इथला माणूस हा भावविवश होणारा नव्हे. भावनांच्या जोषात वाहून जाणारा नव्हे; पण आतिथ्याच्या बाबतीत मात्र त्याचा धूर्तपणा कसा मावळतो कोण जाणे! बुटक्या दरवाजांच्या या घरातले हे आतिथ्य उंच आभाळालाही लाजवू शकेल.

इथला निसर्ग गोव्यातल्या निसर्गाइतका सुंदर नसला तरी निश्चित विलोभनीय आहे. पाऊस भरपूर, त्यामुळे दृष्ट लागावी असा हिरवागार रंग. हिरवा, पिवळा आणि लाल या रंगांची उधळण इथे ठसठशीतपणे जाणवते. हिरव्या झावळ्या, हिरवी पाने, माडांच्या झावळ्यांच्या आश्रयाला राहणारे सापही हिरव्या रंगाचे. एखादा साखरआंबा चांगला पिकला तरी बाहेरून उगीचच हिरवेपणाचा बुरखा घेतो. पण खारीच्या तरबेज दातांना या बाहेरून हिरव्या दिसणाऱ्या आंब्याच्या मनातले सोनपिवळे माधुर्य चांगले ठाऊक असते. या आंब्याचे पिकेपण जाहीर करण्याचे काम याच खारीकडे. आंब्यावर पहिले कोरीव काम करण्याचा मान तिचा. काजूचे बोंड चांगले पिवळेधमक झाले, तरी त्याच्या नाकावर थोडासा लाल रंग ठाण देऊन बसलेला हा असणारच! इथली मातीही लाल. परीटघडीच्या शुभ्रपणाला कधीही न जुमानणारी, दाट हिरव्या झाडीतून तांबडी वळणे घेत भटकणारी.

हिरव्यागार पानांची दाट लगडलेली झाडे पावलापावलांवर भेटतात. लालभडक फुलांचे गोंडे सावरणारी जास्वंदी सर्वत्र हटकून दिसते.

माड हा इथल्या झाडांचा राजा. तो जमिनीला खिळलेला असला तरी सारखे वाटत असते—रात्रीच्या वेळी सगळे जग गाढ झोपल्यावर हा आपल्या लांबच लांब टांगा टाकून दूर कुठेतरी भटकून येत असला पाहिजे! कोकणी माणसाच्या जीवनात जन्मापासून तो थेट मृत्यूपर्यंत हा माड कृपेची सावली देत उभा असतो. माडाशिवाय कोकणचा विचारच करणे शक्य नाही. कधी कधी पावसाळ्यात मोठे वादळ होते. भयाण वारा झावळ्यांचे केस पिंजारून टाकतो. या वादळाची जबरदस्त थप्पड

बसून एखादा उंच थोराड माड उन्मळून पडतो. अशा अवस्थेत त्याला पाहवत नाही.

वेळेवरच्या पांढऱ्याशुभ्र वाळूत किलकिल्या डोळ्यांनी पिवळे ऊन पीत पडलेली काळीकुट्ट होडकी, नदीच्या पाण्यात आपलेच रूप न्याहाळणारी सुरूची झाडे, पौर्णिमेच्या शांत रात्री मंदपणे सळसळणाऱ्या माडांच्या झावळ्यांमागे उभा असलेला चंद्र....हे जग रंगगंधांचे आहे; आंब्यांच्या, काजूंच्या मोहोराने घमघमणारे आहे. सह्याद्रीच्या कडेकपारीइतके उग्र, कठोर असले तरी इथे उमलणाऱ्या फुलांइतकेच ते कोमल, सुंदरही आहे.

इथली माणसे कष्टाळू आहेत. आळस त्यांना फारसा ठाऊक नाही. कामाला लागली, की वाघासारखी कामे करतील; पण सौंदर्याने वेडे होणे, कलेच्या प्रेमासाठी जीवन बरबाद करून घ्यायला तयार होणे हे या माणसांच्या हिशोबात कधी बसेल असे वाटत नाही.

तसा हा माणूस साधा आहे. भात आणि निस्त्याकाचा सांबारा एवढे मिळाले, की तो कुठेही सुखी होऊ शकतो. जगाचे ओझे उगीचच डोक्यावर घेऊन तो मस्तक शिणवण्याचा प्रयत्न करणार नाही.

कोकणी पायतणासारखी करकरणारी ही माणसे असली तरी ती चिवट व विलक्षण मजबूत असतात. दगडधोंडे, काटेकुटे, खाचखळगे, डोंगरनाले ती सहज पार करून जातात. जीवनावर प्रेम करणारी ही माणसे आहेत.

झावळ्या–नारळाच्या झाडाची पाने; आडसार–कोवळा नारळ, शहाळे; वेळा–समुद्रकिनारा; निस्त्याक–माशांची एक जात.

**अभ्यास :**

१. कोकणात गेल्यावर लेखकाचे मन कावरेबावरे का झाले ?
२. कोकणातील घरांची कोणती विशेष माहिती या पाठात दिली आहे ?
३. कोकणातील लोकांच्या स्वभावाची कोणती वैशिष्ट्ये लेखकाने वर्णन केली आहेत ?
४. खालील विधाने स्पष्ट करा :
   (अ) दर दहा मैलांवर भाषा बदलते. (आ) घराचे दरवाजे अभिजात नम्रता शिकवणारे.
   (इ) माड हा इथल्या झाडाचा राजा. (ई) हे जग रंगगंधांचे आहे.
५. 'हिरवे कोकण' असे नाव या पाठाला का दिले आहे ?
६. या पाठात आलेल्या दृश्यांपैकी कोणते दृश्य तुम्हांला रेखाटावेसे वाटते ? ते रेखाटा व तुमच्या चित्रांचे वर्गात प्रदर्शन भरवा.

२०

# माझा छंद–आकाशदर्शन

**सुधाकर भालेराव**



**सुधाकर भालेराव** (जन्म : १९३२.) यांची 'विज्ञानाची किमया', 'आपली सूर्यमाला' इत्यादी पुस्तके प्रसिद्ध आहेत.

**प्रत्येकाला काही ना काही छंद असतो. लेखकाला आकाशदर्शनाचा छंद आहे. त्यासंबंधी काही गोष्टी या पाठात त्यांनी सांगितल्या आहेत. पाठ वाचा व तुम्हांलाही असा एखादा छंद लावून घेता येतो का, हे पाहा.**

कुणाला गाण्याचा छंद असतो, कुणाला वाद्यवादनाचा, कुणाला काव्य रचण्याचा, कुणाला नृत्य-नाटयाचा, कुणाला वनविहार करण्याचा, तर कुणाला गिर्यारोहणाचा. कुणाला छायाचित्रणाचा, कुणाला नाना वस्तूंचा संग्रह करण्याचा, तर कुणाला शास्त्रीय उपकरणी तयार करण्याचा. नाना व्यक्ती, नाना छंद! छंद मनाला विरंगुळा देतात. श्रांत मनाला उत्साह देतात; दुःखीकष्टी जीवनात आनंद ओततात.

मला छंद आहे आकाशातल्या ज्योतींचे निरीक्षण करण्याचा. दिवसभराच्या श्रमासायासांनी शिणलेल्या मनाला दिलासा देणारी दुर्बीण माझी वाटच पाहत असते. सायंकाळ होते. हळूहळू अंधार पडू लागतो. माझे डोळे नकळत आकाशाकडे पाहू लागतात. परमेश्वराच्या फुलबागेचा नयनरम्य देखावा माझे लक्ष वेधून घेतो. मी घराच्या उंच माळ्यावर माझी दुर्बीण घेऊन जातो अन् ती आकाशातील ग्रहगोलांवर रोखतो. मला आता कशाचेही भान नसते. आकाशातील ज्योती, दुर्बीण आणि मी! आकाशातील ज्योतींचे निरीक्षण करण्यात मी तल्लीन होऊन जातो.

कलेकलेने वृद्धिंगत होणारा शुक्लपक्षातील चंद्रमा किती सुंदर दिसतो दुर्बिणीतून! चंद्र हे वैराण वाळवंट आहे. त्यावर पाणी नाही, हवा नाही, हिरव्यागार वनस्पतींनी

सुशोभित झालेली भूमी नाही–खरे आहे; पण....पण माझ्या दुर्बिणीतून दिसणारा चंद्र खचितच सुंदर आहे. कवींना काव्याची स्फूर्ती देणारा आहे. मनाला रिझवणारा आहे. दुर्बिणीतून चंद्रावरले बारकावे दिसतात. विवरे, भेगा, पर्वतराजी यांचे दर्शन घडते. सारे कसे विलोभनीय दिसते! शुद्ध प्रतिपदेपासून अष्टमीपर्यंतचा चंद्र हे आनंदाचे निधान आहे. अष्टमीनंतर चंद्रावरले बारकावे कमी कमी दिसतात. पौर्णिमेचा चंद्र दुर्बिणीतून पाहिला असता डोळे दिपून जातात. त्या वेळी चंद्राच्या पृष्ठभागावरील काही विवरांतून निघालेल्या तेजस्वी शलाका पाहून फार आश्चर्य वाटते. पौर्णिमेचा चंद्र आकाशातून विहार करत असताना अनेक तेजस्वी ताऱ्यांना झाकतो. या घटनेला 'पिधान' असे म्हणतात. हे दृश्य दुर्बिणीतून फार मनोहर दिसते. पौर्णिमेनंतर दिसणाऱ्या चंद्राची दृश्येही काही कमी वेधक नसतात!

कधी सकाळी तर कधी सायंकाळी दिसणारा शुक्र ग्रह किती तेजस्वी अन् आकर्षक दिसतो! दुर्बिणीतून त्याचे दर्शन घेणे यासारखा खरोखर दुसरा आनंद नाही. चंद्राप्रमाणेच शुक्राच्याही 'कला' दिसतात. तुम्ही 'शुक्राची कोर' दुर्बिणीतून पाहिलीत तर हा चंद्र तर नव्हे ना, असे तुम्हांला वाटेल!

आपल्या सूर्यमालेतील सर्वांत लहान ग्रह बुध. तोही कधी सकाळी तर कधी सायंकाळी दिसणारा. दुर्बिणीतून त्याच्याही कलांचे दर्शन घडते. केव्हा केव्हा हा बुध सूर्यबिंबावरून जात असताना दिसतो. या घटनेला 'अधिक्रमण' असे म्हणतात. हे दृश्य दुर्बिणीतून पाहता येते. सूर्यबिंबावरून जाणारा हा रेखीव, काळा, इवल्याशा तिळाएवढा बुधाचा ठिपका किती सुरेख दिसतो म्हणून सांगू! याप्रमाणेच शुक्राच्या अधिक्रमणाचे दृश्यही विलोभनीय दिसते.

आकाशात तांबडया रंगाने खुलून दिसणारा मंगळ दुर्बिणीतून गोलाकार तबकडीसारखा दिसतो. त्याच्यावरील रेषांचे जाळे पाहून आश्चर्य वाटते. एके काळी या रेषांनाच मंगळावरचे 'कालवे' असे मानत असत.

नवग्रहात सर्वांत मोठा ग्रह म्हणजे गुरू. आपल्या पृथ्वीएवढे तेराशे गोल एकत्र केले, की तो गुरूएवढा एक गोल होईल. शुक्राच्या खालोखाल तेजस्वी दिसणारा ग्रह म्हणजे गुरू. नुसत्या डोळ्यांनी पाहिल्यास तो किंचित पिवळसर-तांबूस दिसतो. दुर्बिणीतून पाहिले असता तो पौर्णिमेच्या चंद्रासारखा गोलाकार दिसतो व त्याच्या पृष्ठभागावर अस्पष्ट अशा काही समांतर रेषा व डाग दिसतात. आपल्या पृथ्वीला एकच चंद्र आहे. गुरूला बारा चंद्र आहेत. यांपैकी सामान्यतः प्रकाशमान

बिंदूंसारखे चार चंद्र दुर्बिणीतून दिसतात.

शनी हा ग्रह तर खरोखर एक अमोल रत्नच आहे. नुसत्या डोळ्यांनी पाहिल्यास तो किंचित काळसर, पिंगट व धुरकटसा दिसतो. दुर्बिणीतून त्याचे दर्शन आपणांस थक्क करून सोडते! त्याच्या भोवतालची वलये आपले मन आकर्षून घेतात.

आकाशगंगेवर दुर्बीण रोखली तर डोळ्यांना न दिसणाऱ्या लक्षावधी ताऱ्यांचे दर्शन घडते. दुर्बिणीतून ग्रह हे तबकडीसारखे दिसतात; तर तारे प्रकाशबिंदूंसारखे दिसतात. सूर्य हा तारा खूपच जवळ असल्याने तो मात्र गोलाकार दिसतो. त्यावरील कमी तपमान असलेले भाग दुर्बिणीतून पाहिल्यास डागांच्या स्वरूपांत दृष्टीस पडतात. जोडतारे, पिंजलेल्या कापसाप्रमाणे दिसणारे तेजोमेघ, तारकागुच्छ यांचे दर्शनही मनोहर दिसते.

आकाश अनंत आहे. आकाशात दिसणाऱ्या ग्रहगोलांच्या मौजाही अनंत आहेत. त्या किती किती म्हणून पाहायच्या! रोज नित्य नवा आनंद! केव्हा केव्हा या आनंदाला ग्रहण लागते. आकाश मेघांनी झाकळून जाते. मला आनंद देणाऱ्या ज्योतींचे अशा वेळी दर्शन घडत नाही. मी बेचैन होतो. पाहिलेल्या दृश्यांची स्वप्ने रेखाटण्यात माझे मन गुंगून जाते.

असा आहे नित्य नवा आनंद देणारा, मनाला रिझवणारा माझा आकाशदर्शनाचा छंद!



**अभ्यास :**

१. छंद म्हणजे काय? लेखकाला कोणता छंद आहे? त्यासाठी त्याला कशाची मदत घ्यावी लागते?
२. सूर्यमालेतील ग्रहगोल कोणते? या पाठात कोणकोणत्या ग्रहगोलांची माहिती दिलेली आहे?
३. चंद्र, शुक्र, गुरू व शनी या ग्रहांची वर्णने वाचा व त्यांतून प्रत्येक ग्रहासंबंधीचे तुम्हांस आवडलेले एकेक वाक्य निवडा व लिहा.
४. ग्रहगोलांची चित्रे पाहा व त्याप्रमाणे तुमच्या वहीत चित्रे काढा. ग्रहांच्या जवळ ज्यांची त्यांची नावे लिहा.
५. 'मी रात्री पाहिलेले आकाश'—यावर सुमारे पंधरा-वीस ओळींचा निबंध लिहा.



२१

# कुलूप

**श्री. कृ. कोल्हटकर**



**श्री. कृ. कोल्हटकर (जन्म : १८७१, मृत्यू १९३४.) श्री. कृ. ऊर्फ तात्यासाहेब कोल्हटकर यांनी नाटके, कादंबऱ्या, कविता व विनोदी लेख लिहिले. पण प्रामुख्याने नाटककार व विनोदी लेखक म्हणूनच ते विशेष प्रसिद्ध आहेत. 'वीरतनय', 'मूकनायक', 'जन्मरहस्य' ही त्यांची काही नाटके व 'सुदाम्याचे पोहे' हा त्यांचा विनोदी लेखांचा संग्रह प्रसिद्ध आहे. मराठीत विनोदी लेखनाला कोल्हटकरांनीच प्रारंभ केला. 'कुलूप' हा विनोदी लेख 'सुदाम्याचे पोहे' या त्यांच्या पुस्तकातून घेतला आहे.**

**कुलूप सगळ्यांच्याच परिचयाचे आहे. त्याचे विनोदी वर्णन कोल्हटकरांनी कसे केले, ते पाहा. बंडूनाना आणि पांडूतात्या ही कोल्हटकरांनी निर्माण केलेली कल्पित पात्रे आहेत.**

आमच्या बंडूनानांना कुलपांचा मोठा शोक. अनेक धातूंची, अनेक आकारांची, अनेक कळींची कुलपे जमवून त्यांनी एक संग्रहालय बनवले आहे. घरात दूध-दुभत्याच्या कपाटापासून तो तहत पैशाच्या तिजोरीपर्यंत प्रत्येक ठिकाणी त्यांनी कुलपे लावून नाकेबंदी करून टाकली आहे! घरावर एखादा डाका पडणार आहे अशी बातमी कळूनही कोणी इतकी तयारी करत नसेल! बरे, इतका बंदोबस्त करण्याचे कारण विचाराल तर ते आपल्या चीजवस्तूंचे रक्षण व्हावे ही इच्छा नसून, कुलपांचा संग्रह मित्रमंडळींच्या नजरेस पडावा एवढीच आहे. या हव्यासामुळेच बंडूनानांनी काही कड्यांस दोन दोन व काही दारांस दोन्ही बाजूंनी कुलपे लावलेली आहेत.

एवढा खटाटोप करून ठेवल्यामुळे बंडूनानांवर अनेक चमत्कारिक प्रसंगही आले आहेत. एकदा त्यांच्या धान्याच्या कोठीच्या कुलपाची किल्ली त्यांच्या कुटुंबाने हरवली. कुलूप जरा निराळ्या पद्धतीचे असल्यामुळे त्याला किल्ली शोधण्याकरिता त्यांनी सगळा बाजार पालथा घातला, तरी किल्ली मिळेना! बरे, कुलूप लोहाराकडून काढवावे

तर पोटच्या पोरापेक्षाही ममतेने वाढवलेल्या कुलपाची हाडे खिळखिळी होताना पाहणे हे बंडूनानांसारख्यांना जरा दुर्घटच होते. शिवाय गृहस्थ इतका मानी, की त्याने शेजाऱ्यांपाशी कधी पसाभर धान्यही उसने मागितले नव्हते. असो, अशा रीतीने पहिला दिवस तर घरातील सर्व मंडळींनी त्या कुलपानिमित्त कडकडीत उपास काढला. पण त्या दिवशी एकादशी असल्यामुळे उपासाचे सर्व श्रेय धार्मिकपणाकडेच गेले! दुसऱ्या दिवशी द्वादशी. पण तो दिवसही सगळ्यांनी तितक्याच धार्मिकपणाने उपासात काढला. नानांचे तर डोळे पांढरे होण्याची वेळ आली. शेवटी ही सर्व हकीगत कळताच आम्ही स्वतः लोहारास घेऊन नानांच्या घरी गेलो व ते कुलूप एकदाचे फोडले. पण त्यामुळे नानांचा आमच्यावर इतका घुस्सा झाला, की ते पंधरा दिवसपर्यंत आमच्याशी नीटपणे बोलेनातच!

आपल्या उपयोगातील सर्व किल्ल्या बंडूनाना आपल्या जानव्यात अडकवून ठेवत असल्यामुळे त्या कधी हरवत नाहीत. हरवतात त्या बहुतकरून त्यांच्या कुटुंबाच्या ताब्यातल्या किल्ल्या. वरील अनर्थ गुदरल्यापासून साधी बाजारी कुलपेच ते कुटुंबाच्या स्वाधीन करू लागले. ही कुलपे किल्ल्यांच्या बाबतीत काहीच विधिनिषेध बाळगत नसत. त्यांना कोणतीही किल्ली, खिळा, किंवा काडी चालत असे. कधी कधी तर नुसत्या हिसक्यानेच ती उघडत असत. त्यांची अशी 'वसुधैवकुटुंबकम्' वृत्ती पाहून शेवटी नानांच्या पदरच्या एका विश्वासू नोकरालाही चोरी करण्याची इच्छा झाली व तो हजारपाचशेचे डबोले घेऊन पळून गेला.

तिजोरीला कोणते कुलूप लावायचे याचा बंडूनानांना फार दिवस प्रश्न पडला होता. प्रथम त्यांनी अक्षरी कुलूप लावले. पण तिजोरी अंधारात असल्यामुळे कुलपाची अक्षरे जमवताना ती नीट दिसेनातच; म्हणून त्यांनी तिजोरी महत्प्रयासाने उजेडात आणून ठेवली. पण तेव्हापासून अक्षरे जुळवताना ती जवळ उभे राहणारासही दिसू लागली. तेव्हा ती कुलपेही कुचकामाची ठरली. यापेक्षा अक्षरशत्रू कुलपे पुष्कळ बरी, असा आधुनिक शिक्षणावर टोला देत देत त्यांनी त्या कुलपाच्याऐवजी दुसऱ्या कुलपाची योजना केली. हे कुलूप नुसते दाबले की लागत असे. उघडताना मात्र त्याला किल्लीची जरूर लागे. एके दिवशी बंडूनाना आम्हांकडे हर्षित मुद्रेने येऊन म्हणू लागले, "आमच्या आर्यभूमीच्या पुत्रांना कल्पकता नाही म्हणून चोहोकडे ओरड चालू आहे. पण हा आरोप निव्वळ खोटा आहे. अहो, आम्हांला संधी मिळत नाही साधी! ती मिळती तर आम्हांमध्ये शेकडो एडिसन झाले असते." देशाभिमानाच्या

या उकलीचा अर्थ विचारता बंडूनानांनी प्रथम आपली कोणत्याही प्रकारे स्तुती करणार नाही असे आम्हांपासून वचन घेतले. नंतर लोहाराच्या मदतीने त्यांनी स्वतः तयार केलेले एक कुलूप दाखवले. ते म्हणाले, "या कुलपाची कल्पना मला आमच्या तिजोरीच्या कुलपावरून सुचली. या कुलपाचे गुणधर्म त्या कुलपाच्या अगदी विरुद्ध आहेत. त्या कुलपास उघडण्याला किल्ली पाहिजे–याला लावताना मात्र पाहिजे ते कुलूप नुसते दाबून लावता येते–माझे नुसत्या हिसड्यासरसे उघडते. हे कुलूप मी आता तिजोरीला लावून पूर्वीचे काढून टाकणार."

हा अकल्पित प्रकार ऐकून आम्ही नानांचे मन वळवण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; पण ज्याचे नाव ते! नानांच्या अंगी दृढनिश्चय हा एक अलौकिक गुण आहे. 'आपल्या लोकांत कोणत्याही कलेला उत्तेजन नाही' अशी पुटपुट करत त्यांनी ठरलेला बेत लागलीच अमलात आणला. थोड्याच दिवसांत आमच्या अनुमानाप्रमाणे तिजोरीची चोरी झाली, तेव्हा तर नानांचा तिळपापड झाला! ते म्हणाले, "आमच्याकडं चोरसुद्धा देशबुडवे व कलेला आश्रय न देणारे असतात!"

यानंतर नानांनी तिजोरीस घंटेचे कुलूप लावले व ती आपल्या निजायच्या खोलीत नेऊन ठेवली. ते म्हणाले, "आता मात्र चोर माझ्या हाती निःसंशय सापडणार. बेट्याला कळणारसुद्धा नाही, की किल्लीचा प्रयोग सुरू होताच घंटा वाजायला लागून घरातील सर्व मंडळी जमतील व तत्काळ त्याला कोतवालचावडी दिसेल! घंटेच्या आवाजाबरोबर मी ताडकन उठून त्याच्या मानगुटीस बसलोच समजा!" हा विचार आम्हांलाही पसंत पडला.

ज्या दिवशी ते कुलूप लावण्याचा बेत ठरला त्याच दिवशी रात्री आम्हांला घंटानाद ऐकू आल्यामुळे आम्ही बंडूनानांच्या निजायच्या खोलीत गेलो, तो काय चमत्कार सांगावा! बंडूनाना स्वतः उजव्या हाताने तिजोरीचे कुलूप उघडत असून डाव्या हाताने आपलाच उजवा हात जोराने पकडून 'चोर! चोर!' म्हणून ओरडत आहेत.

यानंतर लवकरच आमच्या गावात एक बलुची लोकांची टोळी आली. त्यांच्याजवळ चाकू, सुऱ्या, कुलपे वगैरे बरेच जिन्नस विकण्यासाठी होते. त्यांच्याजवळची बहुतेक कुलपे बंडूनानांनीच विकत घेतली व घरातील सर्व जुनी कुलपे काढून त्यांनी त्यांच्या जागी या नवीन कुलपांची स्थापना केली. कर्मधर्मसंयोगाने एक नाटकमंडळीही याच सुमारास आमच्या गावात आलेली होती. तिचा पहिला प्रयोग 'सुभद्राहरण अथवा चौर्यविपाक' त्याच दिवशी होता. यास्तव आपली सर्व मंडळी बरोबर घेऊन बंडूनाना

निर्भय चित्ताने नाटकाला गेले. जाताना त्यांनी म्हटलेसुद्धा की, 'आता चोरांना म्हणावे, या, कशी चोरी करता ती पाहू. तुमच्या बापजन्मीसुद्धा अशी तऱ्हेतऱ्हेची कुलपे तुम्ही पाहिली नसतील!"

नाटक सकाळी पाच वाजता आटोपले. नाना परत येऊन पाहतात तो सर्व पेट्यांची कुलपे जशीच्या तशी असून आतील माल मात्र चोरीस गेलेला! शोध करता, बलुच्यांचा तांडाही पळून गेलेला आढळला. त्यावरून उघड असे अनुमान निघाले, की बलुची लोकांनी बिचाऱ्या भोळसर नानांकडे आपली सर्व कुलपे खपवून पुढे रात्री अनायासे त्यांनी स्वतःच्याच किल्ल्या चालवून माल लांबवला! सुदैवाने त्या रात्री बंडूनानांचे कुटुंब त्यांच्या ताकिदीस न जुमानता आपले सर्व दागिने अंगावर घालून नाटकाला गेले होते, त्यामुळे तेवढे मात्र बचावले. यापुढे बंडूनानांस नेहमी त्यांच्या कुटुंबाने टोमणा द्यावा की, 'दागिने घालण्याच्या माझ्या हौशीबद्दल आपण सदा मला दोष लावत होता; पण शेवटी आपल्या कुलपांपेक्षा माझ्या हौशीनेच आपल्या मिळकतीचा बचाव केला!'

बिचारे बंडूनाना तरी यावर काय बोलणार? त्यांच्या तोंडाला आपोआपच कुलूप बसले!



नाकेबंदी करणे – येण्याजाण्याच्या वाटा रोखणे; दुर्घट – कष्टाने घडून येणारे, कठीण; विधिनिषेध नसणे – अमुक करावे किंवा करू नये यासंबंधीचे नियम न पाळणे, धरबंद नसणे; वसुधैवकुटुंबकम् वृत्ती — जगातील सर्व लोकांस आपल्या कुटुंबातील माणसांप्रमाणे मानण्याची वृत्ती; कर्मधर्मसंयोग – योगायोग.

**अभ्यास :**

१. नानांनी कोणकोणत्या प्रकारांची कुलपे जमवली होती? का? २. कुलपांच्या नादामुळे त्यांच्यावर बेतलेल्या प्रसंगांपैकी कोणत्या प्रसंगाच्या वाचनाने तुम्हांला फार हसू आले? का? ३. बंडूनानांनी तिजोरीला कोणकोणत्या प्रकारची कुलपे लावली? त्या त्या वेळी कोणते विनोदी प्रसंग घडले? ४. पुढील वाक्प्रचारांचा अर्थ सांगा व त्यांचा वाक्यांत उपयोग करा: घुस्सा होणे, तिळपापड होणे, मानगुटीस बसणे, टोमणा देणे, डोळे पांढरे होणे, तोंडास कुलूप बसणे. ५. फाऊंटनपेन किंवा छत्री यांपैकी एकावर दहा–पंधरा ओळी लिहा.

२२

# सहकारी साखरकारखाना

बाळ गाडगीळ



बाळ गाडगीळ (जन्म : १९२६.) हे अर्थशास्त्राचे प्राध्यापक आहेत. हे कथाकार व विनोदी लेखक असून यांची 'लोटांगण', 'हसत खेळत', 'हसायचं नाही' ही व इतर पुस्तके प्रसिद्ध आहेत.

सहकारी कारखान्यांमुळे महाराष्ट्राच्या लोकजीवनात सुख आणि समृद्धी निर्माण होत आहे. सहकाराची देवता एका हाताने धन व दुसऱ्या हाताने विद्या देत आहे. सहकारामुळे कायापालट होणाऱ्या या समाजाचे चित्र पुढील पाठात रेखाटले आहे.

त्या साखरकारखान्याच्या भव्य प्रवेशद्वारासमोर मी उभा राहिलो आणि माझ्या डोळ्यांवर माझा विश्वासच बसेना!

दोन वर्षे झाली असतील नसतील. मी माझ्या मित्राच्या गावी सुटीत गेलो होतो, तेव्हा आम्ही याच ठिकाणी फिरायला येत असू. ती ही जागा इतकी बदलली असेल हे मला माझ्या मित्राने सांगूनही एरवी पटले नसते. पण डोळ्यांसमोर जे दिसत होते ते नाकारणार तरी कसे?

या जागी अगदी परवा-परवापर्यंत उजाड, बोडके माळरान होते—दृष्टीही पोचणार नाही इतक्या दूरवर पसरलेले. आजूबाजूला माणसांची वस्ती नव्हती. नुसती लहानशी झाडेझुडपे आणि वर निरभ्र आकाश. बाकी काही नाही.

अशा या एका वेळच्या रेताड, निर्मनुष्य जमिनीत चित्रासारखा दिसणारा तो साखरकारखाना आज उभा होता. पूर्वीच्या त्या माळरानाचा मागमूससुद्धा आता कुठे दिसत नव्हता.

मी परत पाहिले. तेथील सारेच वातावरण एका अमाप उत्साहाने फुलून आल्यासारखे दिसत होते. तो सगळा परिसरच गजबजून गेला होता. कारखान्यातली

यंत्रे धडधडत होती. उसाच्या मोळ्या कारखान्यात वाहून नेल्या जात होत्या. तयार झालेली साखरेची पोती गुदामाकडे रवाना होत होती. कामगार, अधिकारीवर्ग हे सारे कसे आपापल्या कामात दंग होते.

कारखान्याच्या आवाराबाहेर दूरवर पसरलेल्या अनेक लहानमोठ्या इमारती दिसत होत्या. कामगारांची व अधिकाऱ्यांची राहण्याची घरे, शाळा, वाचनालय, काहीशा अंतरावर असणारे महाविद्यालय, दुकाने, दवाखाना इत्यादींचे एक नवेच जग निर्माण झाले होते. पूर्वी मी पाहिलेल्या त्या माळरानाचा संपूर्ण कायापालट झाला होता. कसल्यातरी किमयेने त्या माळरानाचे नंदनवन बनले होते. हे सगळे झालेच कसे?

'साखरेचे खाणार त्याला देव देणार' अशी आपल्याकडे एक म्हण आहे. पण येथे हे साखरेचे पीक काही आपोआप निर्माण झाले नव्हते. त्यामागे रात्रंदिवस झटणाऱ्या शेकडो लोकांचे कष्ट व प्रयत्न उभे होते.

महाराष्ट्रातल्या नगर, कोल्हापूरसारख्या जिल्ह्यांत अनेक ठिकाणी ही किमया झालेली आहे.

'एकमेकां साह्य करू, अवघे धरू सुपंथ' या तत्वावर या कारखान्याची उभारणी झालेली आहे. हा कारखाना सहकारी आहे याचा अर्थच असा, की तो कोणा एकाच्या पैशाने किंवा शहाणपणाने चालत नाही आणि त्यापासून मिळणारा फायदाही कोणा एकालाच मिळत नाही. कारखान्याला ऊस पुरवणाऱ्या प्रत्येक शेतकऱ्याची या कारखान्यावर मालकी आहे. कारखान्याच्या कारभारातही त्याचा भाग आहे आणि होणाऱ्या नफ्यातही या सर्वांचा वाटा आहे. हा कारखाना उभारण्यासाठी यांपैकी प्रत्येकाचा हातभार लागलेला आहे. मालकी सगळ्यांची, काम सगळ्यांचे, नफा सगळ्यांचा, जबाबदारी सर्वांची, अधिकारही सर्वांचा असे हे सहकारी तत्व आहे.

या सहकारी साखरकारखान्यांनी साधले तरी काय काय? त्यामुळे शेतकऱ्यांच्या उसाला मागणी येऊन ते सधन झाले; अनेक पिढ्यांच्या गरिबीतून बाहेर पडले—हा तर त्यांचा सहज दिसणारा फायदा आहेच; पण याशिवाय जे अनेक फायदे होतात तेही महत्वाचे आहेत. कारखाना चालवण्यासाठी अनेकांची गरज लागते. यामुळे तेथील परिसरातल्या शेकडो लोकांना कारखान्यात काम मिळते. काम शोधण्यासाठी शहरात जावे लागत नाही. याशिवाय साखर तयार करण्याचे तंत्र जाणणारे लोक, तिचे रसायन जाणणारे तंत्रज्ञ यांना काम मिळते. ऊस वाहून आणणाऱ्या गाडीवानांनाही पैसा मिळतो.

कारखान्याच्या परिसरात राहणाऱ्या लोकांना काय लागत नाही? त्यांना घरे लागतात; अन्नधान्य, कपडेलत्ते, नित्याच्या संसारोपयोगी वस्तू यांची त्यांना जरुरी असते. शिक्षक, डॉक्टर, वैद्य, किराणादुकानदार, सुतार, कुंभार अशा कितीतरी लोकांची जरुरी असते. त्यामुळे या अशा इतर लोकांना काम मिळते आणि यांचा कारखान्याबाहेरील खेड्यांतल्या इतर रहिवाशांनाही लाभ घेता येतो. आसपासच्या सगळ्यांचाच यामुळे फायदा होतो. अशा रीतीने सहकारी वृक्षाच्या या सावलीत अनेकांना विसावता येते. बेकारांना काम मिळते. नव्या सुखसोयी निर्माण होतात. उत्पादन वाढते. आपल्या उपयोगाच्या वस्तू आपण आपल्या देशात निर्माण करू शकतो. याकरिता आपल्याला परक्यांच्या तोंडाकडे पाहावे लागत नाही. शासनालासुद्धा साखरेवरचा उत्पादन-कर मिळतो व आपल्या राज्यकारभाराच्या प्रचंड खर्चासाठी थोडाफार हातभार लागतो.



नगरसारख्या दुष्काळी जिल्हयात अलीकडे फुललेले जे नंदनवन आपल्याला दिसत आहे तो कालव्याच्या पाण्याने घडवून आणलेला चमत्कार आहे हे खरे; पण त्यात सहकाराच्या किमयेचाही भाग आहे हेही तितकेच खरे.

सहकाराच्या कल्पवृक्षामुळे लक्ष्मी आणि सरस्वती खेडुतांच्या घरात आल्या. लक्ष्मी आणि सरस्वती यांचे सख्य नसते असा जो आपल्याकडे समज आहे, तो येथे खोटा ठरला आहे. लक्ष्मीचा हात धरून सरस्वती खेडूत बांधवांच्या परिसरात आली आहे.

नवी विद्या, नवे ज्ञान हे आतापर्यंत शहरातच कोंडल्यासारखे राहिले होते. आता ते मोकळे होऊन खेडयापाडयांत प्रवेश करत आहे. अनेक विद्यालये व महाविद्यालयेही निघत आहेत. सहकाराची देवता एका हाताने धन देत आहे तर दुसऱ्या हाताने विद्या.

सहकार ही देवता आहे आणि तिला प्रसन्न ठेवणे हे खडतर व्रत आहे. काम सर्वांचे आहे. मग इतर ते करतील, मी एकटयाने केले नाही तर बिघडणार नाही असे प्रत्येकाने म्हटले तर या देवतेचा कोप होतो; उलट सहकाराने काम करायचे म्हणजे सर्वांनीच काम करायचे, एकमेकाला समजून घेऊन ते करायचे अशा रीतीने झटून कामाचा फडशा पाडायचा हे या देवतेला प्रसन्न ठेवण्याचे व्रत आहे.

पारध्याच्या जाळ्यात सापडलेले सर्व पक्षी आपली शक्ती एकवटून एकदम उड्डाण करतात आणि स्वतःची सुटका करून घेतात अशी इसापनीतीत एक गोष्ट आहे. दारिद्र्य आणि अज्ञान यांच्या जाळ्यातून जर आपल्याला स्वतःची सुटका करून घ्यायची असेल तर सहकाराचे बळ एकवटणे हाच त्यावरचा उपाय आहे.



**अभ्यास :**

१. सहकारी कारखान्यांमुळे कोणकोणते फायदे होतात ?
२. साखरकारखान्यांमुळे नजीकच्या परिसरात राहणाऱ्या अन्य लोकांनाही काय फायदा होतो ?
३ सहकारी कारखान्यांची उभारणी कोणत्या तत्त्वांवर केलेली असते ?
४. 'लक्ष्मी व सरस्वती यांचे सख्य नसते' हा समज सहकारी कारखान्यांनी कसा खोटा ठरवला आहे ?
५. सहकारी देवतेला प्रसन्न करण्यासाठी कोणते खडतर व्रत घ्यावे लागते ?
६. इसापनीतीतील कोणत्या गोष्टीचा उल्लेख या पाठात केला आहे ? का ?
७. 'सहकाराचे तत्व' तुम्ही आपल्या वर्गात किंवा शाळेत कोणत्या रीतीने अमलात आणाल ?

२३

# जन्मठेपेची शेवटची रात्र

**वि. दा. सावरकर**



**वि. दा. सावरकर (जन्म : १८८३; मृत्यू : १९६६.) यांनी कविता, निबंध, नाटक, कादंबरी आत्मचरित्र असे विविध प्रकारचे लेखन केले आहे. पुढील उतारा त्यांच्या 'माझी जन्मठेप' या पुस्तकातून घेतला आहे.**

**अंदमानातील बंदिवासाच्या अखेरच्या दिवशी त्यांच्या मनात कोणते विचार आले ते या पाठात त्यांनी रेखाटले आहेत.**

ती माझी जन्मठेपेच्या शिक्षेची कारागृहातील शेवटची रात्र होती. ती शेवटची होती हे आता निश्चित करता येत आहे. त्या रात्री ती शेवटचीच आहे असे निश्चित करता येत नव्हते. जर ही रात्र कारागृहातील माझी शेवटचीच—निदान जन्मठेपेच्या या शिक्षेची शेवटचीच रात्र असेल तर....अहाहा—उदया या वेळेस खिडक्या मोकळ्या टाकलेल्या अशा कोण्यातरी चांदणे अंथरलेल्या खोलीत, ज्या झोपेवर वॉर्डरचा पहारा नाही अशी स्वच्छंद झोप मला लागलेली असणार !

त्या रात्री भयंकर थंडी पडली होती. जानेवारी महिना असूनही पावसाची जोराची सर आली होती. आमची पांघरुणे आम्हांस पुरत नसत. दोन चड्डया! दोन कुडती! ती एकावर एक घातली तरी थंडी लागे. इतक्यात ती पावसाची सर ! मागच्या भिंतीच्या खिडकीतून सारखे फवारे आत येऊ लागल्यामुळे खोलीत निजणे अशक्य झाले. कपडे भिजले तेव्हा एका कोपऱ्यात अंग शक्य तितके आकुंचन करून आणि ती अर्धीओली वस्त्रे लपेटून दबून बसलो. तशाच थंडीत डुलक्या घेत असता सकाळ झाली.

बंदिगृहात असताना अशा कोपऱ्यात बसून मी कित्येक रात्री काढलेल्या होत्या. ही शेवटची रात्र ठरली, म्हणून तिची स्पष्ट आठवण राहिली.

सकाळी नेहमीप्रमाणे कार्यक्रम चालला होता. तोच कार्यालयातून पर्यवेक्षकाचे बोलावणे आले. त्याबरोबरच तेथील कोण्या अधिकाऱ्याचा संदेशही आला की, "तुम्ही सुटलात!"

माझ्या सहकारी, सहकष्टभोगी आणि सहचारी असणाऱ्या त्या मित्रांच्या, ज्यांच्या संगतीत अंदमानातील कष्टमय अशी वर्षानुवर्षे काढली त्यांच्या, डोळ्यांत आनंदाश्रू उभे राहिले. पण आमच्या? आमच्या नेत्रांत आणि मनात त्या मित्रांस बंदिगृहातच सोडून आपण सुटतो की काय याची भीती थरथरू लागली! त्यांनी मनःपूर्वक अभिनंदन केले. ते गळ्यात पडले. साठ-साठ वर्षांचे ते शीख बंधू 'बाबूजी, आइये! बाबूजी, हमको भूलना नही!' असे प्रेमळ आदराने म्हणत आम्हांस मिठ्या मारू लागले. ते म्हणाले, "आपण आमच्या आधी सात-सात वर्षे काळे पाणी सोशीत होता; मग आधी सुटलात तर काय झाले? आपली सुटका तीच आमची. तुमच्या सुटकेत आमच्या सुटकेचा मार्ग मोकळा झालाच आहे."

आम्ही म्हटले, "ईश्वर काय शक्ती देईल ते खरं! पण बंधूंनो, ही भयंकर शिक्षा लागली तेव्हा जो जयघोष माझ्या ओठांवर नाचत होता, तोच जयघोष, आजही माझ्या आणि तुमच्या ओठांवर निनादत आहे!—बोला! बोला! स्वातंत्र्यलक्ष्मीकी जय!"

आम्ही सगळ्यांनी स्वातंत्र्यलक्ष्मीचे जयजयकार केले आणि एकमेकांचा निरोप घेऊन कार्यालयात येताच पर्यवेक्षकाने सुटकेची आज्ञा वाचून दाखवली. पाच वर्षांपर्यंत प्रचलित राजकारणात भाग घेऊ नये आणि रत्नागिरी जिल्हयात स्थलबद्धतेत राहावे या दोन मुख्य अटी ठरलेल्या होत्या. त्यांत निवडानिवडीचा प्रश्नच उरलेला नव्हता, आजच्या आज कुठेही न थांबता रत्नागिरीस निघाले पाहिजे म्हणून सांगण्यात आले आणि बंदिवासाचा वेष उतरून आम्हांला घरचे कपडे घालण्यास आज्ञा दिली. जन्मठेपेच्या बंदिगृहातील ही शेवटची 'आज्ञा' होती.

मुंबईस डोंगरीच्या बंदिगृहात १९११ व्या वर्षी हे घरचे कपडे उतरून ठेवले होते. आज १९२४ व्या वर्षी ते पुन्हा अंगावर घातले!

मनास एक प्रकारचा उदास आनंद वाटू लागला. त्या पर्यवेक्षकांनी उदार आणि सरळ मनाने माझे अभिनंदन केले. 'आता मात्र जपा बरं का....' म्हणून अगदी निष्कपट भावाने बजावले.

त्या 'आता मात्र जपा बरं का' या शब्दांतच माझ्या आनंदातील उदासीनतेचे कारण होते.

कार्यालयातील माझे सर्व बंदिवान देशबंधू आणि लहानापासून थोर अधिकाऱ्यांपर्यंत सर्व जण माझ्याभोवती गोळा झाले आणि म्हणाले, "रामाप्रमाणेच चौदा वर्षे वनवास भोगलात. धन्य आहे! आज आपल्या राष्ट्राचा आनंद गगनात मावणार नाही!"



"वनवास भोगला खरा; पण....ते कार्य झाले म्हणजे खरा वनवास संपेल! आणि ईश्वराची दया असेल तर तेही यशस्वी होईल!"

मला नेण्यास माझे आप्तेष्ट आले होते. कारागृहाचे दार उघडले. मी बाहेर पडलो.

माझी सुटका झाली तर! क्षणभर आजूबाजूस पाहिले. मनात म्हटले, या जन्मठेपेतून सुटलो; पण कोणी सांगावे....! बंदिगृहास नित्याचा रामराम ठोकण्याची वेळ

अजून आली नाही. त्याची अगदीच ओळख सोडून सध्याच चालावयाचे नाही. मार्सेलिसलाही असाच एकदा सुटलो–निसटलो होतो ! तसेच हे सुटणेही होणार नाही कशावरून ?

असे मित्रांशी बोलत आणि हासत मोटारीमध्ये बसलो. तिची चाके हालली आणि जन्मठेपेच्या सीमेस उल्लंघून जीवनाच्या सीमेत आम्हांस तिने पुन्हा आणून सोडले.

त्या जीवनाच्या सीमेत पुन्हा पाऊल टाकताच माझे राष्ट्रचे राष्ट्र कृतज्ञ स्वागताच्या प्रेमळ आलिंगनात क्षणभर मला माझाच विसर पाडते झाले. पहिल्याच दिवशी मी माझ्या मायभूमीच्या घरी अगदी घरच्यासारखा वागू लागलो. तिने 'भले वीर!' म्हणून पाठ थोपटताच या जन्मठेपेचे खोल खोल गेलेले यातनांचे सर्व घाव भरून आले.



**अभ्यास :**

१. सावरकरांना जन्मठेपेची शिक्षा का झाली होती ? ही शिक्षा ते कोणत्या तुरुंगात भोगत होते ?

२. सुटकेची बातमी कळताच त्यांच्या मनात कोणकोणते विचार आले ?

३. तुरुंगातील इतर बंदिवानांचा निरोप घेताना ते त्यांना काय म्हणाले ?

४. तुरुंगाच्या बाहेर आल्यावर त्यांना काय वाटले ?

५. सहकष्टभोगी, पर्यवेक्षक, निष्कपट या शब्दांची फोड करून त्यांचा अर्थ सांगा.



२४

# मीठ

**वा. कृ. चोरघडे**



**वा. कृ. चोरघडे (जन्म : १९१४.) हे लघुकथालेखक असून त्यांचे 'सुषमा', 'संस्कार', 'प्रस्थान' इत्यादी कथासंग्रह प्रसिद्ध आहेत. श्री. चोरघडे यांनी किशोरांसाठीही कथा लिहिल्या आहेत. 'चंपाराणी' ही किशोरांसाठी त्यांनी लिहिलेली दीर्घ कथा प्रसिद्ध आहे. 'मीठ' ही त्यांची कथा 'संपूर्ण चोरघडे' या कथासंग्रहातून घेतली आहे.**

**दारिद्र्यामुळे जीवन असह्य होते यात संशय नाही. तरीही सहानुभूतीचे मीठ अशाही जीवनाला चव आणते, हे या कथेवरून तुमच्या लक्षात येईल.**

त्या दिवशी मला अक्षरशः असे वाटले, की मी जर वर हात केला तर तो खात्रीने आभाळाला पुरेल!

आणि तसे का वाटू नये? आज माझ्या हाती दोनशे रुपये होते.

आजचे माझे पैसे! कपाळाचा घाम टिपून भिजलेल्या हाताने ते पैसे मी घेतले होते. चोराने, अप्रामाणिक माणसाने जर त्या पैशांना हात लावला असता, तर त्याचे हात जळण्याइतके प्रखर सत्य व तेज त्या माझ्या पैशांत होते! लोखंडाचे सोने होते किंवा नाही हे मला ठाऊक नाही; पण घामाचा पैसा झालेला मी माझ्या आयुष्यात नेहमी पाहत आलो आहे.

तेच घामाचे पैसे घेऊन मी बाहेर पडलो. जवळच चहाचे दुकान होते. असे वाटले, की जरा चहा घ्यावा. पण छे! त्या गढूळ पाण्यात ते पैसे कसे बुडवायचे? विडा? तो तर चार-दोन मिनिटांत घशाखाली जाईल. जितके दिवस ते पैसे मिळवायला लागले तितके दिवस तरी ते पुरले पाहिजेत ना?

त्या दिवसापर्यंत मी स्वतःला फलाची अपेक्षा न करता काम करणारा मनुष्य समजत होतो. त्याचे फळ आज मला मिळाले. माझीतरी काय एवढी अपेक्षा होती?

जास्त काम केल्याने माणूस मरत नाही. उलट काम टाळल्यानेच एक प्रकारे तो मरतो, हे माझे ठाम मत होते एवढेच!

घरी आलो. बाबा ओटीवर बसले होते. दाराच्या उंबरठ्याजवळ आई तांदूळ निवडत होती. माझी चंपी नावाची कुत्री नाकावर पाय ठेवून डोळे मिटून पडली होती. बाबांच्या चेहऱ्याकडे माझे लक्ष गेले. हजारो सुरकुत्या त्या चेहऱ्यावर पडल्या होत्या. आम्हां तीन भावंडांपायी त्यांना ज्या खस्ता खाव्या लागल्या त्यांची एकेक खूण म्हणून एकेक सुरकुती त्यांच्या चेहऱ्यावर उमटली होती. अगदी निश्चलपणे शून्याकडे दृष्टी लावणारे त्यांचे डोळे खोल विहिरीसारखे दिसत.

मी सरळ जाऊन त्यांच्या पायांवर डोके ठेवले. पैसे त्यांच्या स्वाधीन केले. का न कळे, त्यांनी ते खाली ठेवले आणि ते उगीच त्याकडे पाहत बसले. त्यांच्या डोळ्यांत पाणी चमकले.

आईच्या ते चटकन लक्षात आले; कारण तिचीही अवस्था तशीच झाली होती! तिने संयम केला आणि कठोर मुद्रा करून ती बाबांना म्हणते, "हे काय? आनंद झाला, तरी तो मुलांसमोर दाखवायचा असतो का? दुःख आजपर्यंत दिसू दिलं नाही. आता हा आनंद तरी का असा दाखवता? चल रे पोरा, आत चल...."

एखादा मोठा तेजोगोल दिसावा तसे मला झाले व मी गोंधळून गेलो. जीवनाशी झगडण्याचे आईचे तत्वज्ञान म्हणजे एक अमोलिक देणगी वाटली मला. सुख आणि दुःख हीदेखील ज्याची त्यानेच अनुभवावी. नाही का?

"नाही ग...." बाबा म्हणाले, "मला आनंद तर झालाच, पण वाईटही वाटलं. या पोरानं किती सोसलं हे माझ्या मनात आलं नि मी एकदम धीर सोडला. आता काय त्याच्यापासून लपवून ठेवू? तो आता खांद्याला टेकला आहे."

"मी पुष्कळ सोसलं?" बाबांच्या वाक्याने कधी वाटले नव्हते इतके हायसे मला त्या वेळी वाटले. तेथेच उभे राहून बाबा काय बोलतात ते ऐकावे असे मला वाटले.

बाबा जणू आपल्याशीच बोलत होते, "तसं नव्हे, पण आठवतात त्या गोष्टी कशा विसरायच्या? पाचदहा वर्षांपूर्वीचीच गोष्ट! तू त्या वेळी आठ वर्षांचा होतास. आपल्या घरी चिमणीपुरतेही दाणे नव्हते नि जहर खायलादेखील पैसा नव्हता. सबंध दिवसभर भूक सोसली. मी आणि ही तुझ्याकडं पाहत असू....

"शेवटी तू घरभर फिरलास. फिरून दमलास. हातापायांत त्राण राहिलं नाही. घोंगडी टाकून पडला होतास. तुझी नजर वर गेली. शिंक्यावर घरच्या वेलीचे दोन

लाल भोपळे ठेवले होते. पोटात कावळे तोडत होते. म्हणून ते सुचलं तुला!

"दोन दिवस आपण नुसते भोपळेच शिजवून खाल्ले होते. कसली चव नि कसलं काय! पाण्याला तर आसरा केला! कशा विसरू या गोष्टी? कसे दिवस तुम्ही काढले! आज तू कसा छान दिसतोस. किती चांगले अंगभर कपडे घातले आहेस! पण तू दहाएक वर्षांचा होतास. आपट्यांनी तुला घरकामाची नोकरी, अन्न नि दोन रुपये महिना दिला होता. त्यांच्या घरी पाहुणे येणार होते. तुझ्या अंगातली लक्तरं पाहून बाईसाहेब लाजून जात. तू घरी येऊन आईजवळ रडलास. तिचं पांढरं पातळ फाडलं व त्याचा तुला सदरा शिवला. बाजारू सदऱ्याला त्या वेळीदेखील आठ आणे पडत. असले आठ आणे कित्येक वेळा तू आता खर्चून टाकशील. पोरा, वेळेला मोल असतं. एकेक दिवस....एकेक वेळ."

त्यांना एकदम अवघडले. त्यांनी आवरण्याचा खूप प्रयत्न केला.

बाबा रडतात! त्यांच्या डोळ्यांतून गळणारी ती ऊन ऊन आसवे, ते खारे पाणी! ते मिठाचे थेंब!

समोर मूठभर पैसे पडले आहेत आणि त्यांतून बाबा गतायुष्याची प्रतिबिंबे पाहत आजच्या जीवनाला उजाळा आणत आहेत!

होय, उजाळाच! ते दुःखाचे रडणे नव्हतेच! तसले दुःख हे सुख देणारेच असते. त्या ऊन पाण्याने जीवनाचे फुलबाग फुलतात. मृगाच्या पहिल्या पावसाने कदंबाची झाडे जशी बहरतात तसेच, तसेच!

आज माझ्या श्रीखंडपुरीच्या, दुधासाखरेच्या, तूपलोण्याच्या आयुष्यात त्या मिठाच्या थेंबांना अमोल महत्त्व नाही का?

हे मीठच जीवन अवीट, स्वादिष्ट करत असते!



**अभ्यास :**

१. घामाने मिळवलेल्या पैशाला कोणते तेज चढते?
२. कथानायकाने आपल्या वडलांसमोर पैसे ठेवताच काय घडले?
३. आईच्या बोलांतून कथानायकाला कोणते विचार समजले?
४. 'तसले दुःख हे सुख देणारेच असते.' असे का म्हटले आहे?
५. 'हे मीठच जीवन अवीट, स्वादिष्ट करत असते!' या वाक्याचा अर्थ उदाहरणे देऊन आठदहा ओळींत स्पष्ट करा.



२५

# हुतात्म्यांचा निरोप

**वि. वा. शिरवाडकर**



**वि. वा. शिरवाडकर** (जन्म : १९१२.) हे कवी, नाटककार व कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध आहेत. 'कुसुमाग्रज' या टोपणनावाने हे कविता लिहितात. 'विशाखा', 'किनारा', 'मराठी माती' इत्यादी त्यांचे कवितासंग्रह व 'जान्हवी' आणि इतर काही कादंबऱ्या, 'दुसरा पेशवा', 'ययाती आणि देवयानी', 'वीज म्हणाली धरतीला' ही नाटके प्रसिद्ध आहेत. पुढील नाट्यप्रवेश त्यांच्या 'वीज म्हणाली धरतीला' या नाटकातून घेतला आहे.

राष्ट्राच्या रक्षणासाठी जात, धर्म इत्यादी भेदभाव विसरून सगळेच कसा त्याग करतात, ते इथे दिसते. झाशीची राणी लक्ष्मीबाई हिच्या पराक्रमाचे व राष्ट्रप्रेमाचे या पाठात दर्शन घडते.

[स्थळ : झाशी...किल्ल्याचा तट...काळ : ३ एप्रिल १८५८
वेळ : रात्रीची.
तीनचार जागी लावलेल्या पलित्यांच्या उजेडात तटाचे अस्पष्ट दर्शन होते. तोफेच्या बुरुजावर ठेवलेल्या एका मोठ्या तोफेची आकृती दिसते. कोणीतरी तोफेच्या तोंडावर मान टाकून पडलेले आहे.
पलीकडच्या बाजूस तटावर चारपाच तोफा दिसतात. समोरच्या बाजूस उंच बुरूज असून खाली तटावर येण्यासाठी त्यास पायऱ्या आहेत. तटाच्या खाली सर्वत्र अंधार असून त्यात अधूनमधून ज्वाला उसळताना दिसतात. उजव्या कोपऱ्यात किल्ल्याच्या अंतर्भागात उतरण्यासाठी जिना आहे. मोठ्या तोफेच्या जवळ आणि इतरत्रही दगडविटांचे ढीग पडलेले आहेत. समोरच्या बुरुजावरून दोन मशालजी पुढे येतात. त्यांच्या मागोमाग राणी येते. राणीबरोबर भोपटकर आणि बक्षी आहेत. शिवाय काशी व दोन शिपाई. लांबून कोठून तरी तोफांचे व बंदुकांचे आवाज अधूनमधून ऐकू येतात. राणी लष्करी पोशाखात असून खूपच शिणलेली आहे.]

**राणी** : (पायऱ्या उतरून एका तोफेजवळ उभी राहते आणि क्षणभर स्तब्ध राहून नंतर विव्हलतेने उद्गारते–) माझी झाशी !....माझी झाशी !

बक्षी : राणीसाहेब, निर्णय घ्यायलादेखील आता फारसा वेळ उरलेला नाही. मध्यरात्रीच्या आत आपण आपलं उत्तर कळवायचं आहे.

राणी : पांढरं निशाण चढवायचं, हात बांधून कारभाऱ्यांसह भेटायला जायचं, मुजरे करून माफी मागायची आणि आजन्म देशद्रोहाच्या शपथा घ्यायच्या! शक्य नाही, लालाभाऊ.

नाना : ही अखेरची संधी आहे, सरकार. आमच्यासाठी नव्हे, स्वतःसाठीही नव्हे— आपल्या झाशीसाठी रोजनं पाठवलेला तहनामा आपण मान्य करायला हवा.

राणी : (जीर्ण स्वरात) माझ्या महालक्ष्मीला ठाऊक आहे, की झाशीत होणाऱ्या या प्रत्येक अत्याचाराची जखम माझ्या काळजावर होत आहे....पण तरीसुद्धा नाही....शक्य नाही.

बक्षी : राणीसाहेब, इंग्रजांच्या बलाढ्य लष्कराचा प्रतिकार करण्याची शक्यताही सुतराम उरलेली नाही. पेशव्यांची फौज काल्पीहून आली तेव्हा आम्हांला वाटलं, कातरीच्या दोन पात्यांत आम्ही इंग्रजांचं निर्दालन करू. पण आमचं दुर्दैव! तात्या हटले. शेवटची आशा नष्ट झाली. अशा परिस्थितीतही अजून काही दिवस आम्ही शहर लढवलं. पण कोणीतरी हलकटानं दक्षिण तटावर दगलबाजी केली आणि इंग्रजांची फौज टोळधाडीसारखी शहरात शिरली. आता किल्ल्यात बंदिस्त होऊन लढत राहणं म्हणजे पराभवासाठी अधिक बलिदान देणं आहे. सरकार, आपण जे केलं ते मानवी प्रयत्नांची सरहद्द आहे....आता हे पत्करायला हवं, की आपण पराभूत आणि एकाकी झालो आहोत.

राणी : होय, लालाभाऊ, ही गोष्ट पत्करायलाच हवी की आपण एकाकी झालो आहोत.

बक्षी : आणि पराभूतही.

राणी : (पुढच्या बाजूला येत, सहजतेने) कुणास ठाऊक! मला वाटतं पराभव बाहेरून होत नाही, आतून होतो. (मोठ्या तोफेजवळ येते. तोफेवर मान टाकून पडलेल्या जुलेखाकडे तिची नजर जाते.)

राणी : हे कोण पडलंय इथं? काशी—(मशालजींना खूण करते. मशालजी पुढे येतात. मशालींचा प्रकाश झोपलेल्या जुलेखाच्या अंगावर पडतो.)

काशी : बाईसाहेब, जुलेखा आहे.

राणी : जुलेखा! तीच. बंद पडलेल्या तोफेला मिठी मारून झोपण्याचा वेडगळपणा दुसरं कुणी करणार नाही. (खांद्याला धरून हालवते.)

(जुलेखा जागी होते. चटकन उभी राहते आणि डोळे चोळून पाहू लागते.)

**जुलेखा** : माफ करा सरकार, केव्हा डोळा लागून गेला हे कळलंच नाही.

**राणी** : अग, वाड्यात जाऊन झोपली असतीस तर कोणी फासावर लटकावलं असतं तुला? केव्हापासून या तोफेवर आहेस?

(जुलेखा न बोलता उभी राहते. राणी पुन्हा दोनदा विचारते. जुलेखा एकदम राणीकडे पाहत कृत्रिम निर्विकारतेने–कठोरतेने बोलते.)

**जुलेखा** : दुपारी खुदाबक्ष या 'कडक बिजली'वर मरून पडले तेव्हापासून मी तिचा कबजा घेतला....सरकार....(राणी मान बाजूला फिरवते, क्षणभर स्तब्धता.)

**राणी** : तेव्हापासून तूच तोफेवर होतीस?

**जुलेखा** : होय राणीसाहेब! (स्मित करत) गुलशन टेकडीवरच्या सहा तोफा तिनं निकालात काढल्या. सूर्य कलायला लागल्यावर ती मला म्हणाली....

**राणी** : तोफ तुझ्याशी बोलली?

**जुलेखा** : होय, सरकार. आपल्याला नवल वाटेल, पण खरंच तोफ माझ्याशी बोलते. गप्पा मारते....हसते....मस्करी करते आणि केव्हा धुसमुसून रडतेदेखील. या कडक बिजलीची माझ्यावर अतोनात मोहबत आहे.

**राणी** : मग काय सांगितलं तिनं तुला?

**जुलेखा** : मला जवळ बोलावून ती म्हणाली–सहेली, समोरच्या टेकडीवर ते जुनाट घर आहे ना, त्याच्या कौलारावर एक प्रचंड काळं गिधाड बसलेलं आहे.... तांबडेलाल डोळे असलेलं ते गिधाड सारखं नजर बांधून झाशीकडं पाहत आहे.

**राणी** : कडक बिजलीचं भविष्य खरं ठरलंय, जुलेखा!....शहर शत्रूनं काबीज केलंय.

**जुलेखा** : (ओरडते) कोणत्या हरामजादयानं फितुरी केली? (स्वर उतरवून) माफ करा राणीसाहेब; पण फितुरीशिवाय असं होणं शक्य नाही.

**राणी** : फितुरी झाली हे खरं आहे. पण त्यामुळं मरण चार दिवस अगोदर आलं, एवढंच.

**जुलेखा** : मग कडक बिजलीचा जलसा पुन्हा सुरू करायला हवा. मी कोठाऱ्याला आणि शिपायांना बोलावून घेते.

**राणी** : काही उपयोग नाही, जुलेखा. शहरातल्या इंग्रजांवर तोफा डागणं म्हणजे आपल्याच लोकांना मारण्यासारखं आहे. आधीच रक्तबंबाळ झालेल्या माझ्या झाशीवर आणखी वार करण्यासारखं आहे. किल्ल्यावर येऊ पाहणाऱ्या इंग्रजांना

हटवण्याचं काम पूर्व तटावरील तोफखाना करत आहे. रात्री गरज पडल्यास इकडच्या तोफा सुरू करू. पण तू जा आता आणि जेवण करून झोप जरा.

**जुलेखा :** माणसं इतकी दगलबाज होऊ शकतात! माझं डोकं बेभान व्हायला लागलंय, सरकार.

**राणी :** म्हणूनच म्हणते, वाड्यात जा. दोन घास पोटात घाल आणि जरा विसावा घे. अग, वज्रदेही पुरुषालादेखील झेपणार नाही इतका शीण घेतला आहेस तू. किल्ल्याच्या बाहेर जायचं झालं तर तुला माझ्याबरोबर यावं लागेल कदाचित.

**जुलेखा :** कदाचित? मला दूर केलंत तर अगोदर छाती फोडून प्राण देईन तुमच्या-समोर!

**राणी :** (स्मित करून) अजून कुठलाच निर्णय घेतला नाही, म्हणून म्हटलं कदाचित. जा आता. (आतील बाजूला आरडाओरड होते.) कसली गडबड आहे ही? (वाड्याच्या बाजूने देशमुख एका माणसाला धक्के मारत आणतो. बरोबर शिपाई आणि मशालजी. राणी एकदम वळते. जुलेखा तोफेजवळ मागे जाते. बक्षी-भोपटकर मागच्या बाजूला दूर असतात; ते राणीच्या जवळ येऊन उभे राहतात. देशमुख संतापाने धक्का मारून त्या माणसाला राणीसमोर आदळतो. तो धडपडत उठत असताना...)

**देशमुख :** या बदमाषानं फितुरी केली, राणीसाहेब, यानं घुसवलं शहरात इंग्रजांना. (तो माणूस राणीकडे हिंस्र नजरेने पाहत उभा राहतो. क्षणभर स्तब्धता.)

**राणी :** (दुखावलेल्या स्वराने) रायसिंग ठाकूर!

**देशमुख :** यानंच इंग्रजांशी संगनमत करून दक्षिणेच्या तटावर खोटे हुकूम पाठवले आणि तिथं पांढरा पटका लावून शत्रूला शिडी लावायला मोकळीक दिली.– चार गावच्या जहागिरीचा तुकडा चघळायला मिळावा म्हणून! हरामजादा कुत्तरडा! एक दगलबाजी पचली म्हणून दुसरी करण्यासाठी हा किल्ल्यावर आला जखमी झाल्याचं सोंग घेऊन. त्याच मार्गानं हा किल्लाही इंग्रजांच्या हवाली करून देण्याचा करार केला होता यानं. पळून चालला होता किल्ल्यातून. माझ्या शिपायांनी धरला त्याला.

**राणी :** किती विश्वास होता माझा या माणसावर! रायसिंग, गुन्हा मान्य आहे तुम्हांला?

**रायसिंग :** होय, मान्य आहे!

**राणी :** पण का केलंत हे?

**रायसिंग :** (पिसाटपणाने) मला मरायचं नाही तुमच्याबरोबर! मला जगायचं आहे! तुझ्यासारख्या बेवकूफ—

**बक्षी :** (ओरडून) जबान आवर....बदमाष !

**राणी :** देशमुख, त्याला घेऊन जा आणि कैदखान्यात ठेवा. या गोष्टीचा शीण माझ्या मनाला आता नको आहे.

**देशमुख :** पण राणीसाहेब—

**राणी :** (स्वर चढवून) घेऊन जा त्याला! कैदखान्यात पहारा बसवा आणि इकडं या.

**देशमुख :** आज्ञा राणीसाहेब.

(देशमुख रायसिंगाला घेऊन आतल्या बाजूस जातो. शिपाईही त्याच्याबरोबर जातात. रंगमंचावरून ते दृष्टिआड होताच जुलेखा पट्ट्यातील पिस्तूल काढते आणि गोळी झाडून रायसिंगाला मारते. रायसिंगाची प्राणांतिक किंकाळी आणि जिन्यापाशी कोसळल्याचा आवाज ऐकू येतो.)

**राणी :** जुलेखा !

**जुलेखा :** माफ करा सरकार. हवं तर मला ठार मारा. पण कोणाच्याही तोंडून तुमची बेअदबी मी ऐकून घेणार नाही. आपण राणीसाहेब आहात. आपल्याजवळ दया आहे....असायला हवीही. पण मी साधी शिपाई आहे. माझ्याजवळ फक्त हत्यार आहे.

**राणी :** काशी, तू देशमुखांबरोबर जा आणि रायसिंगाची माणसं असतील त्यांना वर्दी देण्याची व्यवस्था करा. देशमुख, रायसिंग फितूर असले तरी आमचे मानकरी होते. योग्य इतमामानं त्यांचा अंत्यसंस्कार व्हायला हवा.

(काशी, देशमुख व शिपाई जातात.)

**राणी :** जुलेखा, तू झोप नसल्यामुळे बेभान झाली आहेस हे मला ठाऊक आहे। म्हणून या गुन्हेगारीची गय करते तुला. पण एक ध्यानात ठेव....ज्यांच्याजवळ नुसती हत्यारं असतात त्यांना शासन करण्याचा अधिकार नसतो. ज्यांच्याजवळ दया आहे आणि शस्त्रही आहे त्यांनीच शासन करावं असा कायदा आहे. जा तू आणि झोप आता.

(जुलेखा खाली मान घालून जाते.)

**नाना :** राणीसाहेब, माफ करा. तुमच्याबद्दल आम्हां सर्वांना भक्ती आहे. पण आपल्या सखीसेनेतील बायकांचा हा बेशिस्तपणा सर्वच कारभाऱ्यांना असह्य झाला आहे. त्यांनी अभूतपूर्व पराक्रम केला आहे, आजही त्या करत आहेत,

हे खरं आहे. पण पराक्रमानं शहाणपणाऐवजी आततायीपणाचा आश्रय घेतला तर त्यातून राजकारण होत नाही; नुसता गोंधळ होतो.

**राणी :** हे राजकारण नाही नाना, हे फक्त युद्ध आहे. भारतात स्वकीयांची सत्ता पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी सुरू झालेलं हे भारतीय युद्ध आहे. राजकारण हा शांततेचा दागिना आहे, नाना. पण युद्ध चालू असताना चालू असतं ते फक्त युद्धच. ब्रिटिशांच्या दास्याविरुद्ध पहिली आरोळी मारली ती दिल्लीच्या तख्तावर बसलेल्या बहादूरशहानं नव्हे; तर बराकपूरच्या पलटणीतील एका सामान्य शिपायानं—मंगल पांडेनं. ही–ही जुलेखा....मी रागावले तिच्यावर. ....पण तिला हा उद्योग कशाला हवा होता? ही वेडी माणसं नेमधर्मानं वागत नाहीत, हे आपण ध्यानात घ्यायला हवं. खरं सांगायचं तर मला तरी ही उठाठेव कोणी सांगितली होती? पाच हजारांचा तनखा घेऊन देवघरात पूजाअर्चा करत बसले होते मी. पण पाहता पाहता माझ्या देवघरातल्या देवानं वेगळं रूप घेतलं आणि या वेडाची मला दीक्षा दिली. आपण सारेच वेडे आहोत, नाना. या वेडाचं रक्षण करणं एवढंच आज आपलं कर्तव्य आहे. आणि म्हणूनच, शरण जाणं हा शहाणपणाचा मार्ग असला तरी तो मला मानवणार नाही.

**बक्षी :** राणीसाहेब, हा मार्ग आम्हीही सुखानं सुचवत नाही. दुसरं काहीच करता येण्यासारखं नाही आता. आपण जो लढा दिला त्याला तोड नाही. साक्षात भवानी देवी पंधरा दिवस अवतरून गेली आमच्या डोळ्यांसमोर!

**राणी :** मला प्रशंसा नको आहे, बक्षीसाहेब. मला धीर हवा आहे या घटकेला पुढं जाण्यासाठी.

**बक्षी :** पुढं जाण्याची वाट बंद झाली आहे, राणीसाहेब. इंग्रजांच्या बलाढ्य फौजेचा वेढा चारी दरवाजांबाहेर बसला आहे. सैतानदेखील त्यातून पलीकडं जाऊ शकणार नाही.

**राणी :** (स्मित करत) सैतान जाणार नाही, पण झाशीची राणी जाईल....

(एक शिपाई येतो, मुजरा करतो.)

**राणी :** काय रे?

**शिपाई :** बातमी फार वाईट आहे, सरकार.

**राणी :** सांग, काहीही ऐकायला तयार आहे मी.

**शिपाई :** गुलाम गौसखांसाहेब—

राणी : ठार झाले ?

शिपाई : होय सरकार.

(क्षणभर स्तब्धता)

राणी : धनगरज बंद पडली ?

शिपाई : नाही, सरकार. मुंदरबाईंनी तोफ चालू ठेवली आहे. बाकीच्या लहान तोफाही चालू आहेत.

राणी : गौसखां तोफेजवळ मारले गेले ?

शिपाई : तोफेवरती सरकार ! गणेशतटावर शत्रूंनी जोर केला आहे. गौसखांसाहेबांनी मारा करायची शिकस्त केली. फिरंग्यांच्या कित्येक तोफा बंद पाडल्या आणि दरवाजावर धडका देणारे अनेक रिसाले मारून काढले. पण एका गोळ्यानं अचूक टिपलं त्यांना. तोफेवरतीच कोसळले ते. आपल्याला कुर्निसात करून खुदाच्या घरी गेले. अखेरचा निरोप द्यायला सांगितला त्यांनी.



राणी : काय तो ?

शिपाई : पांढरं निशाण लावू नका. किल्ल्यावरून तावडतोब बाहेर पडा आणि काल्पीला जा.

**राणी :** ठीक आहे. खांसाहेब्रांचा देह तावडतोब किल्ल्यात न्यायला सांगा.

**शिपाई :** नेला आहे तो.

**राणी :** मुंदरला म्हणावं, गणेशतटावरचा कारभार तुझ्याकडं. मी तिकडं येईपर्यंत तोफा चालू राहिल्या पाहिजेत.

**शिपाई :** आज्ञा, सरकार. (शिपाई जातो.)

**राणी :** ऐकलंत नाना, लालाभाऊ ? गौसखांचा निरोप आहे मला. तोफेच्या गोळ्यानं शरीराच्या चिंधड्या झाल्यावरही हा निरोप पाठवला त्यांनी ! एकट्या गौसखांचा निरोप नाही हा. बराकपूरच्या बंडापासून या घटकेपर्यंत कामाला आलेल्या हजारो हुतात्म्यांच्या रक्ताचा हा निरोप आहे....लक्ष्मीला....झाशीच्या राणीला. पांढरं निशाण लावू नकोस ! नाही लावणार ! (मान खाली वाकवून संथ स्वरात—) गौसखां, मला पवित्र असलेल्या सर्व गोष्टींची शपथ घेऊन सांगते, मी पांढरं निशाण लावणार नाही ! काल्पी माझ्याकडं येऊ शकत नसेल तर मी काल्पीकडं जाईन—मध्यरात्र उलटण्याच्या आत, आणि कुडीत प्राण आहे तोपर्यंत हा संग्राम चालू ठेवीन !

(शपथ घेत असतानाच प्रकाश मंदावत जातो.)

सुतराम—सर्वथा, अगदी; कडक बिजली—तोफेचे नाव; घनगरज—तोफेचे नाव; बेवकूफ—मूर्ख; कुर्निसात करणे—कमरेत वाकून अदबीने विशिष्ट प्रकारे अभिवादन करणे.

**अभ्यास :**

१. बक्षीने राणी लक्ष्मीला कोणता सल्ला दिला ? का ?
२. राणीच्या आज्ञेविरुद्ध जुलेखाने रायसिंगावर गोळी का झाडली ?
३. राणीने जुलेखाच्या गुन्ह्याची गय का केली ?
४. 'आपण सारेच वेडे आहोत, नाना.' असे राणी का म्हणते ?
५. मरताना गौसखांने राणीला कोणता निरोप दिला ? त्याचा परिणाम काय झाला ?
६. खाली दिलेली वाक्ये कोणी उच्चारली आहेत ? का ? (अ) पराभव बाहेरून होत नाही, आतून होतो. (आ) माणसं इतकी दगलबाज होऊ शकतात ? (इ) ज्याच्याजवळ नुसती हत्यारं असतात त्यांना शासन करण्याचा अधिकार नसतो. ज्यांच्याजवळ दया आहे आणि शस्त्रही आहे त्यांनीच शासन करावं असा कायदा आहे. (ई) राजकारण हा शांततेचा दागिना आहे, नाना.
७. या पाठाला 'हुतात्म्याचा निरोप' असे नाव का दिले आहे ? दुसरे कोणते नाव देता येईल ?
८. राणी लक्ष्मीच्या मनाचा मोठेपणा दाखवणारी या नाट्यप्रवेशातील वाक्ये निवडून ती तुमच्या वहीत लिहा.

२६

# हजरत मुहम्मद पैगंबर



**साने गुरुजी**

**पांडुरंग सदाशिव साने (जन्म:१८९९ ; मृत्यू : १९५०.) गुरुजींचे जीवन म्हणजे त्याग, सेवा, भक्ती, परोपकार, श्रद्धा असल्या दुर्मिळ गुणांनी नटलेले असे निर्मल, निरहंकारी जीवन. मुलांचे आवडते लेखक. त्यांची 'श्यामची आई' ही कादंबरी व इतर अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत.**

**हजरत मुहम्मद पैगंबर अत्यंत क्षमाशील होते. स्वतःवर अपकार करणाऱ्यांवरही त्यांनी उपकारच केले ! त्यांच्या जीवनातील काही विशेष घटना येथे दिल्या आहेत.**

इस्लाम धर्माचे संस्थापक हजरत मुहम्मद पैगंबर यांचे जीवन आदर्श होते. ते सर्वांशी प्रेमळपणाने वागत. स्वतःवर अपकार करणारांवरही त्यांनी उपकारच केले. आपापसात भांडणारांस त्यांनी एक केले. हा महापुरुष धैर्याने सारे अडथळे दूर करून पुढेच जात राहिला. ईश्वरावर त्यांची अढळ श्रद्धा होती. त्यांच्या मोठेपणाच्या कितीतरी गोष्टी आहेत. त्या गोष्टींतून त्यांचे कोमल व सुसंस्कृत मन प्रकट होते.

हजरत मुहम्मद समानतेचे व लोकसत्तेचे भोक्ते होते. त्यांच्या लोकसत्तेच्या गर्जनेने राजेमहाराजे व धर्मोपदेशक गडबडून गेले. त्या वेळेस जुलमी संस्था व पंथ यांचा बुजबुजाट झाला होता. अशा वेळी पैगंबर आले. त्यांनी ही मिरासदारीची भिताडे साफ पाडली. स्वार्थी लोकांनी ईश्वराकडे जायच्या रस्त्यावर जी जाळी विणून ठेवली होती, ती पैगंबरांनी आपल्या जोरदार फुंकरीने नष्ट केली. हजरत मुहम्मद म्हणतात—परमेश्वराजवळ तुम्ही सारे निर्धास्तपणे जा. तेथे सारे समान आहेत.

ईश्वरी शासनाविषयीची त्यांची कल्पना समतेवर आधारलेली होती. भूतदयेविषयी ते नेहमीच उपदेश करत असत. अशाच एका प्रसंगी ते म्हणाले, "ईश्वरानं पृथ्वी निर्माण केली व ती हालू नये म्हणून तिच्यावर पर्वत ठेवले. तेव्हा देवदूतांनी ईश्वराला विचारले, 'तुझ्या सृष्टीत पर्वताहून बलवान कोण?'

‘लोखंड. कारण ते पर्वतांनाही फोडतं.’
‘आणि लोखंडाहून बलवान कोण?’
‘अग्नी. कारण अग्नी लोखंडास वितळवतो.’
‘आणि अग्नीहून प्रबळ कोण?’
‘पाणी. पाण्यानं अग्नी विझतो.’
‘ पाण्याहून प्रबळ कोण?’
‘वारा.’
‘आणि वाऱ्याहून?’
‘दान देणारा सज्जन. उजव्या हातानं दिलेलं दान डाव्या हातालाही जो कळू देत नाही असा दाता! तो या सर्वांहून प्रबळ आहे.’ ”

त्यांच्या भूतदयेच्या कल्पनेत सारे काही येई. ते म्हणत असत, “प्रत्येक सत्कर्म भूतदयाच आहे. तुम्ही आपल्या भावासमोर प्रेमानं व प्रसन्न मुद्रेनं हसलात तरी तीही एक प्रकारची भूतदयाच आहे. दुसऱ्यानं सत्कार्य करावं म्हणून कधी रागानं बोललात तर तीही भूतदयाच. रस्त्यातील दगडधोंडे, काटेकुटे दूर करणं ही सारी भूतदयेचीच कामं होत. या जगात जे काही कराल, तेच परलोकी आपल्याबरोबर येईल. मनुष्य गेल्यावर लोक विचारतात, ‘त्यानं किती मालमत्ता आपल्यामागं ठेवली आहे!’ पण देवदूत मात्र असं विचारत नाहीत. ‘त्यानं आपल्या आयुष्यात किती सत्कार्यं केली आहेत?’ असंच देवदूत विचारतात.”

एकदा पैगंबरांच्या एका शिष्याची आई वारली. त्याने पैगंबरसाहेबांना विचारले, “हजरत, आईच्या आत्म्याला शांती मिळावी म्हणून मी काय करू? कोणतं दान देऊ? सर्वांत उत्कृष्ट असं दान कोणतं?”

तेव्हा ते म्हणाले, “हे बघ! आपल्या या वाळवंटात पाण्याची किती टंचाई आहे! आईची आठवण म्हणून तू इथं एखादी विहीर खणलीस तर तहानलेल्या जिवांना आपली तहान भागवता येईल. ते तुला व तुझ्या आईला दुवा देतील.”

पैगंबर जसे बोलत तसेच वागत. क्षमा करण्याविषयी व भूतदयेविषयी त्यांनी केवळ उपदेशच केला नाही; तर त्याप्रमाणे ते स्वतः वागलेदेखील. प्रत्यक्ष त्यांच्या पोटच्या पोरीचा कुरेश हब्रार नावाच्या माणसाने खून केला. हजरत पैगंबर त्याला शिक्षा करू शकले असते. पण त्यांनी हब्रारला क्षमाच केली!

आपल्या आयुष्याच्या शेवटच्या कालखंडामध्ये हजरत पैगंबरांना असे वाटू लागले,

की आता आपले अवतारकार्य पूर्ण झाले आहे. मक्केची शेवटची यात्रा करून यावे, असे त्यांच्या मनात आले. इ. स. ६३२ च्या फेब्रुवारीच्या २३ तारखेस ते निघाले. त्यांच्याबरोबर लाख-दीडलाख यात्रेकरू होते. त्यांना अखेरचा उपदेश करताना ते म्हणाले, "बंधूंनो, मी आज सांगतो ते ऐका. आणखी एखादं वर्ष मला लाभेल असं वाटत नाही. या जागी पुन्हा तुमच्यात मी दिसेन, वावरेन, बोलेन असं वाटत नाही. हा आजचा दिवस व हा महिना जसा सर्वांना पवित्र वाटतो त्याप्रमाणं सर्वांचं जीवन व मालमत्ता पवित्र माना. तुम्ही एकमेकांचं जीवन पवित्र माना. एकमेकांना सांभाळा. ईश्वरासमोर जाण्याची वेळ येईपर्यंत असं प्रेमानं व बंधुभावानं वागा. कोणाच्या प्राणाचा व घरादाराचा नाश करू नका. तसंच तुमच्यावर कोणी विश्वास टाकला तर त्याचा विश्वासघात करू नका. दिलेला शब्द पाळा. पाप टाळा. एके दिवशी ईश्वराच्या न्यायासनासमोर उभं राहायचं आहे, हे कधीही विसरू नका. त्या दिवसाची नेहमी आठवण ठेवा. तिथं सर्व कृत्यांचा झाडा द्यावा लागेल.

"मित्रांनो, माझे शब्द ऐका, नीट समजून घ्या. तुम्ही सारे जण एकमेकांचे भाऊ आहात, हे कधीही विसरू नका. तुमचं सर्वांचं एक जणू भ्रातृमंडळ आहे."

असे हे प्रवचन बराच वेळ चालले होते. साधे, सरळ, कळकळीचे, वक्तृत्वपूर्ण असे ते प्रवचन होते. भावनाप्रधान श्रोत्यांची अंत:करणे उचंबळत होती; थरारत होती. प्रवचन संपल्यावर पैगंबरांनी पुढील शब्दांनी शेवट केला—

"प्रभो, मी माझा संदेश दिला. मी माझं कार्य पुरं केलं आहे. प्रभो, माझ्या कामाला तुझीच साक्ष. दुसरं मी काय सांगू ? हीच माझी प्रार्थना !"



**अभ्यास :**

१. ईश्वराकडे जाण्यासाठी पैगंबरांनी कोणता मार्ग सांगितला आहे ?
२. पैगंबरांनी आपल्या शिष्याला विहीर बांधायला का सांगितले ?
३. पैगंबरांनी केलेल्या लोकसत्तेच्या गर्जनेचा कोणता परिणाम झाला ?
४. भूतदयेविषयीचे पैगंबरांचे मत स्पष्ट करा.
५. त्यांनी दानाचे कोणते महत्त्व सांगितले आहे ?
६. (अ) पैगंबरांच्या प्रवचनातील तुम्हांला विशेष आवडलेली वाक्ये कोणती ? ती वहीत लिहा.
   (आ) श्रीकृष्ण, महावीर, बुद्ध, येशू, झरतुष्ट्र या थोर विभूतींची वचने तुमच्या वाचनात आल्यास तीही याच वाक्यांखाली लिहून ठेवा.
७. 'आपण सारे भाऊ भाऊ' हे साने गुरुजींचे पुस्तक वाचा.

२७

# वाळवंटातील हिरवळ

**रा. गो. साळवी**



मेजर रा. गो. साळवी (जन्म : १९१६.) दुसऱ्या महायुद्धात यांनी प्रत्यक्ष भाग घेतला होता. टोब्रुकच्या लढाईत दोस्त-राष्ट्रांचा पाडाव झाला. त्या वेळी हे जर्मनीचे युद्धकैदी झाले. तेथून त्यांनी मोठ्या युक्तीने व शिताफीने आपली सुटका करून घेतली. ते इटलीत गेले. शत्रूचे सैन्य सभोवार असल्यामुळे त्यांना अत्यंत खडतर जिणे जगावे लागले. अशा खडतर परिस्थितीत इटलीतील लोकांनी त्यांना मदत केली.

मेजर साळवी यांनी या खडतर जीवनाच्या आठवणी पुस्तकरूपाने लिहून ठेवल्या आहेत. 'स्वाधीन की दैवाधीन' हे त्या पुस्तकाचे नाव. 'वाळवंटातील हिरवळ' हा उतारा या पुस्तकातून घेतला आहे.

हा मे महिन्याचा पहिला आठवडा होता. जर्मनांनी गावात अधिकच कडक बंदोबस्त ठेवला होता. गावाभोवती ते रात्रंदिवस गस्त घालत. डोंगराकडच्या बाजूची तर ते सर्वांत जास्त काळजी घेत. डोंगरावर येणाऱ्या धनगरांवर जर्मन सैनिकांनी अतिशय कडक बंधने घातली होती. इतकेच नव्हे तर त्यांच्यापैकी काही जण डोंगरावर येऊनही गस्त घालत.

असाच एक दिवस. मी सूर्यास्तापूर्वी अर्धा-पाऊण तास माझ्या गुहेच्या बाहेर थोड्या अंतरावर सहज येऊन बसलो होतो. इतक्यात माझ्यापासून अर्ध्या-पाऊण मैलाच्या अंतरावर पायथ्यापाशी काहीतरी गडबड झाल्याचे मला ऐकू आले. मी लगेच दुर्बिणीने पाहिले. टॉमीगन्स घेतलेले दोन सैनिक वर येताना मला दिसले. त्यांनीही बहुधा त्याच वेळी मला पाहिले असावे. क्षणार्धात त्यांनी टॉमीगन्सची एक फैर झाडली. गोळ्या माझ्या डोक्यावरून सूं-सूं करत गेल्या मी घाबरलो व तेथून पळतच माझ्या गुहेत जाऊन बसलो.

थोडा वेळ मी तेथे तसाच बसून होतो. इतक्यात त्या दोघांपैकी एक जण मी ज्या खडकातील पोकळीत लपलो होतो त्याच खडकावर नेमका येऊन चढला ! मी त्याला दिसत नव्हतो, परंतु फटीवरच्या झुडपांच्या पानांतून तो मात्र मला दिसत होता. ती जागा उंचावर असल्याने तेथे उभा राहून तो सभोवारच्या भागाची पाहणी करत असावा. तेथून दूर अंतरावर असलेल्या त्याच्या दुसऱ्या साथीदाराला तो मोठ्याने ओरडून जर्मन भाषेत काहीतरी सांगत होता. ते मला स्पष्ट ऐकू येत होते; पण समजत मात्र नव्हते. तेवढ्यात त्याने एक टॉमीगन्सची फैर झाडली. मी श्वास रोधून बसलो होतो. माझ्या छातीवरच जणू काही तो काळदैत्यासारखा उभा राहिला होता. जर त्याची नजर पायांखाली वळली असती किंवा नुसता संशय जरी त्याला आला असता तर माझी जीवनयात्रा त्या गुहेतच संपून गेली असती.

माझ्याजवळ असलेली बायबलची छोटीशी प्रत धडधडत्या छातीशी धरून मी एक एक क्षण मोजत पडून राहिलो. पण खरोखरीच आकाशातल्या रथातून जाणाऱ्या त्या लक्ष्मीकेशवांचे लक्ष माझ्याकडे होते. माझ्या पुण्यशील वडलांचे आशीर्वाद माझ्या पाठीशी होते. थोडया वेळाने तो जर्मन यमदूत त्या खडकावरून उतरला व आला तसाच निघून गेला. मी सुटकेचा निःश्वास टाकला; अर्थात तो जर्मन सैनिक ऐकू येण्याच्या अंतरापलीकडे गेल्यावरच! माझ्यापासून अवघ्या दोन पावलांच्या अंतरावर काळ आला होता; परंतु वेळ आली नसल्यामुळे तो परत गेला.

ते दोघे निघून गेल्यावरही मी लगेच तेथून हाललो नाही. बऱ्याच वेळाने, म्हणजे रात्री साडेआठच्या सुमारास मी उठून आमच्या सांकेतिक झऱ्यावर गेलो. इतर पाच जणांनी टॉमीगन्सच्या फैरीचा आवाज ऐकलाच होता. त्यांनाही तो काय प्रकार आहे याची उत्सुकता व थोडी भीतीही वाटत होती. एकमेकांना सुरक्षित पाहून प्रथम सर्वांनाच फार आनंद झाला. नंतर मी माझ्यावर गुदरलेला प्रसंग सांगितला. जर्मनांच्या हालचालींवरून आपले सैन्य जवळ येत असावे व गाव सोडून जाण्यापूर्वी शक्य तर आपल्याला पकडावे अशी जर्मनांची अखेरची धडपड चालली असावी असा माझा अंदाजही त्यांना सांगितला.

या प्रसंगानंतर दुसऱ्याच दिवशी मला डोंगरात दूर अंतरावर एक मेंढपाळ मुलगा दिसला. तो जर्मनांचा डोळा चुकवून डोंगराच्या दुसऱ्या बाजूने आला असावा. आमच्यापैकी एकाला पाठवून मी त्याला बोलावून घेतले. त्याने आम्हांला गावात चाललेल्या जर्मनांच्या अत्याचाराबद्दल माहिती सांगितली. तो म्हणाला, "गावात

जर्मनांनी थैमान घालण्यास सुरुवात केली आहे. तुम्ही येथून गेल्यावर एके दिवशी त्यांनी रोमानोला याच झऱ्यावर आणले. त्याच्या अंगावरचे कपडे काढून त्यांनी त्याच्या उघडया शरीरावर बेदम मार दिला. त्या वेदनांनी तो ढसढसा रडत होता; पण त्याने तोंडातून चकार शब्द काढला नाही. आम्ही हे सर्व दुरून पाहत होतो."

त्या मुलाच्या तोंडून ती हकीकत ऐकून माझे मन पिळवटून गेले. रोमानोने माझ्यासाठी–आमच्यासाठी–हे सारे का सहन करावे? कोणाच्या तरी मनात देव उभा राहतो असे मी ऐकले होते; पण तो देव असा ठाम उभा राहतो हा अनुभव मला तरी अलौकिक होता! यापुढे आता किती दिवस स्वतःच्या आणि या साऱ्यांच्या सहनशक्तीचा अंत पाहायचा,हा प्रश्न माझ्या मनात उभा राहिला. पायाखालची वाळू सरकत असल्यासारखे वाटत होते. आता तोल सांभाळणे कठीण होते. अन्नाशिवाय, कपडयांशिवाय, दऱ्याखोऱ्यांत–रानावनात लपूनछपून जीव जगवण्याचा कंटाळा आला होता. त्याच मनःस्थितीत मी अदलीनाला एक पत्र लिहिले आणि ते अदलीनाला पोहोचवण्याठी रोमानो किंवा सीरिओ यांच्या हाती दयायला त्या मुलाला सांगितले.

पत्रात मी लिहिले होते, 'अदलीना, आमच्या या सध्याच्या जीवनाचा आता आम्हांला अगदी उबग आला आहे. रोमानोची भेट नाही. गावातून येणारे धनगरही यायचे बंद झाले. गावात येण्याची तर सोयच नाही. अशा स्थितीत असले दिवाभीताचे जीवन जगत राहण्यापेक्षा जर्मनांच्या स्वाधीन होऊन या साऱ्या परिस्थितीचा सोक्षमोक्ष लावून टाकावा किंवा येथून निघून आघाडीकडे जाण्याचा तरी प्रयत्न करावा असे मला वाटू लागले आहे. आमचे खाण्यापिण्याचे तर फारच हाल होत आहेत.'

तो मुलगा ते पत्र घेऊन गेला आणि एकदोन दिवसांनी त्याने अदलीनाचे उत्तर आणले. तिने लिहिले होते, 'साळवी, तुमच्या सगळयांच्या बिकट परिस्थितीबद्दल वाचून मला फारच वाईट वाटले. परंतु माझी स्वतःचीही परिस्थिती तेवढीच बिकट आहे. माझ्या आईला त्यांनी पकडून नेलेच आहे. आता तर ते माझ्याही मागे आहेत. घराच्या छपराच्या एका सांदीत मी दिवस काढत आहे. त्यांना जर मी सापडले तर ते माझे हालहाल करतील; जीवसुद्धा घेतील. तुम्ही आघाडीवर जायचे जर खरोखरच ठरवले असेल तर मलाही तुमच्याबरोबर घेऊन चला. मी तुमच्याबरोबर येईन. येथे माझा जीव अतिशय धोक्यात आहे. पण कोणत्याही परिस्थितीत तुम्ही शरण जाऊ नका. धीर सोडू नका. थोडयाच दिवसांत सारे काही ठीक होईल. खाण्याचे पदार्थ तर मलाही दुर्मिळच आहेत. मी स्वतः दुसऱ्यांनी दिलेल्या अन्नावर



गुजराण करते आहे. तुम्हांला मी काय देऊ? माझ्याजवळ आहे त्या ब्रेडचा अर्धा तुकडा पाठवत आहे. कोणत्याही परिस्थितीत तुम्ही शरण जाण्याचा विचारही मनात आणू नका. तुम्हांला मुक्त झालेले पाहण्याची माझ्या मनात आस आहे.- अदलीना.'

तो अर्धा ब्रेडचा तुकडा हातात घेऊन मी त्याच्याकडे पाहतच राहिलो.

रोमानो – एक इटालियन तरुण. याने लेखकाला आपल्या गावी राहण्यास आणले व स्वतः धोका पत्करून त्यांना हरप्रकारे मदत केली. अदलीना – एक इटालियन स्त्री. हिने श्री. साळवी यांना आपल्या घरी आश्रय दिला. स्वतः हालअपेष्टा सोसून तिने त्यांना मदत केली.

**अभ्यास :**

१. लेखकावर गुहेत कोणता प्रसंग गुदरला ? २. रोमानोची हकीगत ऐकून लेखकाचे अंतःकरण का पिळवटून आले ? ३. अदलीना कोणत्या परिस्थितीत सापडली होती ? ४. अदलीनाने पाठवलेल्या अर्ध्या ब्रेडच्या तुकड्याकडे लेखक का पाहतच राहिला ?

## २८

# शिक्का

**ना. सं. इनामदार**



**ना. सं. इनामदार (जन्म : १९२३.) 'झुंज', 'झेप' इत्यादी ऐतिहासिक कादंबऱ्यांचे लेखक. 'मंत्रावेगळा' या त्यांच्या कादंबरीला महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक मिळाले आहे. श्री. इनामदार यांनी त्रिंबकजी डेंगळे यांच्या जीवनावर 'झेप' ही कादंबरी लिहिली आहे. पुढील उतारा या कादंबरीतून घेतला आहे.**

**पेशव्यांनी त्रिंबकजी डेंगळ्यांचा गौरव करून त्यांना आपला कारभारी म्हणून नेमले. कारभाऱ्याचा शिक्का वापरताना त्यांनी कोणती खबरदारी घेतली हे पुढील उताऱ्यात वाचा.**

सकाळी स्नान आटोपून कपाळावर आडवे केशरी गंध लावून त्रिंबकजी दिवाणखान्यात आला. नवीन केलेला शिक्का लक्ष्मणपंताने त्याच्या पुढे ठेवला.

"आताच शिक्केनवीसाकडून हा आपल्या नावाचा शिक्का तयार होऊन आला आहे." लक्ष्मणपंत त्रिंबकजीला म्हणाला.

त्रिंबकजीने शिक्का पाहिला. कारभाऱ्याचा शिक्का अष्टकोनी होता. त्यावर वर्तुळाकार अक्षरे कोरलेली होती. मखमलीच्या थैलीत शिक्का परत ठेवत त्रिंबकजी म्हणाला, "पंत, कारभाऱ्याचा हा शिक्का प्रथम विठोबाच्या पायांवर ठेवू दे. चला तुम्ही, देव्हाऱ्यातलं तीर्थ तुम्ही आम्हांला दयावं."

त्रिंबकजीने शिक्क्याची ती थैली देवघरातल्या विठोबाच्या मूर्तीच्या पायाजवळ ठेवली. मग आपले मस्तक मूर्तीसमोर टेकवले. उठून दोन्ही हात जोडून तो म्हणाला, "विठ्ठला, आज तुझ्या कृपेनं हे दिवस पाहतो आहे. हे सारं तुझं आहे. तू हात धरूनच चालवतो आहेस. अखेरपर्यंत नीट चालव म्हणजे मिळवलं. 'आतापर्यंत यश दिलंस. कुठं कमी पडू दिलं नाहीस. तीच कृपा पुढंही असू दे. पांडुरंगा, माझ्या अंतरात काय आहे हे तू जाणतोसच. हे वैभव मला पेलण्याजोगं नाही. पण दुबळ्या खांद्यांनी

पेलावं अशी तुझी इच्छा आहे. मी प्रयत्न करतो. पण लाज राखणं तुझ्या हातात आहे."

त्रिंबकजी विठ्ठलाच्या मूर्तीकडे एकटक लावून बोलत होता. त्याचा आवाज दाटून आला होता. पुन्हा एकदा मस्तक जमिनीला टेकवून त्यानं विठ्ठलाची करुणा भाकली, अन् मग शिक्क्याची थैली उचलली.

लक्ष्मणपंताने जवळची तीर्थाची झारी उचलली. त्रिंबकजीच्या हातावर तीर्थ घातले.

"श्रीमंत पंतप्रधानचरणी तत्पर

मल्हारजीसुत त्रिंबकजी डेंगळे निरंतर" पंतांनी शिक्क्याचा उच्चार केला.

"पंत, कारभारात शिक्का वापरण्यापूर्वी प्रथम सनदपत्र तयार करा. आळंदीला ज्ञानदेवाच्या समाधीसाठी आमच्या खाजगीतून सरंजाम लावून द्या. त्याच्या सनदेवर हा शिक्का प्रथम उठवा; मग इतर सरकारी कामं." त्रिंबकजी म्हणाला.

"आज्ञेप्रमाणं तजवीज ठेवतो, पाटील." असे म्हणून लक्ष्मणपंत शिक्का घेऊन आपल्या कचेरीत गेला.

देवाच्या समोर तबक होते त्यातून त्रिंबकजीने एक फूल उचलले. पुन्हा नमस्कार करून तो बाहेर बैठकीवर जाणार तोच गोदी आतून बाहेर आली.

"बाई इकडंच येत आहेत. मला मुद्दाम सांगायला पाठवलं आहे." गोदी म्हणाली. पाठोपाठ चंद्रा आली. तिच्या चर्येवर उत्साह ओसंडत होता.

"कारभाऱ्याचा शिक्का आपल्या नावानं झाला असं आता गोदी म्हणत होती. खरं का हे?" तिने लाडिकपणे त्रिंबकला विचारले.

"खरं आहे चंद्रा; पण त्याचं तुला काय?"

"तुम्ही कारभारी झालात म्हणजे आम्ही कुणीच झालो नाही वाटतं?"

त्रिंबकजी चंद्राच्या निरागस चर्येकडे पाहत म्हणाला, "नाही कसं? कारभाऱ्याची बायको म्हणून यापुढं लोक तुला ओळखू लागतील! यापुढं कुठल्या एका ओसाड गावाच्या पाटलाची बायको म्हणून लोक तुझ्याकडं पाहणार नाहीत; तर श्रीमंत बाजीराव पेशव्यांचे कारभारी त्रिंबकजी डेंगळे यांची कारभारीण म्हणून तुझ्याकडं पाहतील."

"मला त्याचा किती आनंद झाला आहे म्हणून सांगू! तुमच्या नावाचा शिक्का तयार होऊन आला असं समजलं तेव्हा अशीच इकडं धावत आले. कुठं आहे तो शिक्का? मला पाहू द्या स्वतःच्या डोळ्यांनी."

"आताच देवापुढं ठेवून विठ्ठलाचा मी आशीर्वाद मागितला. लक्ष्मणपंत तो शिक्का घेऊन बाहेर कचेरीत गेले आहेत." त्रिंबकजी चंद्राची गडबड सुखावलेल्या

वृत्तीने पाहत म्हणाला.

"गोदे, जा, बाहेर कचेरीत लक्ष्मणपंत बसले असतील त्यांना म्हणावं मी शिक्का पाहायला मागितला आहे," चंद्राने उत्साहाने गोदीला सांगितले.

"चंद्रा, थांब थोडी—"

"नाही, नाही मला एकदा डोळे भरून पाहू द्या तो शिक्का," चंद्रा त्रिंबकजीला अडवून म्हणाली, "माझा ऊर कसा आनंदानं भरून आला आहे. तुम्हांला कल्पना येणार नाही. जा गोदे बाहेर, आण तो शिक्का मागून."

गोदी लगबगीने बाहेर गेली.

चंद्राने हिरव्या गर्द रंगाचे भरजरी लुगडे नेसले होते. वीतभर जरीच्या काठाचा पदर तिने डोक्यावरून घेतला होता. कपाळावर नेहमीप्रमाणे ठसठशीत कुंकू लावले होते. गळ्यात सोन्याचे अलंकार होते. काजळ घातलेले आपले मोठे डोळे त्रिंबकजीवर रोखून वैभवाच्या शिखरावर बसलेल्या पतीला ती हृदयात साठवून ठेवू पाहत होती.

त्रिंबकजी हसला. तो म्हणाला, "कारभारीण झाल्याबरोबर तू गोदीला कसा चटकन हुकूम केलास ते मी आताच पाहिलं ना! खरी कारभारीण तूच शोभतेस."

तेवढ्यात गोदी परत आली. हात हालवीतच आली. तिचे हिरमुसले तोंड पाहून चंद्राने उत्कंठेने विचारले, "काय ग गोदे, आणलास का शिक्का? कुठं आहे तो?"

"पंत देत नाही म्हणाले," गोदीने रडव्या स्वरात सांगितले.

"का? का देत नाही म्हणाले?" चंद्राने आश्चर्याने विचारले. तिचे डोळे विस्फारले. त्रिंबकजीच्या चर्येवर सूक्ष्म हास्य पसरले.

ते म्हणाले, "शिक्का पेशव्यांच्या कारभाऱ्याचा आहे. तो वाटेल त्याला देता येणार नाही." पंत म्हणाले ते गोदीने सांगून टाकले.

"थांब, मीच जाऊन शिक्का मागून आणते," चंद्रा म्हणाली आणि निघाली. त्रिंबकजीने तिला थांबवले. तो म्हणाला, "तू जाऊ नकोस. चंद्रा, काही उपयोग व्हायचा नाही. तुला मात्र अपमान झाला असं वाटेल."

चंद्रा भुवया उचलून म्हणाली, "पण का? पंतांचा असा हट्टीपणा का?"

त्रिंबकजी शांतपणे म्हणाला, "त्यांनी गोदीला सांगितलं तेच तुलाही ऐकावं लागेल. पंतांनी योग्य तेच केलं. उलट तुझ्या भिडेला बळी पडून त्यांनी शिक्का पाठवला असता तर माझी निवड चुकली असंच मला वाटलं असतं."

"मला नाही तुमची ती आडपडदयाची बोलणी समजत." चंद्रा नाराजीच्या

स्वरात म्हणाली. तिच्या चर्येवरचा उत्साह मावळला.

त्रिंबकजी चंद्राला समजावत म्हणाला, "चंद्रा, या शिक्क्याचा अर्थ फार खोल आहे. कारभाऱ्याचा तो शिक्का आहे. त्या अष्टकोनी तांब्याच्या पत्र्याच्या तुकड्याआड श्रीमंत पेशव्यांची सारी इज्जत, सारी शान, सारा दिमाख लपलेला आहे. तो शिक्का त्याच जबाबदारीनं हाताळला पाहिजे म्हणून तो कुणाच्याही हाती द्यायला लक्ष्मणपंतानं नकार दिला, ते बरोबरच आहे."

"पण आम्ही कुणी बेजबाबदार आहोत का?"

"पण तू पेशव्यांची कारभारी नाहीस हेही लक्षात ठेव. चंद्रा, तो शिक्का सतीचं वाण आहे. तुला त्याचं वैभव दिसलं. मला त्याच्या मागचा चटका जाणवतो आहे. म्हणून मी प्रथम देवाची करुणा भाकली. म्हटलं—बाबा सांभाळून घे. चंद्रा, शिक्का भोगासाठी नाही, त्यागासाठी आहे. शिक्का पाहताच मी काय केलं माहीत आहे? प्रथम पंतांना सांगितलं, की आमच्या खाजगी सरंजामातून आळंदीला जमीन इनाम करून द्या. शिक्क्याचा उपयोग आमच्या त्यागापासून होऊ दे. शिक्कासुद्धा लाभावा लागतो. आजपर्यंत थोडे का कारभारी झाले? एकालाही हा शिक्का लाभलेला नाही. आता त्रिंबकजीच्या स्वामिनिष्ठेची कसोटी लागणार आहे. धन्यानं सेवकाला द्यायचा सर्वोच्च मान या शिक्क्याच्या रूपानं श्रीमंतांनी मला दिलेला आहे. भरतानं प्रभू रामचंद्राच्या पादुका सिंहासनावर ठेवून राज्यकारभार पाहिला. त्या पादुकांचं पावित्र्य या शिक्क्याला आहे. त्याच निष्ठेनं हे पावित्र्य राखलं पाहिजे. पेशव्यांचा शिक्का हे खेळणं होऊ नये म्हणून लक्ष्मणपंतांनी योग्य तेच केलं."

त्रिंबकजीचे शब्द ऐकून चंद्रा वरमली; तरी तिची नाराजी पूर्ण गेली नव्हती. ती एवढंच म्हणाली, "आमचं मन तुम्हांला कळायचं नाही. मी हट्ट धरत नाही. पेशव्यांच्या कारभाऱ्यांच्या मनात येईल तेव्हा तो शिक्का आम्हांला दाखवावा."

शिक्केनवीस–राजाचा शिक्का सांभाळणारा अधिकारी.

**अभ्यास :**

१. डेंगळ्यांनी प्रथम शिक्क्याचा उपयोग कशासाठी केला? का? २. लक्ष्मणपंतांनी गोदीच्या हाती शिक्का का पाठवला नाही? ३. शिक्क्याची प्रभू रामचंद्राच्या पादुकांशी तुलना का केली आहे? ४. त्रिंबकजींच्या स्वभावाचे वर्णन करणारी वाक्ये या पाठातून शोधा. त्यांतून त्यांचे कोणकोणते गुण दिसून येतात? ५. वाक्यात उपयोग करा : पेलणे, ओसंडणे, अंतर, निरागस, करुणा भाकणे, सतीचे वाण.

२९

# मिहिर सेनचा विक्रम

अ. रं. शिरवाडकर



अ. रं. शिरवाडकर (जन्म १९२२.) हे 'कुमार' मासिकाचे संपादक असून 'राक्षसाचे कोडे', 'बादशहाचे बक्षीस' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत.

पुढील पाठात मिहिर सेनने केलेल्या एका साहसाचा त्यांनी परिचय करून दिला आहे.

इंग्लंडच्या किनाऱ्यावर डोव्हरची खाडी आहे. तिला इंग्लिश खाडी असेही म्हणतात. या खाडीच्या एका बाजूस इंग्लंडचा किनारा व दुसऱ्या बाजूस फ्रान्सचा किनारा आहे. इंग्लंडच्या बाजूस डोव्हर हे बंदर तर फ्रान्सच्या बाजूस कॅले हे बंदर आहे. त्यांच्यामधील सरळ अंतर अडतीस किमी आहे. लांबचा पल्ला पोहून जाणाऱ्या निष्णात जलतरणपटूंना ही खाडी म्हणजे एक मोठे आव्हान आहे. ही खाडी पोहून जाणारा पहिला भारतीय जलतरणपटू कोण आहे, हे तुम्हांला माहीत आहे का?

१५ ऑगस्ट १९५५.पहाटे ५ वाजून ४७ मिनिटे झाली. फ्रान्सच्या किनाऱ्यावरील कॅले बंदराजवळ पहाटेच्या निःशब्द वातावरणात तोफेचा आवाज निनादला. खाडी पोहणाऱ्या स्पर्धकाना तो इशारा होता. अंगाला ग्रीस चोपडलेल्या जलतरणपटूंनी इंग्लिश खाडीच्या बर्फासारख्या थंड पाण्यात आपली शरीरे झोकली. फ्रान्सच्या किनाऱ्यापासून सुरू होणारी ही शर्यत इंग्लंडच्या किनाऱ्यावर संपणार होती. पोहणारे सतरा जण तीत भाग घेत होते. बहुतेक सर्व पोहणारे दर्दी आणि लांब पल्ला पोहून जाणारे जलतरणपटू होते. अनुभव नसलेला फक्त एकच एक त्यांच्यात होता; तो भारतीय होता. त्याचे नाव होते मिहिर सेन.

मिहिर सेनना अशा शर्यतीचा मुळीच अनुभव नव्हता. पण त्यांची इच्छाशक्ती दांडगी होती. त्यांच्या या शर्यतीची सुरुवातही मोठी दुर्दैवी झाली. त्यांना पोहताना

वापरण्यासाठी दिलेला डोळ्यांचा गॉगल एकाएकी नादुरुस्त झाला. त्याच्यातून पाणी आत झिरपू लागले. त्यातील दोष दुरुस्त करण्यात त्यांचा अडीच तासांचा वेळ वाया गेला. तितके अंतर ते इतरांपेक्षा मागे राहिले. पण सुदैवाने गॉगल नंतर दुरुस्त झाला. सुरुवातीचा वेळ वाया गेला तरी दुपारी ४ वाजून ४५ मिनिटांनी मिहिर सेन यांचा सतरा जणांत पाचवा क्रमांक होता. चौथ्या क्रमांकालाही ते ओलांडण्याच्या बेतात होते. पहिल्याच प्रयत्नात आपण फार मोठे यश मिळवणार याचा विलक्षण आनंद त्यांना होत होता. पण दुर्दैवाने तसे व्हायचे नव्हते! त्यांना तो आनंद मिळायचा नव्हता. एकाएकी हवामानात प्रतिकूल बदल झाला. निळ्या आकाशातून क्रुद्ध वादळ पुढे सरकू लागले. त्याने खाडीला जोरदार तडाखे द्यायला सुरुवात केली.

वादळाचे भयंकर तांडव वाढू लागले होते. वायरलेसवर सर्व स्पर्धकांना शर्यत सोडून देण्याचा इशारा दिला जात होता. हाताशी आलेल्या यशाला मिहिर सेन पारखे झाले.

या पहिल्या अपयशानंतर फ्रान्सच्या किनाऱ्यावरून खाडी पोहून जाण्याचे मिहिर सेन यांनी सात प्रयत्न केले. पण त्या सर्व प्रयत्नांत त्यांना अपयशच आले. तरीही त्यांनी आशा सोडली नाही. ते खचले नाहीत. १९५८ चे वर्ष म्हणजे मिहिर सेन यांच्या भाग्याचे वर्ष ठरले. आता त्यांनी उलट बाजूने म्हणजे इंग्लंडच्या किनाऱ्यावरून फ्रान्सच्या किनाऱ्याकडे पोहून जायचे ठरवले. अर्थात हे अधिकच अवघड होते.

२७ सप्टेंबरला मिहिर सेननी आपल्या नवव्या प्रयत्नाला प्रारंभ केला. आपली पत्नी, दोन वर्षांची छोटी मुलगी आणि इतर मित्रमंडळी यांच्या शुभेच्छा घेऊन ते पाण्यात पुन्हा उतरले. दुपारी एक वाजला होता. स्वच्छ ऊन पडले होते; परंतु जोरदार लाटा उठत होत्या आणि समुद्रावर थंडगार वारा सुटला होता. त्यामुळे प्रगती फार हळूहळू होत होती. सायंकाळी सात वाजता अंधार झाला. हवा ओलसर आणि झोंबणारी झाली. मिहिर सेनना प्रत्येक तासानंतर—चहा, कॉफी, सूप—दिली जात होती. त्यांच्या शरीरात उष्णता टिकावी म्हणून प्रयत्न केला जात होता. रात्री थंडी भयंकर वाढत गेली. त्याचा प्रतिकूल परिणाम होऊ लागला. आकाशात आता चंद्र वर आला होता. हा एकच आशेचा धागा होता. चंद्राचा स्वच्छ प्रकाश साऱ्या समुद्रावर पडला होता. मध्यरात्रीनंतर सेन फ्रेंच किनाऱ्यापासून सुमारे पाच किमी दूर होते. हळूहळू ते किनाऱ्याकडे जात होते. किनाऱ्यापासून सुमारे अर्धा किमी अंतरावर त्यांच्या मार्गदर्शक बोटीने समुद्रात नांगर टाकला. ती यापुढे जाऊ शकत नव्हती. परंतु सेन यांना अजून पुढे जायचे होते. किनाऱ्यालगत अतिशय खवळलेला आणि खडक-

कपारींनी भरलेला असा समुद्र होता. परंतु मिहिर तशाही अडचणीतून पुढे सरकत होते.

किनारा अगदी जवळ आल्यावर त्यांना काय वाटले असेल? त्यासंबंधी बोलताना ते नंतर म्हणाले, "समोर पांढऱ्या वाळूनं भरलेला फ्रान्सचा किनारा पाहून मला उचंबळून आलं. हे सत्य आहे, की स्वप्न आहे हेच मला समजेना. पण माझ्या अंगात नवा जोम आला. माझ्या स्नायूंत व हातापायांत नवं बळ संचारलं. मला अगदी ताजंतवानं वाटू लागलं. सगळा शीण पळून गेला. मी दहा मीटर पोहून गेलो नाही तोच माझ्या पायांखाली खडक लागला. कितीतरी वेळानं झालेला भूमीचा पहिला स्पर्श होता तो! तो स्पर्श किती आनंददायी होता म्हणून सांगू! त्याचं वर्णन शब्दांनी करणं केवळ अशक्य आहे. माझ्या घशात आवंढा आला आणि शिणलेल्या, थकलेल्या डोळ्यांतून आनंदाश्रू वाहू लागले. भूमातेचा स्पर्श इतका जिव्हाळ्याचा आणि इतका मोहून टाकणारा यापूर्वी मला कधीच वाटला नाही!"

मिहिर सेननी आपले ध्येय गाठले होते. परंतु नियमाप्रमाणे त्यांना संपूर्ण समुद्र ओलांडायचा होता. तेव्हा किनाऱ्यावरील छोट्या खडकावर थांबून चालण्यासारखे नव्हते. वेळ फुकट घालवून उपयोग नव्हता. पुन्हा त्यांनी शरीर पाण्यात झोकले. ते किनारा गाठण्यासाठी निघाले. किनाऱ्याजवळच्या लाटा त्यांना परत खडकावर फेकत होत्या. पण नशीब आता त्यांच्या बाजूने होते. त्यांनी जोर करून नेटाने अखेर किनारा गाठला. फ्रान्सच्या किनाऱ्यावर अखेर त्यांनी पाय ठेवला. इंग्लिश खाडी पोहून जाण्याचा विक्रम करणारे मिहिर सेन हे पहिलेच भारतीय ठरले.



**अभ्यास :**

१. इंग्लिश खाडी पोहून जाणे हा एक मोठा विक्रम आहे असे का म्हणतात? २. मिहिर सेन यांना प्रथम अपयश का आले? ३. १९५८ हे वर्ष त्यांना भाग्याचे का ठरले? ४. मिहिर सेन यांची चिकाटी कशावरून दिसून येते? ५. खालील शब्दांच्या उलट अर्थांचे शब्द दया : सुरुवात, दुर्दैव, प्रतिकूल, खवळलेला, ताजातवाना, आनंदाश्रू. ६. भारतीय खेळाडूंच्या पुढील खेळांतील विक्रमांची माहिती मिळवा. कुस्ती, कबड्डी, हॉकी, क्रिकेट.



३०

# कन्याकुमारी

**गंगाधर गाडगीळ**



**प्रा. गंगाधर गाडगीळ (जन्म: १९२३.) हे अर्थशास्त्राचे प्राध्यापक आहेत. कादंबरी, लघुकथा, नाटिका व प्रवासवर्णन असे विविध प्रकारचे लेखन त्यांनी केले आहे. त्यांचे 'धाडसी चंदू' आणि इतर बालवाङ्मय प्रसिद्ध आहे. 'कन्याकुमारी' हा पाठ 'गोपुरांच्या प्रदेशात' या त्यांच्या प्रवासवर्णनपर पुस्तकातून घेतला आहे.**

**कन्याकुमारी हे भारताचे दक्षिण टोक आहे. तेथील सागरी सौंदर्य पाहण्यासारखे आहे. श्री. गाडगीळ यांनी कन्याकुमारीचे केलेले वर्णन येथे वाचा.**

त्रिवेंद्रमपासून कन्याकुमारीपर्यंतचा रस्ता चांगला आहे. करवतीने कापल्यासारखे दिसणारे डोंगर सर्व रस्ताभर आपली सोबत करतात. मोटार अशा रस्त्याने बराच वेळ चालली आणि मग एकदम थांबली. आम्ही प्रश्नार्थक मुद्रेने एका सहप्रवाशाकडे पाहिले, तेव्हा तो म्हणाला, "प्रवास संपला!"

आम्ही समोर पाहिले तो अवचितपणे रस्ता संपला होता. पुढे छोटासा वाळूचा किनारा होता आणि त्याच्याही पुढे क्षितिजापर्यंत समुद्र पसरला होता. हिंदुस्थान देश संपला होता, आशिया खंड संपले होते. अफाट सागराचे साम्राज्य सुरू झाले होते. अनपेक्षितपणे दिसलेल्या त्या दृश्याने मी बावरून गेलो.

तेवढ्यात मोटार हालली आणि किनाऱ्याकिनाऱ्याने पुढे जाऊन केप हॉटेलच्या विस्तीर्ण आवारात जाऊन थांबली. केप हॉटेलमध्ये जाऊन आम्ही एक खोली घेतली. तोंड वगैरे धुतले. चहा घेतला. आणि मग पळत पळतच बाहेर पडलो. संध्याकाळ झाली होती. सूर्य मावळायला तासभरच राहिला होता. तेवढ्या वेळात ते सगळे दृश्य आम्हांला पोट भरून पाहून घ्यायचे होते. माझे मन भावनाकुल झाले होते. कितीतरी कल्पना मला सुचत होत्या! कितीतरी आठवणी येत होत्या!

नेहमी आपल्या भावनांचा तोल सावरणारा मी, असा व्याकुळ का बरे झालो होतो? असे झाले होते तरी काय!

तसे पाहिले तर विशेष काहीच झाले नव्हते. माझ्या पायांखालच्या भूमीने एकदम उतरती होऊन तिने पाण्यात बुडी घेतली होती. जमिनीच्या पुढे जाऊन दोनतीन लहानसे खडक पाण्यात धिटाईने उतरले होते. आईचा हात धरून ठेवून मुलांनी पाण्यात खेळायला उतरावे ना, तसे ते समुद्रात उतरले होते. लहानशा लाटा फेसाळत त्यांना वेढत होत्या आणि किनाऱ्यावर येऊन आदळत होत्या. सागराचे हिरवे पाणी अथांगपणे समोर पसरले होते; क्षितिजाचे भव्य अर्धवर्तूळ व्यापून राहिले होते. निळ्या आकाशाशी ते स्पर्धा करत होते. क्षितिज आकाशात आणि आकाश क्षितिजात विरघळून गेले होते.

त्या एकटेपणात मी बराच वेळ काढला आणि मग मला तितक्याच तीव्रतेने जाणीव झाली, की मी एकटा नाही. माझ्या मागे माझ्या देशाचा प्रचंड विस्तार आहे. आकाशात बुडालेली हिमालयाची हिमशिखरे आहेत. भगीरथाने तपःसामर्थ्याने पृथ्वीवर आणलेली आणि आपल्या विस्तीर्ण खोऱ्यात पिके डुलत ठेवणारी गंगा आहे. अगस्तीने वाकवलेला विंध्याद्री आहे. रामचंद्राची आणि सीतेची पंचवटी आहे, शबरीचे दंडकारण्य आहे. ज्याच्या उन्नत मस्तकावरून स्वातंत्र्याचे वारे वाहतात असा सह्याद्री आहे.

मला जाणवले, की मी एकटा नाही. या अनंत सागराच्या विस्ताराकडे पाहून मी किती क्षुद्र आहे असे मला वाटण्याचे कारण नाही. कारण मी जरी क्षुद्र असलो तरी माझ्यामागे माझा विशाल देश आणि माझ्या पूर्वजांची परंपरा आहे.

माझ्या भावना इतक्या उचंबळून का बरे आल्या होत्या? सागरात बुडालेले ते भूमीचे टोक आणि पुढे पसरलेला सागराचा विस्तार हे दृश्य मोठे भव्य होते यात शंका नाही. शिवाय त्या स्थानाशी अनेक स्मृती व कल्पना निगडित झालेल्या होत्या. तेथे अगदी टोकाला कन्याकुमारीचे देवालय होते. तीन समुद्रांच्या संगमाने आधीच पवित्र झालेले ते स्थान ती पुनीत करत होती. पाण्याने वेढलेल्या तेथल्या एका खडकावर बसून विवेकानंद ध्यानस्थ राहिले होते. तेथेच त्यांनी आपल्या जीवनाचे फूल मातृभूमीच्या चरणी अर्पण केले असावे. तेथे पाण्यातच एक आसनासारखा दगड होता. समुद्र आपल्या लाटांचे हात त्यावरून पुन्हा पुन्हा फिरवून तो साफ करत होता.

माझ्या हृदयात खोल कालवाकालव होत होती आणि मी निश्चलपणे समुद्राकडे पाहत होतो. लाटा कुतूहलाने माना उंचावून माझ्या देशाकडे पाहत पाहत येत होत्या आणि त्याच्या पायांशी लोटांगण घेत होत्या. पाहता पाहता दूर अंतरावर एक बेट वर आले. त्यावर स्वातंत्र्यवीर सावरकरांची मूर्ती मला दिसू लागली आणि त्यांची कविता माझ्या मनात घुमू लागली—

ने मजसी ने परत मातृभूमीला।
सागरा, प्राण तळमळला....

आपल्या मातृभूमीकरता ज्यांनी अनेक हालअपेष्टा सहन केल्या, ज्यांनी आपले जीवन कणाकणांनी वेचले त्या सर्वांच्या स्मृतीने माझा कंठ दाटून आला. मदनलाल धिंग्राची आठवण झाली. बाबू गेनूची आठवण झाली. माणूस आपल्या देशावर इतके उत्कट प्रेम कसे करू शकतो, ते मला त्या वेळी समजले; कारण त्या क्षणी मीदेखील माझ्या देशावर फार उत्कट प्रेम करत होतो. एकांड्या वृत्तीचा मी, माझ्या देशाशी आणि माझ्या पूर्वजांशी जोडला जात होतो.

मला एकदा वाटले, की आपण आपल्या देशाला प्रणाम करावा. आपली क्षुद्रता त्याच्या पायांवर वाहावी; पण माझा सहप्रवासी मित्र प्रधान मला हसेल, असे मला वाटले. त्या लाजेने आपली अशी मनापासूनची इच्छा अपुरी ठेवावी हे मला मूर्खपणाचे वाटले. म्हणून मी प्रधानाला माझी इच्छा सांगितली. त्याच्याही मनात तसलेच विचार येत असावेत; कारण त्याला माझी कल्पना पटली. मग आम्ही दोघांनी बूट काढले आणि शक्य तितके दक्षिणेला जाऊन आणि उत्तरेकडे पाहून आम्ही आमच्या मातृभूमीला मनोभावे साष्टांग प्रणिपात केला.

किती हलके हलके आणि मोकळे वाटले मला तसे केल्यावर! तेथे आम्ही मावळत्या सूर्याचे दर्शन घेतले. कन्याकुमारीला सूर्य जणू समुद्रातून उगवतो आणि समुद्रात मावळतो असे दिसते. तो सूर्योदय आणि सूर्यास्त पाहण्यात काही विशेष आहे असे मानतात. समुद्रात होणारा सूर्यास्त मी अनेक वेळा पाहिला आहे. त्याहून केप कॅमोरिनचा सूर्यास्त काही वेगळा असेल असे मला वाटत नव्हते आणि तसा तो नव्हताही; पण अनेक लोक वाळूच्या ढिगाऱ्यांवर चढून सूर्यास्त पाहायला उभे होते. म्हणून आम्हीदेखील एका वाळूच्या ढिगाऱ्यावर चढून उभे राहिलो. आकाशात पश्चिमेला ढगांचे थरांवर थर चढले होते आणि त्यामुळे सूर्यास्त दिसेल की नाही

याची इतरांप्रमाणेच आम्ही काळजी करू लागलो. पण आमचे नशीब शिकंदर होते. अगदी खाली उतरल्यावर ढगांच्या फटीतून नारिंगी सूर्यबिंबाचे आम्हांला दर्शन झाले. त्याच्याभोवतालचे ढगदेखील नारिंगी रंगाने माखून गेले. ढगांच्या त्या गर्दीतून वाट काढत सूर्यबिंब क्षितिजाच्या कडेवर टेकले. तेथे ते एकदम मोठे झाल्यासारखे वाटले आणि मग अगदी सावकाश पाण्यावर आपली नारिंगी झळाळी टाकत ते बुडाले. तेवढ्यात आमच्याजवळ उभा राहिलेला एक मनुष्य म्हणाला, "इथं सूर्य तीनदा मावळतो. तो दोनदा पुन्हा वर येतो आणि खाली जातो."

त्या वेड्या कल्पनेचे आम्हांला हसू आले; तरीही कुतूहल चाळवल्यामुळे आम्ही सूर्य वर येण्याची वाट पाहत उभे राहिलो. पण तेवढा चांगुलपणा सूर्यनारायणाने दाखवला नाही.



**अभ्यास :**

१. जिथे रस्ता संपला होता तिथे लेखकाला कोणते दृश्य दिसले?
२. त्या दृश्याचा त्याच्या मनावर कोणता परिणाम झाला? का?
३. आपण एकटे नाही असे लेखकाला का वाटले?
४. लेखकाने केलेले कन्याकुमारीच्या सूर्यास्ताचे वर्णन वहीत लिहा.
५. 'ढगांच्या त्या गर्दीतून वाट काढत सूर्यबिंब क्षितिजाच्या कडेवर टेकले.'—यासारख्या या पाठातील सुंदर कल्पना शोधून काढा.
६. भगीरथ, अगस्ती, शबरी, विवेकानंद, सावरकर, मदनलाल धिंग्रा व बाबू गेनू यांची माहिती मिळवा.
७. तुम्ही पाहिलेल्या एखादया निसर्गरम्य देखाव्याचे दहा ओळींत वर्णन करा.



३१

# देशरक्षण

य. श्री. परांजपे



**मेजर जनरल य. श्री. परांजपे** (जन्म : १९०९; मृत्यू : १९७८.) हे भारतीय सेनेतील वरिष्ठ अधिकारी होते. 'सैनिकांची स्वाक्षरी', 'पूर्व गोलार्धाचे भूकेंद्र–भारत' ही व त्यांची इतरही काही पुस्तके प्रसिद्ध आहेत.

आपल्या देशाच्या रक्षणाचा आपण सतत विचार करणे का आवश्यक आहे, देशाच्या रक्षणासाठी आपण कोणते उपाय केले पाहिजेत याबद्दलची माहिती या पाठात वाचायला मिळेल.

देशाच्या संरक्षणाच्या योजना आखणे व त्या कार्यवाहीत आणणे याची जबाबदारी राज्यकर्त्यांची व सेनानायकांची असली तरी हा विषय प्रत्येक नागरिकाच्या जिव्हाळ्याचा आहे.

असे समजा, की तुम्ही एका खेड्यात राहत आहा. तेथे तुमचे स्वतःचे एक घर आहे. त्यालगत तुमच्या मालकीची शेतजमीन आहे. बैलांच्या दोन जोड्या आहेत आणि मैल दोन मैलांवरून वाहणाऱ्या कालव्यापासून आलेल्या पाटाने तुमच्या जमिनीला मुबलक पाणी मिळते आहे. या सर्व साधनांमुळे तुमची शेतीभाती उत्तम होते. तुम्ही सर्व कुटुंबीय सुखासमाधानाने राहू शकता. पण यांपैकी कोणतेही एखादे साधन नाहीसे झाले किंवा जबरीने तुमच्यापासून हिरावून नेले तर त्यामुळे तुमचे जीवित दुःखी होईल. कोणी तुमच्या शेताचा हिस्सा बळकावला, बैलांच्या जोडया पळवून नेल्या अथवा पाण्याच्या पाटाला बांध घालून तुमचे पाणी अडवले, तर तुमच्या शेतीवर व उत्पन्नावर त्याचा अनिष्ट परिणाम होईल. तुमच्या कुटुंबाच्या सुखी जीवनासाठी त्या सर्व आवश्यक बाबी आहेत. तेव्हा त्यांना आपण तुमच्या कुटुंबाच्या हिताच्या बाबी म्हणू

कुटुंबाच्या हितसंबंधांसारखेच देशाचेही काही खास हितसंबंध असतात. उदाहरणार्थ – देशाच्या सीमा, देशाची राज्यपद्धती, व्यापार, दळणवळण इत्यादी. त्यांना धोका उत्पन्न झाला, की देशाचे जीवनही बिघडते. देश किंवा राष्ट्र म्हणजे त्यातील सर्व जनतेसह एका प्रचंड कुटुंबाचे घरच समजले पाहिजे. तेव्हा त्या देशाच्या हितसंबंधांना इतरांनी बाध आणला तर त्यांच्याशी झगडून, म्हणजे आवश्यक वाटल्यास शस्त्रे वापरूनही त्यांचे रक्षण करावे लागते.

यावरून दिसून येईल, की देशाच्या 'हितसंबंधांची जोपासना' हे देशरक्षणाचे पहिले तत्त्व मानले पाहिजे.

तुम्ही आपल्या गावी कोणाच्या अध्यातमध्यात न पडता राहत असलात तरीसुद्धा काही लोक तुम्हांला लुबाडण्याचा प्रयत्न करत असतील. तुम्ही बेसावध राहिलात तर त्याचा फायदा घेण्यास ते कमी करणार नाहीत. राष्ट्राच्या बाबतीत तीच गोष्ट लागू पडते. आपला देश सुपीक आहे. अनेक दृष्टींनी तो समृद्ध आहे आणि प्रयत्न केल्यास येथे सुबत्ता आणता येईल. तेव्हा त्याचे लचके तोडण्यासाठी किंवा त्यास आपले अंकित करण्यासाठी इतर राष्ट्रे प्रयत्न करतील. ती कोण आहेत, कोणत्या पद्धतीने ती आपल्याविरुद्ध कृती करत आहेत, त्यांची शक्ती किती आहे याचा सुगावा लावायला हवा. त्यांच्यापासून होणाऱ्या भावी धोक्यांचा अंदाज करून आणि



त्यांवर करडी नजर ठेवून योग्य उपाययोजना करायला हवी. तेव्हा संरक्षणाचे दुसरे तत्व शत्रूबाबत 'सावधानता' हे आहे.

तसेच तुम्ही स्वतः दुबळे असलात तर लुबाडणाऱ्या लोकांवर तुमची दहशत बसणार नाही. ते तुम्हांला मन मानेल तसे नागवतील. पण जर तुम्ही बलवान असलात व तुमच्यात एकी असली तर ते म्हणतील, की यांच्या वाटेस जाणे धोक्याचे आहे. यांची कुरापत काढल्यास आपलाच नाश व्हायचा! त्यांचे उद्दिष्ट साधण्यासाठी एक तर त्यांना तुमच्याहून बरेच बलवान व्हावे लागेल किंवा तुमच्यात दुही उत्पन्न करावी लागेल.

यावरून आपण देशरक्षणाचे तिसरे तत्व मांडू शकतो ते असे—आपले राष्ट्रबळ असे असले पाहिजे, की कोणाही शत्रुराष्ट्राला आक्रमण करण्यास त्यायोगे प्रतिबंध व्हावा.

आपण येथे 'राष्ट्रबळ' हा शब्द वापरला. याचा अर्थ काय? राष्ट्रबळात तीन वेगवेगळ्या शक्ती एकत्र आलेल्या असतात. अर्थात पहिली, आपल्या तिन्ही सेनादलांची शक्ती – म्हणजे भूसेना, नौसेना व वायुसेना यांची एकत्रित शक्ती. त्याला आपण 'सेनाशक्ती' म्हणू.

अशी सेनाशक्ती उभी करायला समर्थ असे मनुष्यबळ लागते, शस्त्रास्त्रे लागतात व पैसा लागतो. युद्धकाळी गरजा अनेक पटींनी वाढतात. मनुष्यबळ हे जनतेतून येते. जनता सर्वसाधारणतः सुखी असेल, तिला स्वदेशाबद्दल प्रेम असेल, तर आपल्या देशासाठी ती लढण्यास व बलिदान करण्यास तयार असते. शिवाय युद्धाचा भार सहन करण्यासाठी राष्ट्र सधन असावे लागते. त्यासाठी राष्ट्राची सर्वांगीण प्रगती व विकास करावा लागतो. अशा रीतीने शत्रूस तोंड देऊन त्याचा पराभव करण्याची राष्ट्राची पात्रता 'आर्थिक शक्तीने' उभी करावी लागते. आर्थिक शक्ती ही सेनाशक्ती एवढीच महत्वाची आहे; कारण तिच्याशिवाय राष्ट्रास फार काळ युद्ध करता येणार नाही.

तिसरी शक्ती तर त्याहूनही अधिक महत्वाची आहे ती म्हणजे जनतेची प्रेरणा-शक्ती. आपण सर्व एकाच कुटुंबातील आहोत असे मानून एकदिलाने कार्य करण्याची प्रवृत्ती जनतेत असली पाहिजे. राष्ट्राच्या नेत्यामागे एकजुटीने उभे राहण्याची तयारी पाहिजे. राष्ट्राच्या हितसंबंधांच्या रक्षणासाठी त्याग करण्याची इच्छा जनतेत असली पाहिजे. हीच जनतेची 'प्रेरणाशक्ती' होय.

आपल्यालाही याच तीन शक्तींच्या साहाय्याने राष्ट्रबळाची उभारणी करायची आहे. त्यासाठी अत्यंत जिद्दीच्या प्रयत्नांनी आपले आर्थिक बळ वाढवावे लागेल. संघटित प्रेरणाशक्तीसाठी समाजातील सर्व प्रकारचे भेदाभेद नाहीसे करावे लागतील. या दोन्ही शक्तींच्या पाठिंब्यानेच सेनाशक्ती देशरक्षणासाठी पूर्णपणे सिद्ध होऊ शकेल. यावरून संरक्षणाचे चौथे तत्व 'राष्ट्रबळ' उभे करणे हे आहे.

जगातील काही राष्ट्रे आकाराने मोठी असूनही बलवान नसतात. अशा प्रसंगी स्वरक्षणासाठी त्यांना इतर राष्ट्रांची मदत लागते. ती मदत युद्ध सुरू झाल्यावर घेण्यात धोका असतो; कारण ती येण्याच्या आतच त्या राष्ट्राचा पराभव होऊ शकतो. शिवाय असे करणे म्हणजे तहान लागल्यावर विहीर खोदण्यासारखे होईल. तेव्हा शांतिकाळातच इतर राष्ट्रांबरोबर संरक्षक संघटना उभारणे आवश्यक असते. अनेक राष्ट्रांच्या सामुदायिक प्रतिकारशक्तीने बलवान शत्रूस रोखता येते. पण अशी मदत घेताना किंवा अशी संघटना स्थापताना आपल्याहून अधिक शक्तिवान मित्रराष्ट्रच आपल्याला मिंधे बनवणार नाही, याची दक्षता ठेवायला हवी.

स्वसंरक्षणासाठी मित्रराष्ट्रांवर सर्वस्वी अवलंबून राहणेही कधी कधी धोक्याचे असते; कारण ती किती, कशी व केव्हा मदत करतील याची खात्री देता येत नाही. म्हणून स्वतःच्या कर्तृत्वाने आपले राष्ट्रबळ वाढवून आपल्या पायावर हिमतीने उभे राहणेच अधिक श्रेयस्कर असते. आपल्या देशाचेच उदाहरण घ्या. आपल्या देशाचा विस्तार मोठा आहे. लोकसंख्या भरपूर आहे; खनिज संपत्ती बरीच आहे. यांत्रिक व तांत्रिक साहित्य बनवण्याचे आपले कसब दिवसेंदिवस वाढत आहे. प्रयत्न केल्यास आपण पुरेसे अन्न पैदा करू शकू. तेव्हा शक्यतो आपण आपल्या पायांवर उभे राहून आपले राष्ट्रबळ त्वरित वाढवले पाहिजे.

यावरून देशरक्षणाचे पाचवे व शेवटचे तत्व 'स्वावलंबन' किंवा 'स्वयंपूर्णता' आहे हे दिसून येईल.

एवढे मात्र लक्षात ठेवावे, की आजच्या तांत्रिक युगात कोणतेही राष्ट्र सर्व बाबतींत स्वयंपूर्ण असू शकत नाही. त्याकरता इतर समान विचारांच्या राष्ट्रांशी मैत्री व स्नेहसंबंध ठेवून त्यांच्याशी सहकार्य करावे लागते आणि आपल्यातील उणिवा त्यांच्या मदतीने भरून काढाव्या लागतात.

तुम्ही सर्व अजून वयाने लहान आहात. पण काही वर्षांनी मोठे झाल्यावर तुमच्यापैकी प्रत्येक जण आपापल्या कुवतीप्रमाणे व इच्छेप्रमाणे निरनिराळ्या क्षेत्रांत

उद्योगास लागेल. कोणी लष्करात शिरेल, कोणी इतर कोठे नोकरी करील, कोणी कारखान्यात जाईल; तर कोणी आपली शेती पाहील. तुमच्यातूनच राष्ट्राचे भावी नेते उत्पन्न होणार आहेत, तेव्हा तुम्ही कोणत्याही क्षेत्रात असलात तरी तुम्ही सर्व आपल्या राष्ट्राचे जबाबदार व निष्ठावंत नागरिक झाले पाहिजे.

तुम्ही आणखी एक महत्त्वाची गोष्ट नेहमी लक्षात ठेवावी आणि ती म्हणजे देशरक्षण हे केवळ राष्ट्राच्या सेनांचेच कार्य नाही. ती तुम्हा-आम्हा सर्वांचीच अत्यंत महत्त्वाची जबाबदारी आहे. सेनाशक्तीबरोबरच राष्ट्राची आर्थिक शक्ती व प्रेरणाशक्ती उभारायची असेल, तर तुमच्यापैकी प्रत्येकाचा हातभार त्यास लागणे अवश्य आहे.



सुबत्ता – विपुलता; प्रेरणाशक्ती – कार्याला प्रवृत्त करणारी शक्ती; श्रेयस्कर – हितकारक.

अभ्यास :

१. देशरक्षणाची पाच तत्त्वे कोणती ?
२. देशाचे हितसंबंध कुटुंबाच्या हितसंबंधांसारखेच कसे असतात ?
३. राष्ट्रबळ म्हणजे काय ? राष्ट्रबळात कोणकोणत्या शक्ती एकत्र आलेल्या असतात ?
४. 'देशरक्षण' हे केवळ राष्ट्राच्या सेनांचेच कार्य नाही, असे का म्हटले आहे ?
५. जबाबदार व निष्ठावंत नागरिक कोणास म्हणता येईल ?
६. सैनिक, पुढारी, दुकानदार व कारखानदार यांपैकी तुम्हांला कोण व्हावेसे वाटते ? का ?
७. खालील शब्द कोणकोणत्या वाक्यांत आलेले आहेत ते शोधा व त्या वाक्यांचा अर्थ सांगा.

हितसंबंध, राज्यपद्धती, स्वयंपूर्णता, प्रेरणाशक्ती, भेदाभेद.

३२

# पाडवा गोड झाला

**अं. शं. अग्निहोत्री**



**अं. शं. अग्निहोत्री** (जन्म : १९१३, मृत्यू : १९७६.) यांचे 'माणसाच्या गोष्टी', 'मुक्ता आणि इतर गोष्टी' हे लघुकथासंग्रह व इतरही पुस्तके प्रसिद्ध आहेत. 'पाडवा गोड झाला' ही कथा 'माणसाच्या गोष्टी' या कथासंग्रहातून घेतली आहे.

गरिबी ही वाईटच; पण या कथेतील आई गरिबीला कशी हसतमुखाने तोंड देते ते पाहा. दारिद्र्याची आच नाहीशी करण्यासाठी प्रेम व त्याग यासारखा दुसरा उपाय नाही, हेही तुमच्या लक्षात येईल.

माझ्या लहानपणची गोष्ट. त्या वेळी आम्ही फार गरीब होतो. कित्येकदा घरात एका वेळेला पुरेल इतकेही अन्न नसायचे. पण आमच्या घरात दुःखाचा मात्र लवलेश नसायचा; आणि याला कारण माझी आई!

आईला कोंडयाचा मांडा करण्याची कलाच तेवढी अवगत होती असे नाही; दुर्दैवाला हसून फजीत करण्यात तिचा हातखंडा! भेडसावणाऱ्या संकटांना मजेने वाकुल्या दाखवणारा खेळकरपणा होता आमच्या आईत. घरातले रिकामे डबे खडखडवतानाही तालबद्ध खडखड करील. कपाटात काही नाही असे दीन मुद्रेने आम्हांला सांगण्याऐवजी गंभीरपणाचा आव आणून म्हणेल, 'बिचाऱ्या उंदरांचं आता कसं होणार?' आणि लगेच खदखदा हसू लागेल. दुःखाला आपल्या सात मजली हास्याने पळवावे आमच्या आईनेच!

एखादया दिवशी रात्री 'थंडा फराळ' करण्याचा प्रसंग आला, की तिने साऱ्या मुलांना–माझी मोठी बहीण, धाकटा भाऊ आणि मी–जवळ घ्यावे आणि आपल्या बालपणाच्या गोष्टी सांगाव्यात.

आईने तिच्या बालपणची म्हणून सांगितलेली एक गोष्ट—हीच गोष्ट तिने आम्हांला अनेकदा सांगितली असेल; पण त्या गोष्टीतली गोडी नेहमीच अवीट वाटायची.

आई सांगायची—

"आमच्या घरी अठरा विश्वं दारिद्र्य ! तुम्हांला निदान एकदा तरी खायला मिळतं, पण आम्हांला तीन तीन दिवस उपास !

"अशाच तीन दिवसांच्या उपासानंतर बाबांना एका कामाचा एक रुपया मिळाला. तो रुपया जपून खिशात ठेवून बाबा घरी येत होते. इतक्यात त्यांना आठवलं—मी बऱ्याच दिवसांपासून बाहुलीचा हट्ट घेतला आहे. त्यांनी चार आण्यांची बाहुली घेतली. नंतर थोडं चालल्यानंतर त्यांना आठवलं—दादाला टोपी नाही म्हणून त्याला शाळेत बसू देत नाहीत. दहा आण्यांची टोपी घेतली अन हाती दोन आणे उरले; तेव्हा आईनं सकाळी बाबांना बजावून सांगितलं होतं, 'रुपया येईल, त्यातून चार आण्यांचे तांदूळ, दोन आण्यांची मीठ-मिरची आणि मसाला अन दोन आण्यांची लाकडं आणा नि आठ आणे उद्यासाठी राहू द्या.'

"चूल सारवून ठेवून आई अन् आम्ही बाबांची वाट पाहत बसलो.

"बाबा आले तसे आम्हां सर्वांचे चेहरे उजळले. बाबांनी बाहुली देताच मी नाचू लागले. दादाला टोपी मिळताच दादानं कोलांटी उडीच मारली. बाबांची नजर आईकडं गेल्यावर मात्र ते चपापले.

"काही वेळानं त्यांनी एक परात घेऊन आपल्या कोटाच्या खिशात हात घालून चुरमुरे परातीत ओतले आणि भरल्या डोळ्यांनी आईकडं पाहिलं. मी अन दादाही भानावर येऊन गप्प उभे होतो.

"एक दोन क्षणच आईनं दातांनी खालचा ओठ चावला अन लगेच हसून पुढं येत ती म्हणाली, 'मला वाटलंच होतं तुम्ही चुरमुरे-शेव आणणार म्हणून ! कित्येक दिवसांत खाल्ले नव्हते. चला रे–'

"अन काय–तीन दिवसांच्या उपासानंतर चुरमुऱ्यांचं जेवण आम्ही सर्वांनी हसतखेळत केलं."

आईने गोष्ट संपवली, की आम्ही पाणी पिऊन स्वस्थ झोपत असू. खरोखरच सांगतो, रिकाम्या पोटी असूनदेखील आम्हांला आईच्या कुशीत झोप कशी अगदी गाढ लागायची !

आईला मुख्यतः पैसे मिळत ते भांडी, धुणे, दळण ही कामे करून. त्या वेळी आजच्याप्रमाणे मोलकरणीला भाव नव्हता. काम देणारे जणू आपण थोर उपकारच

करत आहोत अशा कल्पनेत असत. कामाचे पैसे कधी वेळेवर मिळायचे नाहीत. बरे, ते मागण्याचीही सोय नसे. असलेले काम सुटण्याची भीती!

एकदा काय झाले, दुसऱ्या दिवशी गुढीपाडवा होता. कामावर जाताना आई म्हणाली, "हे बघा, कपाटात दीड भाकरी आहे कालची. एकेक चतकोर आता घ्या नि तीन चतकोर रात्रीला ठेवा. हा एक पैसा आहे शिल्लक. समोरच्या हॉटेलातून उसळ आणा नि जेवा. मी आज मालकीणबाईजवळ पैसे मागतेच."

आई गेल्यावर आम्ही एकमेकांकडे पाहिले. माझा धाकटा भाऊ पोटावर हात ठेवत म्हणाला, "आई ग! एकाएकी पोट दुखू लागलं! छे भयंकरच! मी जेवणार नाही बरं का ताई आज!" आणि दप्तर घेऊन तो शाळेत गेला.

मी म्हटले, "माझं काही पोट दुखत नाही, पण जरा जड वाटतं. आज लंघन केलं तरच बरं वाटेल मला." अन मीही निघालो.

रात्री आई घरी आली. तेव्हा तिच्या पडलेल्या चेहऱ्यावरून आम्ही ओळखले, की पैसे मिळाले नाहीत. क्षीण आवाजात आई ताईला म्हणाली, "बरं, उरलेली भाकरी आण बघू विमल. वाढून देते तुम्हांला."

पण ताई जागची हालली नाही. आईने विचारले तरी ताई काही बोलेना. आईने कपाटात जाऊन पाहिले. भाकरीचा डबा रिकामा होता.

पुन्हा आमच्यापाशी येत आईने विचारले, "सर्व भाकरी सकाळी संपवलीत वाटतं?"

पण कसे कुणास माहीत, आमच्या चेहऱ्यांनी गुपित फोडले. कारण आईने मात्र काहीसे दटावतच विचारले, "काय रे, काय झालं?"

झाला प्रकार आईला सांगणे भागच होते. माझे बोलणे संपण्यापूर्वीच एकदम चेहरा लाल करून आईने ताईला विचारले, "म्हणजे विमल, तू एकटीनं सर्व भाकरी खाल्लीस?"

ताई काही बोलेचना.

आई रागाने, खेदाने, त्राग्याने बोलत होती—"माझी मुलं गरिबीत राहोत पण एकमेकांसाठी जीव टाकतात असा अभिमान होता मला. पण विमल, तू सर्वांत मोठी आहेस. असं करणं तुला शोभत नाही. मी काय बोलू? माझी शिकवण फुकट गेली."

रात्री आम्ही फक्त पाणी पिऊन निजलो. आई आमच्यापाशी बोलली नाही. तिने गोष्टी सांगितल्या नाहीत. ती रात्र फारच भयंकर गेली आमची!

सकाळी आम्ही उठलो तेही भीतभीतच. आईची अंघोळ झाली होती. ताईचीही

झाली होती. आम्हां दोघा भावांना अंघोळ घालताना आईला सारखे रडू येत होते. ताई मात्र घुम्यासारखी काही न बोलता वावरत होती. आता मलासुद्धा ताईचा भयंकर राग आला होता.

कामावर जाण्यासाठी निघताना आम्हां दोघा भावांना जवळ घेऊन सद्गदित स्वरात आई म्हणाली, "आज बघते मिळाले तर! चार आणे मिळाले तरी...." आईच्याने पुढे बोलवेचना.

इतक्यात आईने घाईघाईने आम्हांला दूर केले. मी आश्चर्याने पाहू लागलो. माजघराच्या दारातून ताई आत येत होती. तिच्या हातात एक डबा होता. आमचा नेहमीचा भाकरीचा डबा नव्हता तो. उभा पितळी डबा होता.



ताई पुढे आली आणि तिने काही न बोलता डबा आईच्या हाती दिला. आईने डब्याचे झाकण उघडले आणि ती एकदम आश्चर्याने उद्गारली, "हे काय ग?"

आम्हीही कुतूहलाने पाहू लागलो. पाहतो तो काय....डब्यात लाडू!

ताई बोलू लागली, "तू म्हणाली होतीस, की मालकीणबाई पैसे देतील म्हणून. पण मला खात्री नव्हती. काल दुपारी या दोघांनी खाल्लंच नाही. तेव्हा मला कल्पना सुचली. तू दिलेल्या पैशाचा गूळ आणला नि भाकरी कुस्करून लाडू केले. म्हटलं पाडव्याला तोंड गोड करावं सर्वांचं!"

आईने आश्चर्याने विचारले, "पण तू हे कालच का नाही सांगितलंस मला?"

ताई म्हणाली, "मला तुम्हां सर्वांना आश्चर्यचकित करून सोडायचं होतं!"

आईने ताईला घट्ट पोटाशी धरले आणि ती रडू लागली. ते रडणे आनंदाचे होते हे काय सांगायला पाहिजे!

आता आमची परिस्थिती खूपच चांगली आहे. आईचा हात धरून तिला रोज देवदर्शनाला नेण्यासाठी खास बाई नोकरीला ठेवली आहे मी. पण दर गुढीपाडव्याला आमच्या इथे जे पक्वान्न असते ते म्हणजे भाकरी नि गूळ यांचे लाडू! आणि हे लाडू ताईच करते! सासरहून मुद्दाम गुढीपाडव्याला ताई तेवढ्यासाठी येते!

लवलेश नसणे–मुळीसुद्धा नसणे; हातखंडा–कौशल्य; पालुपद–कवितेत प्रत्येक कडव्याच्या शेवटी येणारा चरण; अठरा विश्वे दारिद्र्य–अतिशय गरिबी; सद्गदित स्वरात–गहिवरून.

**अभ्यास :**

१. लेखकाच्या बालपणी त्याच्या घरची स्थिती कशी होती? त्या स्थितीचे वर्णन करा.
२. मुलांचे चेहेरे उजळले पण बाबा का चपापले?
३. ताईने कोणती गंमत केली? त्यावरून तिच्या स्वभावातले कोणते गुण तुम्हांला कळतात?
४. दारिद्र्य असूनही घरी दुःख नव्हते, असे लेखकाने का म्हटले आहे?
५. पुढील शब्द व शब्दसमूहांचे अर्थ सांगा :
   वाकुल्या, थंडा फराळ, गुपित, लाचार, सात मजली हास्य.
६. पुढील वाक्ये ज्या प्रसंगात आली आहेत त्या प्रसंगांचे वर्णन करा :
   (अ) माझी मुलं गरिबीत राहोत पण एकमेकांसाठी जीव टाकतात असा अभिमान होता मला.
   (आ) मला वाटलंच होतं तुम्ही चुरमुरे-शेव आणणार म्हणून!





३३

# जोगचा धबधबा

**काकासाहेब कालेलकर**

**आचार्य द. बा. ऊर्फ काकासाहेब कालेलकर (जन्म : १८८५; मृत्यू : १९८१.) यांनी विविध प्रकारचे लेखन केले आहे. त्यांची 'स्मरणयात्रा', 'लोकमाता' ही व इतरही अनेक पुस्तके प्रसिद्ध आहेत. आचार्य कालेलकरांनी जगाचा प्रवास केला होता. भारतात जागजागी आढळलेल्या सृष्टिसौंदर्याची त्यांनी बहारदार वर्णने करून ठेवली आहेत. भारत सरकारने त्यांना 'पद्मविभूषण' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला आहे.**

**पुढील पाठात त्यांनी जोगच्या धबधब्याचे वर्णन केले आहे.**

साऱ्या जगाने असे मान्य केले आहे, की अशोकासारखा दुसरा सम्राट झाला नाही, आणि भव्यतेत गिरसप्पाच्या पंक्तीत बसेल असा एकही धबधबा नाही. हा गिरसप्पाचा धबधबा म्हणजेच जोगचा धबधबा.

हा धबधबा म्हैसूर राज्यात आहे. तो पाहण्यासाठी सागर या गावाहून आम्ही निघालो. राजाजी, देवदास गांधी व इतर बरीच मंडळी बरोबर होती. आम्ही मोटारीतून अरण्याचा मार्ग कापत सुटलो.

अरण्य ओलांडून एकदाचे आम्ही शरावतीच्या तीरावर आलो. झिमझिम पाऊस पडत होता. येथे जसे गगनभेदी महावृक्ष होते, तशीच लहानमोठी झुडपेही होती. अमर तृणही होते आणि भुईवर व झाडांच्या जून सालीवर उगवणारे शेवाळही होते.

होडीत बसून आम्ही पलीकडच्या काठावर गेलो. काठावरच्या जमिनीवरून कितीतरी बाळझरे उड्या घेत घेत नदीत पडत होते. त्यावरून आम्ही स्वाभाविकपणेच अनुमान काढले, की आदल्या दिवशी पाऊस पडून नदीचे पाणी खूप वाढले असावे. आज ते जवळजवळ दीड मीटर उतरले होते. आम्हांस खाली उतरून बाकी राहिलेल्यांना आणण्यासाठी होडी परत गेली.-शांत पाण्यात वल्ह्यांचा डब् डब् आवाज करत होडी येरझाऱ्या करत होती; ते दृश्य किती मजेदार होते!



' जटायुवध '　　चित्रकार : अनंतराव मल्हार माळी

## ' जटायुवध '    चित्रकार : अनंतराव मल्हार माळी

चित्रकार निसर्गसौंदर्याने मोहून जाऊन त्याचे हुबेहूब चित्रण करतो, त्याप्रमाणे कधीकधी तो स्वतःच्या कल्पनासृष्टीतही रमून जातो. एखादी कथा, एखादा प्रसंग किंवा एखाद्या व्यक्तीच्या चेहऱ्यावरचे भाव यांसारख्या गोष्टीही त्याच्या कल्पनाशक्तीला आव्हान देतात व त्यातून चित्रकार अनेक सुंदर कलाकृती निर्माण करतो.

श्री. माळी यांचे ' जटायुवध ' हे चित्र अशा चित्रांपैकीच एक आहे. चित्रातला प्रसंग रामायणातला आहे. सीतेचे हरण करून रावण जेव्हा तिला घेऊन लंकेस जायला निघाला तेव्हा वाटेत त्याची जटायू नावाच्या पक्ष्याशी गाठ पडली. जटायू रामभक्त होता. रामाची पत्नी सीता हिला रावण पळवून नेतो आहे हे पाहून त्याला संताप आला. त्याने सीतेला सोडवण्यासाठी रावणाबरोबर लढाई केली; परंतु जटायूचा त्यामध्ये अंत झाला. रामभक्त जटायू याला चांगले काम करीत असताना मृत्यू आल्यामुळे तो स्वर्गात गेला.

ही कथा चित्रित करताना श्री. माळी यांनी कथेला जिवंत स्वरूप प्राप्त करून दिले आहे. सीतेची असहाय्य स्थिती त्यांनी अचूकपणे चित्रित केली आहे. रावणाचा आविर्भाव व त्याच्या चेहऱ्यावरील भाव मोठ्या कौशल्याने दाखवले आहेत. लढाई संपून गेली असताही त्या गोष्टीचे विस्मरण रावणास होत नाही व तो प्रसंग त्याच्या दृष्टीसमोर तसाच उभा आहे. समोर जमिनीवर पडलेल्या सीतेचे भानही तो क्षणभर विसरून गेला आहे. हे सर्व रंगवताना चित्रकाराने आकाशाचा अथांगपणा योग्य तऱ्हेने दाखवला आहे. हा प्रसंग एखादया निर्जन स्थळी घडला असावा ही गोष्ट चित्र पाहताक्षणी ध्यानात येते. चित्र पाहाणाऱ्याची नजर सर्व चित्रावरून नकळतपणे फिरू लागते व रामायणातला तो प्रसंग साक्षात त्याच्यासमोर उभा राहतो.

चित्राची मांडणी मोठ्या कल्पकतेने करण्यामध्ये चित्रकाराने यश मिळवले आहे. चित्रातील प्रत्येक वस्तू चित्रातील आशय व्यक्त करण्यास मदत करते. विशेषतः रावणाच्या मागचे वठलेले झाड पाहताना निर्जन अशा भूप्रदेशाची ताबडतोब कल्पना येते. त्याप्रमाणे रावणाची शरीरयष्टी पाहताच त्याच्यातील राकटपणा आपल्या नजरेतून सुटत नाही. अशा प्रकारची रचनाचित्रे रंगवताना चित्रकाराच्या अंगी असामान्य कल्पनाशक्ती व कथाविषयाचे पुरेपूर ज्ञान असण्याची गरज असते.

श्री. माळी यांच्या या चित्रामधून त्यांच्या अंगी असलेले कलागुण सहज ध्यानात येतात व वाटते खरोखरच कलावंताचे जग केवढे अथांग आहे!

मूळ चित्र — दि आर्ट सोसायटी ऑफ इंडिया यांच्या सौजन्याने.

थोड्याच वेळात दुसरा गट येऊन पोचला. आम्ही उजवीकडील वाटेने चालू लागलो. नदीचा तो डावा काठ होता. त्या निर्जन अरण्यात पाहता पाहता आमच्या गप्पा व हास्यविनोद यांनी चारही दिशा दणाणून गेल्या! पण किती वेळ? आम्ही थोडे दूर गेलो नाही तोच नदीचा गंभीर ध्वनी आमच्या कानी पडला. ध्वनीला कशाची उपमा द्यावी? एवढा गंभीर आवाज दुसरीकडे कोठे ऐकला असेल तर उपमा सुचेल ना? मेघगर्जना भीषण असते खरी आणि ती सारे आकाश व्यापून टाकते हेही खरे; पण ती सतत टिकत नाही. येथे तुम्ही ऐकून थकला तरी आवाज थांबायचा नाही.

आता दृश्य कसे दिसेल, आता कसला देखावा पाहायला मिळेल, अशा तीव्र उत्कंठेने आम्ही डोळे ताणून चोहीकडे पाहत पाहत पथिकाश्रमापर्यंत पोचलो. जेथून धबधब्याचे दर्शन सर्वांत उत्कृष्ट प्रकारे होते, त्याच ठिकाणी म्हैसूर शासनाने हे अतिथिगृह बांधले आहे. ज्यावरून निरीक्षण करायचे त्या चबुतऱ्यावर आम्ही जाऊन पोचलो. पण काय? सर्वव्यापी धुक्याशिवाय काहीच दिसेना आणि धबधब्याचा गंभीर ध्वनी तर सारी दरी दणाणून टाकत होता! भर दुपारीसुद्धा सूर्यदर्शन होत नव्हते. जिकडे तिकडे धुकेच धुके! धुक्याचे लोटचे लोट! इतक्या आशेने यावे आणि अशी निराशा व्हावी असे कधी घडले नव्हते.

या वेळी इंद्रदेव कोपला आहे, की वरुणदेव चिडला आहे याचा मी विचार करत होतो. इतक्यात वायुदेवाने साहाय्य केले आणि एक क्षणभर—केवळ क्षणभरच—धुक्याचा तो जाड पडदा दूर झाला आणि ज्या देखाव्यासाठी जन्मभर तळमळ लागून राहिली होती, तो अद्भुत देखावा दृष्टीस पडला! महादेवाच्या डोक्यावर गंगा अवतरावी, तसा एक मोठा धबधबा हत्तीसारख्या खडकावर पडून, आपटून पाण्याचा चक्काचूर करत दशदिशांना त्याच्या चिळकांड्या सोडत आहे. छे! या देखाव्याचे वर्णन करता येत नाही.

एवढी विस्तीर्ण दरी, ते रुंद पात्र, ती भयंकर खोली आणि याच्यामध्ये पिठाचा—नव्हे मैदयाचा—तो आश्चर्यकारक धबधबा! सारेच दृश्य कल्पनातीत होते! उघड्या डोळ्यांनी पाहतो ते खरोखरीचे आहे, अशी प्रतीती दृढ होण्यापूर्वीच धुक्याचा क्षीरसागर पुन्हा पसरला.

थोड्याच वेळाने धुक्याचे आवरण दूर झाले आणि आता या टोकापासून त्या टोकापर्यंत सर्वच स्पष्ट दिसू लागले. समोरून थेट डाव्या टोकाला 'राजा' धबधबा अर्धचंद्राकार शिळेवरून खाली उडी घेत होता. नदीचे जास्तीत जास्त पाणी 'राजा'-लाच मिळते. छाती फुलवत फुलवत जेव्हा तो तीरासारखा सरळ खाली पडतो, तेव्हा

निसर्गाची शक्ती किती अतुल आहे याची कल्पना येते. 'राजा' धबधब्याचा विस्तारही काही लहानसहान नाही. त्याच्या दोन्ही अंगांस मोठमोठ्या मोत्यांचे कितीतरी सर लोंबत धावतात! खरोखर हा धबधबा 'राजा' या नावाला सर्वपरीने पात्र आहे.

त्याच्या शेजारच्या धबधब्याचे दर्शन मला सर्वांत अगोदर झाले होते आणि मी ताबडतोब त्याचे 'रुद्र' हे नाव ठेवले. त्याचा भीषण ध्वनी ऐकल्यावर आणि त्याची जटा पाहिल्यावर दुसरे नाव सुचायचेच नाही.

थेट उजव्या अंगास एक सडपातळ धबधबा आहे. त्याचे नाव मी 'पार्वती' ठेवले. पोटभर पाहून घेतल्यावर पुन्हा आमच्या गोष्टी चालू झाल्या. आपण स्वतः जे काही पाहिले असेल ते दुसऱ्यास दाखवण्याची हौस ज्याला वाटणार नाही तो मनुष्यच नव्हे. आपण ज्याचा अनुभव घेतला त्याचा अनुभव दुसरेही घेतात—घेऊ शकतात अशी खात्री झाल्याशिवाय त्याला पूर्ण संतोष होत नाही. राजाजींनी माझे लक्ष वेधले, "खाली तर पाहा! थंड वाफेचे हे लोटचे लोट कसे वर उसळून येत आहेत!" देवदास म्हणाला, "ते पक्षी पाहा! कसे निर्भयपणे उडताहेत!" अशा प्रकारे बरोबरीची मंडळी त्या समोरच्या दऱ्याकडे पाहून त्याचे वर्णन करत होती.

राजाजी म्हणाले, "उन्हाळ्यात जेव्हा धबधबा पडतो, तेव्हा पाण्याच्या तुषारांवर नाना तऱ्हेची इंद्रधनुष्ये दिसतात. त्या वेळची शोभा सर्वस्वी निराळीच असते." आणि चांदण्या रात्रीसुद्धा धनुष्ये दिसत नाहीत असे नाही. गवताचे मोठे मोठे भारे पेटवून धबधब्यात सोडून दिल्याने अंधाऱ्या रात्री साऱ्या दरीने पेट घेतला आहे असा भास होतो! कित्येक लोकांनी रात्री शोभेच्या दारूचे पुष्कळ बाण सोडून येथे मोठीच मजा लुटली आहे.

गप्पागोष्टी करता करता आम्ही बंगल्यापर्यंत केव्हा पोचलो, ते कळलेदेखील नाही!

रुद्र–शंकराचे भयंकर रूप; अतिथिगृह–पाहुण्यांचे निवासस्थान; प्रतीती–अनुभव.

**अभ्यास :**

१. जोगचा धबधबा पाहून लेखकाच्या मनात कोणकोणत्या कल्पना आल्या?
२. 'राजा' धबधबा पाहून लेखकाला कोणत्या कल्पना सुचल्या?
३. धबधब्याच्या आवाजाबद्दल लेखकाने काय म्हटले आहे?
४. या पाठात लेखकाने सुंदर सुंदर कल्पना योजल्या आहेत. त्यांतील तुम्हांला सर्वांत उत्तम कल्पना कोणती वाटते?
५. तुम्ही पाहिलेल्या एखादया भव्य डोंगराचे किंवा खोल दरीचे वर्णन करा.
६. 'लोकमाता' हे काकासाहेब कालेलकरांचे पुस्तक वाचा.

३४

# आतले आणि बाहेरचे

**गो. वि. करंदीकर**




प्रा. गो. वि. करंदीकर (जन्म : १९१८.) हे कवी व लघुनिबंधकार आहेत. 'स्वेदगंगा' 'मृद्गंध' हे काव्यसंग्रह आणि 'स्पर्शाची पालवी' हा लघुनिबंधसंग्रह इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. भारत सरकार व महाराष्ट्र शासन यांनी त्यांच्या पुस्तकांना पारितोषिके देऊन त्यांच्या साहित्यसेवेचा गौरव केला आहे. पुढील पाठ 'स्पर्शाची पालवी' या पुस्तकातून घेतला आहे.

माणसाच्या खऱ्या जाती दोनच आहेत असे लेखकाला वाटते व ते त्यांनी या पाठात सांगितले आहे.

मला आता असे वाटते, की माणसाच्या खऱ्या जाती दोनच! एक आतले आणि दुसरे बाहेरचे. गेले कित्येक महिने या विचाराचा धुडगूस माझ्या मनात चालू होता; पण परवा पुण्याहून येताना आगगाडीत जो गमतीचा अनुभव आला त्याने तो अगदी स्पष्ट झाला.

स्टेशनवर पोचायला मला आधीच उशीर झाला होता. आत शिरतो इतक्यात एक घंटा ठणाणली. अशा वेळी आपली मन:स्थिती मोठी विचित्र असते. घंटा कुठल्याही गाडीची असली तरी ती आपल्याच गाडीची असल्याचा भास होतो. त्यात माझ्या पायांत बूट असल्याने धावणेही धोक्याचे होते. तेव्हा चालण्याच्याच पद्धतीने धावण्याचा वेग साधत मी शिकस्त करून गाडीचे दार गाठले आणि ते लोटण्याचा प्रयत्न करणार इतक्यात आतल्या लोकांचा हट्टाग्रह सुरू झाला.

"अहो साहेब! हा सेकंडचा डबा आहे! पुढं चला." एकाने सभ्य सूचना केली. काय गंमत आहे पाहा! आतल्या लोकांना बाहेरचे लोक हे सर्व तिसऱ्या वर्गातील वाटतात.

इतक्यात दुसऱ्याने आवाज उठवला, "अहो, पुढच्या डब्यात इतकी जागा आहे आणि इकडं कशाला घुसला? पुढचा डबा सबंध रिकामा आहे, तिकडं जा."

आतल्या लोकांना आपल्या डब्याशिवाय बाकी सर्व डबे विशेषतः पुढचे, नेहमी रिकामे दिसतात!

पण आहे त्यालाच चिकटून राहण्याची खास कारवाई केल्याखेरीज मला गत्यंतर नव्हते. मी दार लोटत होतो आणि आतले माझा प्रतिकार करत होते. बरे, त्यांचीही चूक नव्हती. गाडीत तोबा गर्दी होती. दार उघडणेही मुष्किल होते. विशेषतः दाराजवळ खेटून उभा असलेल्या एका भल्या लठ्ठ भय्याने द्वारपालाचे काम मोठ्या नेकीने चालवले होते. आतले लोक त्याचे कौतुक करत होते आणि त्या कौतुकाने त्याची वीरवृत्ती जागृत झाली होती. शेवटी दाराच्या आघाडीवरून माघार घेऊन मी गनिमी काव्याने खिडकीवरूनच हल्ला केला. वळकटी आत ढकलली. अर्धवट उडी मारून डोके आत खुपसले आणि पाय उचलून स्वतःचा त्रिशंकू करून घेतला! परमेश्वराला त्रिशंकूची दया येवो किंवा न येवो; पण माझ्या या अवस्थेची दया आतल्या लोकांना आली हे निश्चित. गाडी सुरू झाली. मी आत ओढला गेलो आणि त्या महाकाय द्वारपालाच्या खांद्याला खांदा लावून मी उभा राहिलो.

पण आश्चर्य हे, की मी आत आल्यापासून अवघ्या दहा मिनिटांतच माझा कायापालट झाला. लवकरच द्वारपालाबद्दल आलेला तीव्र संताप पार ओसरला आणि दोनचार प्राथमिक स्वरूपाच्या मामुली प्रश्नांनंतर फार दिवसांच्या सोबत्यांसारखे आम्ही गप्पागोष्टी करू लागलो. नंतर दोघांच्या वळकट्या एकमेकांस जोडून त्या आसनावर आम्ही स्थानापन्न झालो. ज्यांचे टाळके फोडण्याचा विचार मी बाहेर असताना करत होतो, त्यांच्याच टोळक्यात मी सामील झालो. मी आत आल्याबरोबर तेही आपले शत्रुत्व विसरून गेले. माझी जात बदलली, दृष्टिकोन बदलला, संघर्षाची जागा सहकार्याने घेतली. पुढच्या गाडीतळावर जेव्हा दुसरा एक खेडुतांचा लोंढा आमच्या डब्यात शिरू लागला तेव्हा त्या हल्ल्याविरुद्ध आम्ही दोघांनीही संयुक्त आघाडीची उभारणी केली आणि आतल्यांच्या हिताचे बाहेरच्यांपासून संरक्षण केले. बाहेरच्याचा आतला झाला, म्हणजे माणसात केवढा अंतर्बाह्य बदल घडून येतो, याचा उमज प्रथम तेव्हा मला पडला.

आतले आणि बाहेरचे हाही एक जातिभेदच आहे. या जातिभेदाचे मर्यादित स्वरूप म्हणजे स्पृश्यास्पृश्य, स्त्री-पुरुष, मालक–मजूर वगैरे. जीवनातल्या अनेक

क्षेत्रांत आतले आणि बाहेरचे यांचा खटका नेहमी सुरू असतो. आतल्यांची नीती निराळी, बाहेरच्यांची निराळी. आतल्यांचे हेतू वेगळे, बाहेरच्यांचे वेगळे. आतले बाहेरचे झाले अगर बाहेरचे आतले झाले, म्हणजे माणसाच्या मनोरचनेत केवढा विस्मयकारक फरक पडतो पाहा! हक्क, रजा, वेतनश्रेणी वगैरेसंबंधी सतत कटकटी करणारा सेवक एकदा संस्थेचा पदाधिकारी झाला, की लगेच त्याच्या तोंडात त्याग शिस्त, सहकार्य वगैरे शब्द वेळी अवेळी घोळू लागतात. जे सेवकांच्या बाबतीत तेच संस्थांच्या व पक्षांच्या बाबतीत घडते. विरोधी पक्ष सत्तारूढ झाला, की लगेच त्याच्या कायापालटाला सुरुवात होते. संप घडवणारेच संप नको म्हणू लागतात.

आतले आणि बाहेरचे हा जातिभेदच आपल्या आकांक्षा व सुखदुःखे यांच्या मुळाशी आहे. परमेश्वर या बाहेरच्यांचे आतल्यांत व आतल्यांचे बाहेरच्यांत रूपांतर करण्याचा मजेदार खेळ अखंड खेळत असतो.



महाकाय – धिप्पाड शरीराचा; कायापालट – संपूर्ण बदल; प्रतिकार – विरोध; नेकीने – प्रामाणिकपणे, निष्ठेने; संघर्ष – झगडा; त्रिशंकू – हा एक राजा होता. त्याला सदेह स्वर्गाला जायचे होते. विश्वामित्र ऋषींनी यज्ञ करून त्याला स्वर्गात पाठवले. परंतु स्वर्गाचा राजा इंद्र याने त्याला खाली ढकलून दिले. विश्वामित्राने त्याला 'खाली येऊ नकोस, आहेस तेथेच थांब.' असे सांगितले, म्हणूनच तो मध्येच (पृथ्वी व स्वर्ग यांत) लोंबकळत राहिला अशी पौराणिक कथा आहे.



अभ्यास :

१. 'आतले' आणि 'बाहेरचे' हाही एक जातिभेदच आहे असे का म्हटले आहे?
२. 'बाहेरचे' 'आतले' झाले म्हणजे त्यांच्यात कोणते बदल घडतात?
३. खालील शब्दांचे अर्थ सांगून त्यांचा वाक्यांत उपयोग करा :
   स्पृश्यास्पृश्य, हट्टाग्रह, विस्मयकारक, रूपांतर, अंतर्बाह्य, सत्तारूढ.
४. 'आतले आणि बाहेरचे' हा लेखकाला आलेला साधा व रोजचा अनुभव आहे. पण त्यातून त्यांनी एक मोठे तत्व सहज सुचवले आहे. असाच एखादा अनुभव तुम्हांस येतो का हे पाहा. त्यावर विचार करा व तो लिहून काढा.







३५

# पाडवा ते दिवाळी

**शंकर पाटील**

शंकर पाटील (जन्म : १९२६.) हे कथाकार, कादंबरीकार व चित्रपटकथा-लेखक आहेत. 'वळीव', 'धिंड', 'निवडक शंकर पाटील', 'टारफुला' इत्यादी त्यांची पुस्तके प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कथासंग्रहांना व चित्रपटकथांना पारितोषिके देऊन महाराष्ट्र शासनाने त्यांचा गौरव केला आहे. त्यांनी आपल्या साहित्यात ग्रामीण जीवनाच्या विविध अंगांचे कलात्मक दर्शन घडवले आहे.

पुढील उतारा त्यांच्या 'टारफुला' या कादंबरीतून घेतला आहे.

चैत्रातला पाडवा आला. वर्षाचा नवा दिवस साजरा झाला. रामनवमीचे दिवस उत्सवात निघून गेले. चैत्र गेला आणि वैशाख सुरू झाला. लग्नसराईची झुम्मड उडाली. वाजंत्र्यांची धांदल उडाली. एकेका मुहूर्ताला पाचपाच लग्ने होऊ लागली आणि एकच वाजंत्री ती वाजवू लागले. घरोघर केळवणं सुरू झाली. पै-पाहुणे गोळा होऊ लागले. वाजतगाजत वऱ्हाडे येऊ लागली–जाऊ लागली. रुखवताची भांडणे गाजू लागली. सबंध वैशाख मास असा लग्नसराईने गजबजून गेला.

वैशाख गेला आणि ज्येष्ठ आला. नांगरलेली, कुळवलेली राने पावसाची वाट बघत राहिली. चैत्र–वैशाखात आटून गेलेले ओढेनालेही 'पाणी-पाणी' करू लागले. लोक पेरणीच्या तयारीला लागले. सांदीकोपऱ्यात पडलेली अवजारे बाहेर येऊ लागली. सुतार–मेटावर आणि लोहाराच्या घरावर लोक दिवसदिवसभर पहारा करत बसू लागले. लोहार, सुतार आपल्या कामांत गर्क होऊन गेले. कुणी खुरप्याला नव्या मुठी घालून घेऊ लागले. कुणी कुळव दुरुस्त करू लागले.

बघता बघता मृग नक्षत्र निघाले. मृग आला आणि दिवसाचे तोंड दिसेना झाले! पाण्याने भरलेले काळे ढग पाझरू लागले. गार वाऱ्याने चैत्र–वैशाखातला उकाडा

गेला आणि दिवसाउजेडी म्हातारी-कोतारी माणसे अंगाभोवती घोंगडी धरून बसू लागली. आभाळ एकसारखे ठिबकू लागले, गळू लागले. ओढेनाले दुथडी भरून वाहू लागले. नदीला पूर येऊ लागला. पावसाने झोड उठवून दिली आणि तापलेल्या जमिनी गारेगार होऊन गेल्या.

पाऊस थांबला. दोनचार दिवस उघडीप झाली. मृगातल्या त्या गोड उन्हाने वाफसा येऊ लागला. 'घात आली ! घात आली !' ही एकच दंगल गावात माजली. धांदल उडाली. पेरणीची तापद्रा सुरू झाली आणि मग कुणाची कुरी चालेना झाली; कुणाच्या चाड्यातून बी गळेना झाले. कुणाला अवजार मिळेना झाले; तर कुणाला जनावर गावेना झाले. कुणाला बी कमी पडू लागले; तर कुणाला ते पेरायला गडी सापडेना झाले. ज्याच्या त्याच्या रानात पेरणी सुरू झाली आणि गावाला दुसरे काही सुचेना झाले.

आठपंधरा दिवसांत जोंधळा पेरून झाला. मोड उगवून वर येऊ लागले. तरारणारी हिरवी, पोपटी, पाती डोळा उघडून बघू लागली. भुईमूग टोकणला जाऊ लागला. पटावरच्या सोंगट्यांगत माणसे दिवसदिवसभर रानांत बसलेली दिसू लागली. भांगलण सुरू झाली. कोळपणी होऊ लागल्या.... पिवळे माळ हिरवे झाले. ओढ्यानाल्यांच्या काठांवर गवत उगवून वर येऊ लागले. घळीतून पाणी खेळू लागले आणि दिवसदिवसभर माळावर, डोंगरावर, जनावरांचे कळप चरताना दिसू लागले.



ज्येष्ठ गेला आणि आषाढ आला. मृगात पेरलेली पिके उगवून वर येऊ लागली. खुरपणी, भांगलणी, कोळपणी सुरू झाली. पाऊस तब्येतशीर पडू लागला आणि ओढ्यानाल्याचे पाणी झुळझुळ वाहू लागले. रानातल्या पिकांचा आणि गवतांचा मातकट वास दरवळू लागला. सारी सृष्टी हिरवीगार दिसू लागली आणि बेंदूर आला.

बेंदूर आला आणि घरोघर फिरून कुंभाराने चिखलाचे बैल दिले. गावच्या मांगाने घराघराला पिंपळाच्या पानांची तोरणे बांधली. लोकांनी बैलांची शिंगे तेल हुरमुंजाने रंगवली. निरांजनांनी आणि भेंड्यांनी जनावरांच्या पाठी-पोटांवर रंगीबेरंगी छाप उठवले. अंगावर भिंगांच्या झुली घातल्या. नवे कासरे लावले. गळ्यांत गंड बांधले आणि शेंब्यांना रंगीत गोंडे लावले. कुणी सजुगरा शिजवून घातला; कुणी गव्हाची सोजी करून चारली. नळ्याने तेलअंडी पाजली. कुणी हौशी गड्यांनी परड्यातली, रानातली झाडे झोडपून कावळ्यांची कोठी चाचपली;आणि तेलअंडी पिऊन, सजुगरा खाऊन खोंड सुस्तावले. वाजतगाजत करीच्या बैलांची मिरवणूक निघाली. हलगी, ताशा, लेजीम यांचा आवाज दिवसभर घुमत राहिला.

आकाड तळला आणि श्रावण आला. ऊन-पावसाचा खेळ सुरू झाला. डोंगराच्या कुशीत ढग खाली लोंबू लागले. झिरमाट पडू लागले आणि पिवळे ऊनही गळू लागले. इंद्रधनुष्याच्या सप्तरंगी कमानी दिसू लागल्या. रात्रीच्या वेळी गावात पोथीपुराणे सुरू झाली. मध्यरात्रीपर्यंत लोक पोथी ऐकत बसू लागले. चार धार्मिक गोष्टी कानांवरून जाऊ लागल्या.

एका पाठोपाठ पावसाची नक्षत्रे येऊ लागली—जाऊ लागली आणि बघता बघता नागारपंचीम आली.

नागारपंचीम आली आणि घराघरांत खेळ सुरू झाले. लेकुरवाळ्या बायकाही फेर धरून नाचू लागल्या. रात्ररात्र जागरणे होऊ लागली आणि दीड दिवसाचे शिराळशेटाचे राज्य आले. गठळ्यात बांधून ठेवलेला मोतीचूर जोंधळा तव्यावर उड्या मारू लागला. परड्यातल्या झाडांवर झोपाळे झुलू लागले. पंचीम आली आणि पोरी-बाळी जरीची, रेशमाची ठेवणीतली लुगडी नेसून नागोबाला दूध—लाह्या घेऊन घोळक्यांनी गाणी म्हणत जाऊ लागल्या. टोपलीत नाग घेऊन गारुडी गावात आले आणि दिवसभर त्यांच्या तोंडाची पुंगी वाजत राहिली....एक गोड नाद कानात ठेवून पंचीम निघून गेली....

पंचीम गेली आणि गौरीगणपतीचे दिवस जवळ आले. झेंडूची, गौरीची, चाफ्याची गुलबसाची फुले डोलू लागली. सारी सृष्टी नटून गेली. रानोमाळ एक गोड गंध दरवळू लागला. नांदायला गेलेल्या पोरी माहेरी आल्या. फेराची गाणी सुरू झाली. रात्ररात्र बाया झिम्मा घालू लागल्या, फुगड्या खेळू लागल्या. हातात सूप धरून नाचू लागल्या. कोंबडा होऊन, घोडा होऊन दमू लागल्या. पकवा घालून तोंडे दुखू लागली; घसा बसू लागला.

गौरी आल्या, गणपती आला. उलथण्याने टराटरा परातीची पाठ खाजवून गौरीची

कानउघाडणी केली. सकाळ-संध्याकाळ आरती सुरू झाली. हे आठदहा दिवस भर्रकन गेले आणि एक दिवस 'गणपती बाप्पा मोरया, पुढच्या वर्षी लौकर या!' असे घोष गावभर उठत राहिले. भादवा असा उत्साहात निघून चालला. पोथीपुराणांच्या समाप्ती झाल्या. पिशाची अमुशा आली. भादव्यातली पितरे आणि अहेवनवमीची जेवणेही झाली.

पानाला हिरवे, पिवळे किडे लागू लागले आणि कमरेला, छातीला आलेली जोंधळ्याची पिके पिवळी दिसू लागली. तापल्या उन्हात माना वाकवून उभी राहू लागली. शेंडे करपू लागले. मिरची, तंबाखूची झाडेही खुजी दिसू लागली. पिकातला जोम असा नाहीसा होऊ लागला आणि तणाला जोर चढला. टारफुला तरारून उगवू लागला – बेदरकारपणे वाढू लागला आणि मूळ पिकाला खायला उठला! भांगलणीला, कोळपणीला दाद देईना झाला. किती कुळवले तरी तणाला नवी फूट फुटू लागली आणि पिके मरू लागली. पावसावाचून सुकू लागली. लोक वर तोंड करून ढगांकडे बघू लागले. आणि एक दिवस पावसाने गर्दी केली. मज्जा झाली! वाळत चाललेल्या पिकावर नवी काळोखी आली. तेज आले. बसलेला जोंधळा उठू लागला. धाटे सरसरून वाढू लागली. खुरटलेली मिरची गुडघ्यामांडयाला लागू लागली. फांद्या फुटून झोकदार दिसू लागली. तंबाखूची तुटाळीही मूळ धरू लागली. मधला पांढरा देठ रसाने भरून गेला आणि पातळ पाने जाड होऊ लागली. त्यांचा गडद हिरवा रंग उन्हाने काळा दिसू लागला. पिकांनी असा जोम धरला आणि तणाचाही बीमोड होऊ लागला. टारफुल्याचाही काटा बसत चालला. हिरवे बाटुक डोक्यावर घेऊन शेतकरी रोज घरला येऊ लागले आणि गणेशचतुर्थीला व्यालेल्या गायी-म्हशी अंग धरू लागल्या. कासा मोठ्या करून भरपेट दूध देऊ लागल्या. शेतकरी डोळ्यापुढे स्वप्ने रंगवू लागला.

आणि एके दिवशी सकाळी ताशा तडतड वाजू लागला. गावात वाघ नाचू लागले. रंगीबेरंगी कागदांवर 'पंजे' लावले गेले. अलाव्याजवळ नवसाची माणसे-काणसे जमू लागली. अंगात आलेली माणसे घुमू लागली. रंगीबेरंगी, चमकदार कागदांनी ताबूत तयार झाले. डोले मिरवत मिरवत गावाबाहेर गेले आणि तेथे ताबूत थंड झाले.

होता होता दसरा आला. लोकांच्या तोंडावर नवा नूर दिसू लागला. एका उदंड उत्साहाने गाव हालू लागले. देवळात घट बसवले. नवरात्र सुरू झाले. गावातली शेपन्नास माणसे नवरात्राला देवळात जाऊन बसली. मारुतीच्या, महादेवाच्या, रामाच्या देवळांपुढे तोरणे लटकू लागली. उसाच्या, जोंधळ्याच्या हिरव्या कमानींनी देवळांची तोंडे झाकून गेली. रोज एकेक माळ चढू लागली आणि हत्ती नेमका

माळेत सापडला! लोकांचा आनंद मनात मावेना झाला. हत्ती माळेत सापडला आणि ठेवल्यासारखा रोज नेमाने पाऊस येऊ लागला. पावसाने झोड उठवून दिली. पिकाला लागलेली किडामुंगी धुऊन गेली. गावात उत्सव जोराने साजरा होऊ लागला. देवळापुढच्या मंडपात टाळमृदंग वाजू लागले. कुणी सुरेल गळयावर, तर कुणी भसाडया आवाजात अभंग म्हणू लागले. पेटी वाजू लागली – डग्गा घुमू लागला. रोज रात्री राममंदिरात कीर्तनही सुरू झाले.

आणि शिलंगणाचा दिवस आला. अंगावर नवे कपडे घालून लोक सोने लुटायला घराबाहेर पडू लागले. कोशा पटके आणि बादली फेटे डोक्यांवर दिसू लागले. आपट्याचा माळ माणसांनी भरून गेला. सोने लुटायची झुंबड उडाली.



दसरा गेला....दिवाळी आली. नव्या कपडयांची खरेदी झाली. कोऱ्या लुगडयांच्या घड्या गायीच्या अंगावरून फिरल्या. शिंप्याच्या दुकानात रात्ररात्रभर अरगणी पेटत राहिल्या. घरोघर जागरणे सुरू झाली. रव्याचा-बुंदीचा लाडू, गुळाचे-साखरेचे कानुले अशा जिनसांनी भरलेली ताटे वर विणलेला पांढरा रुमाल घालून एकमेकांच्या घरांत गेली-आली. फटाक्यांचा दणका उडाला. सुवासिक तेले लावून अंघोळी झाल्या. पुरुषांनी जरीकाठी बादली आणि कोशे फेटे डोक्याला बांधले आणि शालूपैठणी नेसून बाया नटल्या. एका रात्रीत परटिणीने गाव ओवाळून काढले. फराळ-आराळ सुरू झाले. तुपा-तेलाने घसा धरला. चार दिवस चंगळ झाली.

वर्षाची दिवाळी आली आणि हुरहूर लावून निघून गेली. ओढयाला आलेला पूर घटकाभरात ओसरावा तसे झाले.



कुळवणे – जमिनीची मशागत करणे; सुतारमेट – सुताराच्या घरापुढील चार लोक बसण्याची जागा; कुरी – धान्य पेरण्याचे एक साधन; घात येणे – धान्य पेरण्यासाठी योग्य अशी वेळ येणे; तापद्रा – घाई, गडबड; चाडे – पाभरीवरील लाकडी पात्र; हुरमुंज – एक प्रकारचा रंग (तेलात या रंगाचे मिश्रण करून तो रंग जनावरांच्या शिंगांना, अंगाला लावून रंगवतात); सजुगरा – बाजरी; सरमाड – बाजरीचे वाळलेले ताट; धाटे – ताटे; तुटाळी – उगवून न आलेले रोप; बाटूक – ओला चारा; अरगण – दिव्याचा एक प्रकार; बादली फेटा – डोक्याला बांधण्याचा रेशमी फेटा.

अभ्यास :

१. या पाठात वर्षभरातील कोणकोणते सण आले आहेत ? कोणत्या महिन्यात कोणते सण येतात, यांची यादी तयार करा.

२. पोळा हा सण खेड्यात कसा साजरा केला जातो ?

३. 'दिवसाचे तोंड दिसेना झाले.'—याचा अर्थ सांगा. अशी आणखी कितीतरी वाक्ये या पाठात सापडतील, ती शोधा.

४. प्रत्येक ऋतूसाठी सण योजलेले आहेत. त्या त्या सणांचा व त्या त्या ऋतूंचा काही विशेष संबंध लावता येतो का, हे पाहा. दोन ऋतूंतील सणांची माहिती दया.

५. नागपंचमीला नागोबाला दूधलाहया दयाव्या अशी रीत आहे. अशा प्रकारच्या इतर कोणकोणत्या रूढींचा उल्लेख या पाठात आलेला आहे ?

६. आवश्यक ती माहिती गोळा करा व खालीलप्रमाणे तक्ता भरून तो वर्गात लावा.

| ऋतू | नक्षत्र | महिना | होणारी कामे | सण |
|---|---|---|---|---|
| | | | | |

७. दिवाळीचा सण किंवा दुसरा एखादा सण तुम्ही कसा साजरा केला ते तुमच्या मित्राला पत्राने कळवा.

३६

## बाबा मानवदास

अ. गो. शेवडे

**अनंत गोपाळ शेवडे** ( जन्म : १९११; मृत्यू : १९७९ ) हे नागपूर येथून प्रसिद्ध होणाऱ्या 'नागपूर टाईम्स' या इंग्रजी दैनिकाचे संपादक होते. त्यांनी हिंदी, मराठी व इंग्रजी या तिन्ही भाषांतून लेखन केले. त्यांची 'ज्वालामुखी' ही कादंबरी बेचाळीसच्या आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर लिहिली आहे. त्यांच्या या मूळ हिंदी कादंबरीचा मराठी अनुवाद सौ. यमुना शेवडे यांनी केला आहे. या अनुवादित कादंबरीतून पुढील उतारा घेतला आहे.

ऑगस्ट क्रांतीच्या तेजस्वी संदेशाने जिकडे तिकडे चैतन्य निर्माण झाले. अशा वेळी विदर्भातील घुघरी या चिमुकल्या गावात काय झाले, ते वाचा.

घुघरी गावाच्या उत्साहाला त्या दिवशी उधाण आले होते. एरव्हीच ते एक जागृत गाव होते. आता तर बोलूनचालून क्रांतीचे वातावरण. मग काय विचारता! 'करा किंवा मरा' या घोषवाक्याने सारे गाव दुमदुमले. दोन-अडीच हजार वस्तीचे ते गाव! तेथे पोलिसठाणे, पोस्ट ऑफिस व प्राथमिक शाळा होती. राजकीय जागृतीत मोठमोठ्या तहसिलींनाही मागे सारणारे ते गाव होते. नेत्यांना या गावाबद्दल पूर्ण भरवसा वाटत होता. पाटील, पटवारी अशा लोकांची मोजकी घरे सोडून दिल्यास राष्ट्रीय झेंडा आणि गांधींची तसबीर या दोन गोष्टी नसणारे एकही घर तेथे सापडले नसते. राष्ट्रीय गीते आणि भजने गाणाऱ्या लोकांचे तेथे एक मंडळही होते. त्यांच्याजवळ हार्मोनियम, तबला, झांजा, चिपळ्या, एकतारी वगैरे सारा साज होता. गावाच्या पंचक्रोशीतील इतर खेड्यांप्रमाणे ते गावही बाबा मानवदासांचे परमभक्त होते.

बाबाजी याच गावचे असून भगवद्भक्ती म्हणजेच मानवसेवा अशा धर्माची ते शिकवण देत. खंजिरीवर भजने गाताना ते इतके रंगून जात, की ऐकताना जनताही

दंग होत असे. भजनाची भाषा आणि भाव सरळ असल्यामुळे अशिक्षितांच्या अंतःकरणासही ती जाऊन भिडत. भक्तीला कर्माची जोड मिळाली पाहिजे अशी त्यांची निष्ठा असल्यामुळे कपाळाला गंध फासून ध्यान करताना ते आणि त्यांचे भक्त कधी दिसले नाहीत. उलट सफाईचा झाडू, औषधांची पेटी, पाटी-पेन्सिल असलीच उपकरणे त्यांच्या हाती दिसायची. ग्रामसफाई, आजाऱ्यांची सेवाशुश्रूषा, साक्षरताप्रसार असल्या मोहिमांमुळे ग्रामसुधारणा होई. बाबा मानवदास गांधीजींचे भक्त होते. प्रत्यक्ष राजकारणाशी बाबाजींचा काही संबंध नव्हता. ते फारसे शिकले नव्हते परंतु त्यांच्या प्रवचनांत सुंदर सुंदर विचार असत. त्यांच्या वाणीत माधुर्य, हृदयात प्रेमळपणा आणि आचरणात सौजन्य होते. त्यांच्या सान्निध्यात येणारी प्रत्येक व्यक्ती त्यांची भक्त बने.

त्या दिवशी गुरुवार होता. बाबाजींच्या भक्तमंडळींनी भजनाचा कार्यक्रम ठेवला होता. रात्री नऊ वाजता भजन सुरू झाले. सभोवतालच्या आठ-दहा गावांतील लोक तेथे गोळा झाले. बायका, पुरुष, मुले, मुली–सारे ! आदल्या दिवशीच तीन मैलांवर असणाऱ्या आमगावात गोळीबार झाला होता. त्यात फागू नावाचा एक शेतकरी मारला गेला होता. स्त्रियांवर अत्याचार झाल्याच्या बातम्याही कानी आल्या होत्या. लोकांची मने शोकाने आणि रोषाने भरली होती. फागू हा स्वभावाने सरळ व गरीब असून लोकप्रिय होता. तो बाबाजींचा भक्त होता. त्याच्या अकारण मृत्यूमुळे लोकांच्या मनास धक्का बसला. जिवाला विरंगुळा वाटावा म्हणून पोराबाळांसहित सारे जण मानवदासांचे भजन ऐकण्यासाठी घुघरीला आले होते. फागू शेतकऱ्याची दुर्दैवी आईही त्यांच्यात होती. तिच्याने चालवेना म्हणून दोन युवकांनी तिला खांद्यावर बसवून आणले. तिच्या अश्रूंना खंड नव्हता. फागू तिचा एकुलता एक मुलगा होता.

भजनाच्या स्थानी तिचा प्रवेश होताच लोक आपसांत कुजबुजले. तिचे पाझरणारे डोळे पाहून लोकांनीही आपले डोळे पुसले. तिला पाहताच बाबा मानवदासांनी व्यासपीठावर उभे राहून तिला उत्थापन दिले आणि तिला आदरपूर्वक नमस्कार करून ते म्हणाले,

"आई ! तुम्ही फार भाग्यशाली आहात. तुमचा मुलगा देशासाठी हुतात्मा झाला !"

त्या दिवशीचे भजन अपूर्व झाले. बाबाजी भजनात तल्लीन झाले. ते रंगून गात होते. त्यांच्याबरोबर जनता धुंद झाली. त्या दिवशी काही औरच रंग चढला. ते तन्मय होऊन सूरदासांचे भजन गाऊ लागले—

"अबकी टेक हमारी, लाज राखो गिरिधारी!"

जणू काही ते प्रत्यक्ष ईश्वरालाच आवाहन करत होते—"सारा भारत परकीय अत्याचारांनी त्रासला आहे. जनता 'त्राहि भगवन्' झाली आहे. अशा वेळी हे ईश्वरा, तू ये आणि भारताची लाज राख." ते पुढे म्हणाले—

"जैसी लाज राखी अर्जुनकी भारत युद्धमंझारी
सारथि होके रथको हाको चक्र-सुदर्शनधारी
जैसी लाज राखी द्रौपदीकी होने न दीन्हि उधारी।"

ही शेवटची ओळ जेव्हा त्यांनी म्हटली, तेव्हा कौरवांची सभा डोळ्यांसमोर मूर्तिमंत दिसू लागली. दुःशासनाने केलेले वस्त्रहरण, पांडवांची असहायता, द्रौपदीचा करुण धावा! ह्या धाव्याशी बाबाजी एकरूप झाले. मानवदास म्हणू लागले—

"सूरदासकी लाज राखो, अब को है रखवारी।"

सारा श्रोतृसमुदाय मुग्ध होऊन भक्तिरसात डुंबला. आपल्या दुःखाचा त्यांना विसर पडला. फागूची आईही भजनात दंग झाली व नेते जरी तुरुंगात गेले, तरी आपण आता एकाकी किंवा असहाय नाही, साक्षात भगवंताचा आपणांस आसरा आहे असे लोकांना वाटले. भजनांच्या आनंदसागरात डुंबत असतानाच बाबाजींनी नवे भजन सुरू केले.

"क्या सोया गफलतका माता, जाग रे नर जाग रे।"

श्रोतृसमुदाय हळूहळू समाधीतून जागा होऊ लागला. त्यांचा पहाडी आवाज आसमंतात दुमदुमला. त्यांची खंजिरी शंकराच्या डमरूप्रमाणे डमडमू लागली. लोक जागृत झाले. त्यांच्यात चैतन्य आले.

त्यानंतर आनंदघनांचे एक भजन त्यांनी भैरवीत म्हटले—

"अब हम अमर भये न मरेंगे।"

आणि शेवटी रामधून म्हटली—

"रघुपति राघव राजाराम, पतितपावन सीताराम।"

सारा श्रोतृसमुदाय रामधून म्हणू लागला. सतत चार तास भजन ऐकून आलेला उल्हास त्या रामधुनेत प्रतिबिंबित झाला होता. अर्धा तास रामधून चालू होती. आता

लय वाढली होती. चिपळ्यांची छुनूछुन्, खंजिरीची फडफड, मृदंगाचे धिन्-धिन् आणि साऱ्या श्रोतृसमुदायाच्या टाळ्या यांमुळे एक अद्‌भुत वातावरण निर्माण झाले. त्या वेळी साऱ्या भौतिक जगाचा विसर पडला. फक्त बाबा मानवदासांची नेत्रोन्मीलित मूर्तीच तेवढी समोर होती. त्यांची दाढी, त्यांचे पांढुरके केस, गळ्यातील फुलांच्या आणि रुद्राक्षांच्या माळा, त्यांची भगवी वस्त्रे यांखेरीज दुसरे काहीच दिसत नव्हते.

भजन समाप्त होताच "बोलो प्रभू रामचंद्र की जय! भगवान कृष्ण की जय! भारत माता की जय!" अशा जयघोषांनी सारे आकाश दुमदुमले.

बाबाजींचे आजचे भजन अगदी अपूर्व होते. आज अगदी कृतार्थ झालो, असे सर्वांना वाटले.

पहाटेच्या सुमारास लोक आपापल्या घरी पोचतात न पोचतात तोच पोलिसांनी आणि लष्कराने घुघरी गावाला गराडा घातला आणि बाबा मानवदासांना पकडून तुरुंगात टाकले!



**अभ्यास :**

१. घुघरी गावात व इतर गावांत कोणता फरक होता?
२. फागू कोण? तो कसा मारला गेला? त्याच्या मरणाबद्दल बाबा मानवदास काय म्हणाले?
३. बाबा मानवदासांचे भजन फार रंगले होते हे स्पष्ट करणारा परिच्छेद कोणता? त्यातून बाबा व त्यांचे श्रोते यांच्याबद्दल तुम्हांला काय-काय समजले? हे भजन अपूर्व का होते?
४. 'लाज राखो गिरिधारी' असे कोण म्हणत आहे? श्रीकृष्णाने कोणाकोणाची लाज राखल्याबद्दल भजनात उल्लेख आहेत?
५. माधुर्य, सौजन्य, हुतात्मा, विरंगुळा, कृतार्थ या शब्दांचे अर्थ दया.
६. १९४२ च्या आंदोलनाची माहिती मिळवा.

## ३७

## गांधीदर्शन





बालभारती ५ व ६ या पुस्तकांमधील 'गांधीदर्शन' हे पाठ तुम्ही वाचले आहेत. त्यांत महात्मा गांधींच्या थोरवीबद्दल निरनिराळ्या लेखकांनी व विचारवंतांनी वर्णिलेले प्रसंग तुम्ही वाचले आहेत.

या पाठातही गांधीजींचे विविध दर्शन तुम्हांला घडेल. त्यांच्या जीवनात झालेली क्रांती त्यांच्याच शब्दांत येथे दिली आहे. श्री. महादेवभाई देसाईंनी टिपलेला एक क्षण खरोखरच विलक्षण आहे. गांधीजींचा मृत्यू ही एक पूर्णाहुती आहे, ते अमर आहेत याचे दर्शन शेवटच्या उताऱ्यात घडेल.

### माझ्यातील क्रांती

—महात्मा गांधी

आफ्रिकेत असतानाची गोष्ट. मी नाताळला जायला निघालो होतो. माझे मित्र श्री. पोलक मला पोचवायला स्टेशनवर आले होते आणि 'हे पुस्तक प्रवासात वाचण्यासारखे आहे, ते वाचून काढा. तुम्हांला ते आवडेल.' असे म्हणून त्यांनी रस्किनचे 'अन्टु धिस लास्ट' हे पुस्तक माझ्या हातात दिले.

हे पुस्तक वाचण्यास सुरुवात केल्यानंतर माझ्याने ते सोडवेच ना. त्याने मला पकडून धरले. जोहान्सबर्ग ते नाताळ चोवीस तासांचा रस्ता आहे. गाडी संध्याकाळी डर्बनला पोचली. पोचल्यानंतर सबंध रात्र झोप येईना. पुस्तकात दर्शवलेले विचार अमलात आणण्याचा विचार ठरला.

यापूर्वी रस्किनचे एकही पुस्तक मी वाचले नव्हते. विद्यार्थिदशेत अभ्यासाच्या पुस्तकांपलीकडे माझे वाचन जवळ जवळ नव्हतेच. पण जी थोडीशी पुस्तके मी

वाचली आहेत, ती चांगली पचवली आहेत असे म्हणता येईल. अशा पुस्तकांपैकी हेच एक पुस्तक असे म्हणता येईल, की ज्याने माझ्या जीवनामध्ये तत्काळ महत्त्वाचा रचनात्मक फेरफार घडवून आणला. पुढे मी त्याचे भाषांतरही केले. ते 'सर्वोदय' या नावाने छापले आहे.

माझी अशी समजूत आहे, की जी गोष्ट माझ्यामध्ये भिनलेली होती तिचेच स्पष्ट प्रतिबिंब मला रस्किनच्या या ग्रंथरत्नामध्ये पाहावयास मिळाले. त्यामुळे त्याने माझ्यावर संपूर्ण ताबा मिळवला आणि त्याच्यातील विचारांची अंमलबजावणी माझ्याकडून करवली. 'सर्वोदया'चे सिद्धान्त मी समजलो ते असे—

१. सर्वांच्या कल्याणात आपले कल्याण आहे.
२. वकील काय किंवा न्हावी काय, दोघांच्याही कामाची किंमत सारखीच असली पाहिजे. कारण पोटापाण्याचा हक्क दोघांनाही सारखाच आहे.
३. साधे अंगमेहनतीचे, शेतकऱ्याचे जीवन हेच खरे जीवन होय.

पहिली गोष्ट मला माहीत होती. दुसरी मला अंधूक दिसत होती. तिसऱ्या गोष्टीचा मी विचारच केला नव्हता. पहिलीमध्ये दुसऱ्या दोन्ही समाविष्ट आहेत, हे मला 'सर्वोदय'ने दिव्यासारखे स्पष्ट दाखवले. प्रभात झाली आणि विचारांच्या अंमलबजावणीच्या प्रयत्नाला मी लागलो.

२

## विलक्षण कसोटी

—महादेवभाई देसाई

गांधीजी जिथे राहत असत ते सेवाग्राम हे एक बाजूचे खेडे होते, तरी तिथेही त्यांच्या दर्शनाकरिता सर्व भागांतून लोक येत असत. एकदा काही श्रीमंत मद्रासी बायका तिथे आल्या. मोठ्या मुश्कीलीने त्यांनी गांधीजींच्या झोपडीत प्रवेश मिळवला. दर्शनाला येणाऱ्या माणसांकडून गांधीजी सामाजिक कार्यासाठी देणगी वसूल केल्याशिवाय राहत नसत.

या मद्रासी स्त्रियांना हा नियम ठाऊक होता. त्यांनी आपल्या अंगावरले दागिने काढून पुढे ठेवले आणि त्यांना नमस्कार केला. गांधीजींनी हसत त्या अलंकारांचा स्वीकार केला. मग त्यांना नमस्कार केला. मग त्यांतल्या एका तरुण मुलीकडे पाहत ते म्हणाले, "देशकार्याला आज मिळेल तितका पैसा हवाच आहे. तुम्ही बाकी सारे

दागिने दिले; पण तुमच्या गळयातलं मंगळसूत्र—त्यातही सोनं आहेच की !"

हा प्रश्न ऐकून ती मुलगी क्षणभर गोंधळली, गडबडली. नुकतेच तिचे लग्न झाले होते. प्रश्न नुसता त्यागाचा नव्हता–भावनेचा होता. मंगळसूत्र म्हणजे सौभाग्याचे चिन्ह. ते कसे द्यायचे? पुराणात सत्वपरीक्षेच्या गोष्टी असतात ना? गांधीजींची ही मागणी थोडीशी तशीच होती.

पण तिच्या मातृभूमीचे सौभाग्य समोर बसून हसतमुखाने मंगळसूत्राची मागणी करत होते. तिचे गोंधळलेले मन क्षणार्धात शांत झाले. तिने लगेच गळयातून मंगळसूत्र काढले आणि गांधीजींच्या हातात दिले. त्या मुलीने ते मंगळसूत्र हातात टाकताच गांधीजींनी तिच्याकडे क्षणभर पाहिले आणि ते तिला परत देत ते म्हणाले, "ही माझी भेट ठेवा तुमच्याजवळ."

## ३

## गांधीजी अमर आहेत!

—ग. त्र्यं. माडखोलकर

महात्माजी गोळीला बळी पडले? छे! ते तर अमर आहेत. शिखंडीच्या पाठीमागून अर्जुनाने सोडलेल्या बाणांनी विद्ध होऊन भीष्माचार्य ज्या वेळी रथातून खाली कोसळले, त्या वेळी 'अहो, हा महात्मा गेला! हा धर्मात्मा गेला!!' असा एकच आक्रोश दशदिशांतून दुमदुमला! पण त्या वेळी शरवर्षावाने सारे शरीर चाळणी-सारखे होऊन गेलेले असता आणि तहानेने घसा कोरडा पडलेला असताही शरपंजरी भीष्माचार्य उद्गारले, "नाही! मी जिवंत आहे! मी जिवंत आहे!!"

तसाच त्या जराजर्जर, छिन्नविच्छिन्न झालेल्या शरीरातून बाहेर पडलेला महात्मा-जींचा आत्मा, अजेय आणि अमर आत्मा उद्गारत असेल, "मी जिवंत आहे! मी जिवंत आहे!!"

महात्माजी गोळीला बळी पडले नाहीत; पडणे शक्य नाही. ते अमर आहेत. त्यांचा आत्मा अमर आहे. त्यांचे कार्य अमर आहे. त्या कार्याची स्फूर्ती अमर आहे.

ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजी स्वतंत्र भारताचा उदय होऊन महात्माजींचे अवतारकार्य एका परीने संपले आणि म्हणूनच त्यांनी आपल्या जिवावर मारेकरी टपलेले आहेत याची जाणीव असतानादेखील, योगीश्वर भगवान श्रीकृष्णाप्रमाणे मृत्यूला फुलासारखे छातीवर झेलले!

श्रीकृष्णाच्या मरणाचा प्रसंग आणि गांधीजींच्या मरणाचा प्रसंग यांत किती विलक्षण साम्य आहे! कुरुक्षेत्रावर कौरवांचा संहार होऊन पांडव स्वतंत्र आणि सत्ताधारी झाले. लोकांना गीतामृताचा लाभ झाला. श्रीकृष्णाचे अवतारकार्य एका परीने पूर्ण झाले आणि मग अवतारकार्य संपलेल्या त्या भगवंताला मरण आले, ते एका क्षुद्र पारध्याच्या तीराने! एकांतात ध्यानमग्न अवस्थेत बसलेल्या श्रीकृष्णाचे सुंदर चरणकमल पाहून त्या पारध्याला वाटले, हे हरणाचे कोमल मुख आहे आणि त्याने तीर सोडला! तो तीर लागताच भगवंतांनी स्मितहास्य केले. त्या भयभीत झालेल्या पारध्याला अभय दिले आणि क्षणार्ध डोळे मिटून देहत्याग केला!

गांधीजींचा मृत्यू त्याच प्रकारचा नाही काय?

छे! त्यांचा मृत्यू त्याहीपेक्षा अधिक वीरोचित आणि स्फूर्तिप्रद आहे. जणू येशू ख्रिस्ताचा मृत्यू! जमावाच्या क्रोधाला ख्रिस्त बळी पडला, क्रुद्ध आणि क्षुब्ध जमावाने त्याला सुळावर चढवण्याचा हट्ट धरला आणि स्वतःचा सूळ स्वतःच्या खांद्यावर वाहत नेऊन ख्रिस्ताने त्यावर आरोहण केले! पण सुळावर चढत असतानाच त्याने आपल्या शरीराला खिळे ठोकणाऱ्यांना उद्देशून परमेश्वराची प्रार्थना केली, "हे माझ्या बापा, तू यांना क्षमा कर! कारण आपण कोणतं कृत्य करत आहोत, याची या मारेकऱ्यांना काहीच जाणीव नाही!"

आणि आपल्या निराश झालेल्या शोकसंतप्त शिष्यांना त्याने दिलासा दिला, "तुम्ही भिऊ नका! मी मेलो नाही, मरणार नाही. मी सदैव तुमच्यांतच आहे. तुम्ही डोळे उघडून पाहा म्हणजे मी तुम्हांला दिसेन!"

गांधीजींचे मरण हे भीष्माचार्यांच्या, श्रीकृष्णाच्या आणि ख्रिस्ताच्या मरणासारखेच दिव्य नाही काय? त्यांचे जीवन हा यज्ञ होता. त्या यज्ञाची पूर्णाहुती म्हणजेच त्यांचा मृत्यू!

त्या पूर्णाहुतीबद्दल शोक कसा करणार? म्हणून अश्रूंनो, मागे फिरा! हृदया, आपली सारी तळमळ, आपल्या साऱ्या वेदना आवर आणि मनाला सांग, जनाला सांग, जनतेला सांग—

गांधीजी अमर आहेत! गांधीजी अमर आहेत!



३८

विचारधन





१

## आत्मविश्वासाचा मंत्र

—स्वामी विवेकानंद

आत्मविश्वासासारखा दुसरा मित्र नाही. आत्मविश्वास हा भावी उन्नतीचा मूळ पाया आहे. आपण म्हणू ते करू शकू अशी स्वतःच्या ठिकाणी मूळ श्रद्धा पाहिजे. यानंतर परमेश्वरावर विश्वास ही पुढील पायरी आहे. आत्मविश्वास प्रथम आणि परमेश्वरावरील विश्वास पाठीमागून अशी ही श्रेणी आहे. पुराणातल्या साऱ्या तेहतीस कोटी देवांवर तुमचा पूर्ण भरवसा असला, तथापि आत्मविश्वास तुम्हांपाशी नसेल, तर यशस्वी जीवनाकडे जाणारी पाऊलवाटही तुमच्या नजरेस पडणार नाही, हे तुम्ही पक्के ध्यानात ठेवा. आत्मविश्वास हाच काय तो तुमचा खरा मित्र आहे. त्याची संगत जोडा, त्याची कास धरा आणि शक्तिमान व्हा !

२

## मनुष्याचा धर्म

—महात्मा जोतिबा फुले

सगळी मनुष्यजात ही एक आहे आणि स्वातंत्र्य, समता, बंधुत्व यांच्या पायावर सगळ्या मनुष्यजातीचे एक कुटुंब निर्माण करणे हे मनुष्याचे ध्येय होय. सर्व मानव, स्त्री किंवा पुरुष यांचे हक्क सारखे आहेत. शेतकी, कलाकौशल्य, मजुरी इत्यादी कामे

मनुष्यास हीनपणा आणत नसून त्यांच्यायोगे मनुष्याची थोरवीच सिद्ध होते. सृष्टीच्या कार्यकारणभावाचा अर्थ समजून मनुष्याच्या गरजा भागवण्याकरता सृष्टीचा किंवा निसर्गशक्तीचा उपयोग करणे हा मनुष्याचा मूलभूत अधिकार व कर्तव्य होय. प्रयत्न केल्यास ईश्वराने निर्माण केलेल्या सृष्टीत सर्व मनुष्यांस तिचा स्वर्ग बनवता येईल. या विश्वात जगण्याकरता आणि उपभोगाकरिता वस्तू उत्पादन करणे किंवा मिळवणे हे मनुष्याचे पहिले कर्तव्य आहे आणि त्याकरिता परस्परांना साहाय्य करणे हा मनुष्याचा श्रेष्ठ धर्म आहे. एवढेच नव्हे, तर हीच ईश्वराची पूजा आहे.

## ३

## वाचन

—गो. ग. आगरकर

वाचनाचे दोन प्रकार आहेत—एक दुसऱ्यासाठी व एक स्वतःसाठी. आपण जे वाचतो ते आपले आपण लिहिलेले असेल किंवा दुसऱ्याने लिहिलेले असेल. कोणतेही पुस्तक किंवा लेख वाचण्यासाठी हातात घेण्यात दोन हेतू असतात—माहिती किंवा करमणूक. पुस्तके ज्या प्रकारची असतील त्या प्रकारचा परिणाम वाचणारांच्या मनावर होईल. वाईट पुस्तके वाचण्यापेक्षा काही न करणे बरे; कारण काही न करण्याने मनाला निदान कोणताही वाईट नाद तरी लागत नाही. ज्यांनी वाचनाचे पवाडे गायले आहेत त्यांनी ते चांगल्या वाचनाचे गायले आहेत. पुस्तके ही एक प्रकारचे मित्र आहेत. कुमित्रांच्या संगतीप्रमाणे वाईट पुस्तकांच्या वाचनापासून दुर्गुण जडतात म्हणून कुमित्रांप्रमाणे वाईट पुस्तकांचा सहवास टाळला पाहिजे.

## ४

## या ध्वजाखाली

—डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन

आपल्या झेंड्याचा मधला भाग पांढरा आहे. त्याचा काय अर्थ? पांढरा रंग प्रकाशाचा, सत्याचा, साधेपणाचा निदर्शक आहे. आणि यावरील अशोकाचे चक्र काय सांगते? ते सद्गुणाची, धर्माची खूण आहे. या झेंडयाखाली काम करताना आपण धर्ममय राष्ट्र, सत्यमय राष्ट्र असा याचा अर्थ आहे. आपल्या वर्तनाची ही सूत्रे असू देत. या चक्राचा आणखी काय अर्थ आहे? चक्र म्हणजे गती. हे चक्र सांगते,

की गतिमान राहा. डबक्यात बसून राहू नका. केशरी रंग त्यागाचा नि नम्रतेचा निदर्शक आहे आणि हिरवा रंग म्हणजे हरितश्यामल भूमातेचा. या ध्वजाखाली उभे राहून सेवावृत्तीने नि निरहंकारपणाने आपण पृथ्वीवरच स्वर्ग निर्मू या !

५

## तीन मुद्दे

**आचार्य विनोबा भावे**

कोणतेही काम नीट व्हायचे म्हटल्यास त्याला तीन गोष्टींची जरुरी असते. पहिली गोष्ट म्हणजे त्या कामातला संपूर्ण वेग साधला पाहिजे. परीक्षेसाठी प्रश्न विचारले जातात. त्यांची उत्तरे ठरलेल्या वेळेच्या आंत लिहून झाली पाहिजेत असा नियम असतो. यात महत्वाचा मुद्दा आहे. अमुक अंतर कूच करून जायचे आहे. एवढाच प्रश्न लष्करापुढे नसतो; तर अमुक वेळेच्या आत अमुक अंतर जायचे आहे असा मुदतबंदीचा प्रश्न लष्करापुढे असतो. जी गोष्ट लष्कराची तीच कमीजास्त प्रमाणात व्यवहारातल्या सर्व उद्योगांना लागू आहे.

दुसरा मुद्दा कामातील सफाई किंवा नेटकेपणा. लष्कराचाच दाखला घेतला तर अमुक अंतर अमुक वेळात कूच करून जायचे हे तर झालेच; पण हे कूच करण्याचे काम पद्धतशीर, लष्करी शिस्तीबरहुकूम, टीप सांभाळून झाले पाहिजे. कामातील सुंदरता साधली नाही तर काम करून न करून सारखे होते. सुंदरता ही कामाची केवळ शोभा नसून तो कामाचा गाभा आहे.

कामात वेग पाहिजे, नेटकेपणा पाहिजे आणि तिसरी गोष्ट ज्ञान पाहिजे. लष्कराने ठरलेल्या वेगाने अगदी पद्धतशीर कूच केले आणि ते ठरलेल्या वेळी पोचले सुद्धा; पण ठरलेल्या जागी मात्र पोचले नाही;–जाणून काम केले नाही म्हणजे अशी दशा होते. बरोबर नकाशे आखून रस्त्यातली वळणे कोठे कोठे कसकशी सापडायची हे ठरवून त्याप्रमाणे कूच केले पाहिजे. कोणत्याही कामाची ही तीन आवश्यक अंगे आहेत. काम जाणून केले पाहिजे, नेटके केले पाहिजे आणि वेगाने केले पाहिजे. हे तिन्ही गुण साधले म्हणजे काम साधले. उदाहरणार्थ, लिहिणे केव्हा आले म्हणायचे? जलद धावत्या हाताने लिहिता आले पाहिजे. 'वाटोळे, सरळ, मोकळे' असे सुंदर लिहिता आले पाहिजे आणि शुद्धलेखनाच्या नियमांबरहुकूम शुद्ध लिहिता आले पाहिजे. इतके झाले म्हणजे लिहिणे आले.

१

# मृग

ग. दि. माडगूळकर



पद्मश्री ग. दि. माडगूळकर (जन्म : १९१९; मृत्यू : १९७७.) कवी, पटकथालेखक आणि कथाकार. त्यांचे 'चैत्रबन', 'जोगिया' इत्यादी कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांची 'मृग' ही कविता 'जोगिया,' या संग्रहातून घेतली आहे.

त्यांनी या कवितेत मृग नक्षत्रातील पावसाचे किती मनोरम वर्णन केले आहे, ते पाहा.

माउलीच्या दुग्धापरी
आले मृगाचे तुषार,
भुकेजल्या तान्हयासम
तोंड पसरी शिवार.

तुकोबाच्या अभंगाला
टाळ चिपळ्यांची साथ,
वाजताहे रानवारा
चिवारीच्या झुडुपांत !

पिऊनिया रानवारा
खोंड धावे वारेमाप.
येता मातीचा सुगंध
स्तब्ध झाला आपोआप.

अवखळ बाळापरी
पक्षी खेळतो मातीत
उभारल्या पंखांवरी
थेंब टपोरे झेलीत !

धारा वर्षता वरून
वेल वशिंड हालवी
अवेळीच फुटे पान्हा
गाय वत्साला बोलवी !

गावानेच उंच केला—
हात दैवी प्रसादास,
भिजुनिया चिंब झाला
गावदेवीचा कळस.

निसर्गाने दिले धन—
—द्यावे दुसऱ्यां, जाणुनी,
झाली छप्परे उदार
आल्या पागोळ्या अंगणी !

स्नान झाले धरणीचे
पडे सोन्याचा प्रकाश !
आता बसेल माउली
अन्नब्रम्हाच्या पूजेस !

वारेमाप—खूप, वाटेल तसे; वत्स—वासरू; अन्नब्रम्ह—अन्नरूपी देव.

**अभ्यास :**

१. 'भुकेजल्या तान्ह्यासम, तोंड पसरी शिवार.' यासारख्या या कवितेतील इतर कल्पना शोधा.
२. मातीच्या सुगंधाचा खोंडावर कोणता परिणाम झाला ?
३. कवीने पावसातील कोणकोणती दृश्ये या कवितेत चित्रित केली आहेत? त्यांपैकी तुम्हांस कोणते दृश्य विशेष आवडले? का?
४. 'आता बसेल माउली, अन्नब्रम्हाच्या पूजेस' या चरणातील कल्पना समजावून घ्या.

२

# माझी कन्या

बी



नारायण मुरलीधर गुप्ते (जन्म : १८७२; मृत्यू : १९४७.) हे 'बी' या टोपणनावाने कविता लिहीत असत. त्यांच्या कवितांचा संग्रह 'फुलांची ओंजळ' या नावाने प्रसिद्ध आहे. पुढील कविता यान संग्रहातून घेतली आहे.

लहान मुले जितकी निर्मळ तितकीच भावनाशील असतात. ती कधी हसतात तर कधी रुसतात. कवीच्या लाडक्या मुलीस शाळेत कुणीतरी टाकून बोलले, त्यामुळे तिला फार वाईट वाटले व ती रडू लागली. कवीने किती लडिवाळपणाने तिची समजूत काढली आहे, ते पाहा.

गाइ पाण्यावर काय म्हणुनि आल्या?
का ग गंगायमुनाहि या मिळाल्या?
उभय पितरांच्या चित्तचोरटीला
कोण माझ्या बोलले गोरटीला?

उष्ण वारे वाहती नासिकात,
गुलाबाला सुकविती काश्मिरात,
नंदनातिल हलविती वल्लरीला,
कोण माझ्या बोलले छबेलीला?

तुला 'लंकेच्या पार्वती' समान
पाहुनीया, होवोनि साभिमान
काय त्यांतिल बोलली एक कोण
'अहा! आली ही पहा, भिकारीण!'

रत्न, सोने मातीत जन्म घेते,
राजराजेश्वर निज शिरी धरी ते,
कमळ होते पंकात, तरी येते
वसंतश्री सत्कार करायाते.

पंकसंपर्के कमळ का भिकारी?
धूलिसंसर्गे रत्न का भिकारी?
सूत्रसंगे सुमहार का भिकारी?
कशी तूही मग मजमुळे भिकारी?

नेत्रगोलांतुन बालकिरण येती,
नाच तेजाचा तव मुखी करीती,
पाच, माणिक आणखी हिरा मोती
गडे! नेत्रा तव लव न तुळो येती.

काय येथे भूषणें भूषवावे,
विविध वसने वा अधिक शोभवावे
दानसीमा हो जेथ निसर्गाची,
काय महती त्या स्थली कृत्रिमाची!

तुला घेइन पोलके मखमलीचे,
कुडी मोत्यांची, फूल सुवर्णाचे,
हौस बाई! पुरवीन तुझी सारी,
परी आवरि हा प्रलय महाभारी!

प्राण ज्यांच्यावर गुंतले सदाचे,
कोड किंचित पुरविता न ये त्यांचे,
तदा बापाचे हृदय कसे होते,
न ये वदता, अनुभवी जाणती ते!

देव देतो सद्गुणी बालकांना
काय म्हणुनी आम्हांस करंट्यांना?
लांब त्याच्या गावास जाउनीया
गूढ घेतो हे त्यास पुसोनीया!

'गावि जातो,' ऐकता त्याच काली
पार बदलुनि ती बालसृष्टि गेली!
गळा घालुनि करपाश रेशमाचा
वदे 'येते मी' पोर अज्ञवाचा!



गंगायमुना–अश्रू; नासिका–नाक; नंदन–नंदनवन; लंकेची पार्वती–दागदागिने नसलेली गरीब स्त्री; सूत्रसंगे–दोऱ्याच्या सहवासाने; न तुळो येती–तुलना होऊ शकत नाही.

अभ्यास :

१. मुलीला रडत येताना पाहून वडलांच्या मनात कोणकोणते विचार आले?
२. मुलीची समजूत काढण्यासाठी वडलांनी काय केले?
३. त्यांनी स्वतःबद्दल कोणते उद्गार काढले? असे ते का म्हणाले असतील?
४. वाक्यांत उपयोग करा :
गाई पाण्यावर येणे, गंगायमुना, लंकेची पार्वती.

३

# गवतफुला रे गवतफुला !

**इंदिरा संत**



इंदिरा संत (जन्म : १९१४.) यांच्या 'गाई गाई' व 'लाडकी बाहुली' या कविता तुम्ही यापूर्वी वाचल्या आहेत. 'शेला', 'मेंदी', 'रंगबावरी' हे यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'गवतफुला रे गवतफुला !' ही त्यांची कविता 'कुमार' मासिकातून घेतली आहे.

या कवितेत कवयित्रीने 'रंगरंगुल्या सानसानुल्या' गवतफुलाचे कसे वर्णन केले आहे, पाहा!

रंगरंगुल्या, सानसानुल्या, गवतफुला रे गवतफुला !
असा कसा रे मला लागला, सांग तुझा रे तुझा लळा !
मित्रांसंगे माळावरती, पतंग उडवित फिरताना
तुला पाहिले गवतावरती झुलता झुलता हसताना,
विसरुन गेलो पतंग नभिचा, विसरुन गेलो मित्रांला
पाहुन तुजला हरखुन गेलो, अशा तुझ्या रे रंगकळा !
हिरवी नाजुक रेशिम-पाती, दोन बाजुंला सळसळती
नीळनिळूली एक पाकळी, पराग पिवळे झगमगती
तळी पुन्हा अन् गोजिरवाणी लाल पाकळी खुलती रे
उन्हामधे हे रंग पाहता, भान हरपुनी गेले रे !
पहाटवेळी अभाळ येते, लहान होउन तुझ्याहुनी
तुला भरविते निळ्या करांनी, दवमोत्यांची कणी कणी
गोजिरवाणा हो रविचा कर, छाया होते इवलीशी
तुझ्यासंगती लपुन खेळती, रमून जाती पहा कशी !
वारा घेउन रूप सानुले, खेळ खेळतो झोपाळा
रात्रहि इवली होउन म्हणते अंगाईचे गीत तुला

मलाहि वाटे लहान होउन, तुझ्याहूनही लहान रे
तुझ्यासंगती सदा रहावे, विसरुनि शाळा, घर, सारे
तुझी गोजिरी शिकून भाषा, गोष्टी तुजला सांगाव्या,
तुझे शिकावे खेळ आणखी, जादू तुजला शिकवाव्या,
आभाळाशी हट्ट करावा, खाऊ खावा तुझ्यासवे
तुझे घालुनी रंगित कपडे, फुलपाखरां फसवावे !
रंगरंगुल्या सानसानुल्या, गवतफुला रे गवतफुला !
असा कसा रे मला लागला, सांग तुझा रे तुझा लळा !



१. मुलाला गवतफुलाचा लळा का लागला ?
२. मुलाचे भान केव्हा व का हरपले ?
३. निसर्गातील कोण-कोण गवतफुलाशी खेळायला येतात ? त्यांचे कोणकोणते खेळ चालतात ?
४. गवतफुलाबरोबर सतत राहावे असे मुलाला का वाटते ?
५. रंगरंगुल्या, सानसानुल्या, नीळनिळूली हे शब्द काय सुचवतात ?
६. या कवितेतील कोणकोणत्या ओळी तुम्हांला गुणगुणाव्याशा वाटतात ? का ?





४

# कितीतरी दिवसांत

बा. सी. मर्ढेकर

बा. सी. मर्ढेकर (जन्म : १९०९; मृत्यू : १९५६.) मर्ढेकरांची कविता नव्या वळणाची आहे. 'मर्ढेकरांची समग्र कविता' या पुस्तकात त्यांच्या सर्व कवितांचा संग्रह केला आहे.

कवीचे बालपण खेड्यात गेले. व्यवसायानिमित्त त्यांना पुढे शहरात राहावे लागले. तथापि तेथेही त्यांच्या मनातील ग्रामीण जीवनाची ओढ नष्ट झाली नाही. त्यांच्या मनाला लागलेली ही ओढ त्यांनी या कवितेत चित्रित केली आहे.

कितीतरी दिवसांत
नाही चांदण्यात गेलो;
कितीतरी दिवसांत
नाही नदीत डुंबलो.

खुल्या चांदण्याची ओढ
आहे माझी ही जुनीच;
आणि वाहत्या पाण्याची
शीळ ओळखीची तीच.

केव्हातरी चांदण्यात
पुन्हा जाईन निर्भय;
गावाकाठच्या नदीत
होईन मी जलमय.

आज अंतरात भीती
खुल्या चांदण्याची थोडी;
आणि नदीचा प्रवाह
अंगावर काटा काढी.

बरा म्हणून हा इथे
दिवा पारवा पाऱ्याचा;
बरी तोतऱ्या नळाची
शिरी धार, मुखी ऋचा.



दिवा पारवा पाऱ्याचा – पारव्या रंगाचा विजेचा दिवा; ऋचा – वेदातील मंत्र.

**अभ्यास :**

१. कवीच्या मनाला कोणकोणत्या गोष्टींची ओढ लागलेली आहे?
२. त्या गोष्टींचा आस्वाद तो का घेऊ शकत नाही?
३. चांदणे, पाणी, नळ यांचे वर्णन करणारे शब्द शोधा. त्याचा अर्थ स्पष्ट करा.
४. 'बरी.........ऋचा' असे कवीने का म्हटले आहे?

५

# जिऊ

**चंद्रशेखर**



**चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे (जन्म : १८७१; मृत्यू : १९३७.) यांचा 'चंद्रिका' हा कविता-संग्रह प्रसिद्ध आहे. या संग्रहातील 'काय हो चमत्कार!' या दीर्घ कवितेतून 'जिऊ' हा वेचा घेतला आहे.**

या कवितेत त्यांनी एका मराठमोळ्या मुलीचे सुंदर स्वभावचित्र रेखाटले आहे

गोधूमवर्ण तीचा हरणाच्या पाडसापरी डोळे,
स्नेहाळ वदन नामी, प्रसन्न विधुबिंब जेवि वाटोळे.

तो केशपाश काळा, भाळावरि लांब आडवे कुंकू,
जणु म्हणति शब्द तीचे आम्ही कोकिलरवासही जिंकू.

घेती पाटिल साडया हौसेच्या रेशमी किनारीच्या,
ऐनेदार खडीच्या झळकति चोळया तया कुमारीच्या.
साधीच कंकणे ती, कदा तदाकार नागमोडीचे,
शोभति शुद्ध रुप्याचे तयांवरिल गोल गोठ जोडीचे.

येता सुदिन सणाचा पुतळ्यांची माळ ती गळा घाली;
तेव्हा शृंगाराच्या माहित नव्हत्या नव्या तऱ्हा, चाली.

जाई आईसंगे मळयात किंवा खळयात ही कन्या
साधी निसर्गसुंदर दिसे तदा देवता जणो वन्या!

अपवादास्पद जितकी रूपवती गुणवतीहि ती तितकी,
बहुधा गुणरूपांचे व्यस्तचि दिसते प्रमाण मूर्तित की!

कातीव सूत ऐशा येत तिला शेवया वळायाला—
ह्या फेण्या! म्हणुनि तिच्या लोकभ्रम कुरडयांवरी झाला.

लावोनि गुळवणी वा पुरण करी सार ती मजेदार
ऐसे की ते सेवुनि हुशार व्हावा मनुष्य बेजार

गुलगुलित मलमलीपरि करी झराझर कशा पुरणपोळया
काढुनि सुंदर कशिदा तिने शिवाऱ्याहि रेखिल्या चोळ्या

ती निंदणी, खुरपणी, जाणे बारीक काम शेतीचे,
केवळ राजाऊचे वळण जसे उतरले तसे तीचे.



गोधूमवर्ण – गव्हासारखा वर्ण; विधुबिंब – चंद्रबिंब; ऐनेदार – आरसे लावलेल्या; वन्या – वनातील; फेणी – एक प्रकारची मिठाई (सुतरफेणी).

अभ्यास :

१. या कवितेत कवीने जिऊचे शब्दचित्र कसे रेखाटले आहे?
२. कवीने जिऊच्या अंगच्या कोणकोणत्या गुणांचे वर्णन केले आहे?
३. 'गुलगुलित...पुरणपोळया' ही ओळ वाचताना तुम्हांस मौज वाटते का? का?
४. 'बहुधा......मूर्तित की' या ओळीतील कल्पना स्पष्ट करा. जिऊला हे वर्णन का लागू पडत नाही?
५. जिऊच्या स्वरूपाचे वर्णन करणाऱ्या ओळी कोणत्या? तिला वनदेवता का म्हटले आहे?
६. जिऊ सुगरण होती हे कवीने कोणकोणती उदाहरणे देऊन सांगितले आहे?
७. कोकिलरव, निसर्गसुंदर, लोकभ्रम, बेजार या शब्दांचे अर्थ सांगा.

६

# देवमान्य

**वामन नारायण देशपांडे**



**वामन नारायण देशपांडे** (जन्म : १९०३.) यांचे 'आराधना', 'अनामिका' इत्यादी कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'देवमान्य' ही कविता त्यांच्या 'आराधना' या संग्रहातून घेतली आहे.

एका राजाने शंभर यज्ञ केले. शंभराव्या यज्ञाच्या पूर्ततेनंतर त्याने यज्ञदेवाच्या सुवर्णमूर्तीची एक वैभवशाली मिरवणूक काढली; पण त्या मिरवणुकीत देव होता काय?

यज्ञ शंभरावा होताच पुरता
गमे भूपा झाली जन्मसफलता!
कुणा दे दक्षिणा कुणा देई भूमी.
याचकां संतुष्ट करी अंतर्यामी!
घडविली तेणे यज्ञपुरुषाची
कलाकुसरीची प्रतिमा सोन्याची.
'मिरवून मूर्ति नगरामधून
वैभव आपुले सकलां दावून
शंभर यज्ञांचे स्मारक म्हणून
होत्यालागून ती करावी अर्पण;
–प्रथा अभिनव होईल ही खास,
नावलौकिकही येईल भरास!'

—यापरी योजिला भूपाने विचार
डामडौलाची त्या हौस अनिवार!
त्याच मूर्तीची ही पालखी निघाली
नगरात तीच धांदल सगळी!

२

पहा उभारिली पताका—तोरणे
मार्ग संमार्जिले जान्हवी-जलाने,
पादचारी भूप चवरे वारितो
मंजुळ मंजुळ चौघडा झडतो.
दो बाजूंस पथी सैनिक चालती,
पालखीशी कोणा रिघो नच देती!
दर्शनार्थ जन लोटले अमित;
दुरूनच देवा भावे नमितात!
'धन्य नृपवर!' करिती ते ध्वनी
हरखून तेणे भूप म्हणे मनी—
'मजसम कोण भुवनी दुसरा?
पुण्यश्लोकांत मी पुण्यश्लोक खरा!
अमर सुमने का न उधळिती?
काय कल्पतरू सुकला संप्रति?
नुधळोत सुखे नुधळती जरी,
ठसलो जनांच्या हृदयांभीतरी!'

इतक्यात एक कुष्ठे पीडियेला
पालखीजवळी जावया सजला!
"पैस रे दया वाट! आडवा न कुणी!
टेकवू द्या माथा प्रभूच्या चरणी!
स्पर्शे त्याच्या भोग हरतील सारे!"
ऐसे वदून तो पुढे पुढे सरे!
—कोण हे साहस भूप खवळला!

"मारा पातक्याते!" सैनिकां बोलला
तळपू लागल्या नग्न तरवारी,
श्रमण ये कुणी तोच तीरापरी,
गलितांगालागी झाकी निज देहे–
हासत हासत घाव साहताहे
क्षणी होती त्याची खांडोळी–खांडोळी
–सुरी नभातून सुमवृष्टि केली!
कोठला तो कुष्ठी? –यज्ञनारायण!
स्वयं प्रकटला त्याच्या देहातून!
म्हणे, "राया! भूल पडली तुजला:
यज्ञात–मूर्तीत– असेन कोठला?
रंजल्या–गांजल्या दीनांचे शरीर
आम्हां देवतांचे हेच रे मंदिर!
मीच झालो कुष्ठी सत्त्व पाहण्याला
भिक्षूवीण न ये कुणीच कसाला!
पहा! कैसा मान्य हो देवालागून–
–स्वर्गातून तया येतसे विमान!"

अंतर्यामी–मनात; प्रतिमा–मूर्ती; होता–यज्ञविधी करणारा प्रमुख पुरोहित; संमार्जिले–शिंपडले; रिघो नच देती–जाऊ देत नसत; अमित–अगणित; पुण्यश्लोक–पुण्यवान; पैस–मोकळी जागा; श्रमण–बौद्ध संन्यासी.

**अभ्यास :**

१. राजाने शंभराव्या यज्ञाच्या परिपूर्तीसाठी काय काय केले?
२. यज्ञपूर्तीनंतर सफलता झाली असे राजाला का वाटले?
३. वैभवशाली मिरवणूक चालली असताना राजाच्या मनात कोणते विचार आले?
४. मिरवणूक जात असताना राजा का खवळला? त्याने सैनिकांना कोणती आज्ञा केली?
५. यज्ञनारायणाने राजाला काय सांगितले?
६. तुमच्या शब्दांत ही गोष्ट लिहा.



७

# कशाले काय म्हनू नही

बहिणाबाई चौधरी



**बहिणाबाई चौधरी** (जन्म : १८८०; मृत्यू : १९५१.) 'बहिणाबाईची कविता' हा यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. बहिणाबाई अशिक्षित होत्या. त्यांनी आपल्या बोलभाषेत शेतकरी–जीवनाचे दर्शन घडवले आहे. कल्पनेची भरारी व विचारांची सखोलता या दोन गोष्टींचा प्रत्यय त्यांच्या कवितेत येतो. 'कशाले काय म्हनू नही' ही कविता त्यांच्या 'बहिणाबाईची कविता' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

या कवितेत कवयित्रीने आदर्श मनुष्याची लक्षणे सांगितली आहेत. ती सांगताना तिने ग्रामीण जीवनातील विविध कल्पनांचा किती समर्पक उपयोग करून घेतला आहे पाहा.

बिना कपाशीनं उले
त्याले बोंड म्हनू नही
हरीनामाईना बोले
त्याले तोंड म्हनू नही
नही वाऱ्यानं हाललं
त्याले पान म्हनू नही
नही ऐके हरीनाम
त्याले कान म्हनू नही
पाटा येहेरीवाचून
त्याले मया म्हनू नही
नही देवाचं दर्सन
त्याले डोया म्हनू नही

ज्याच्यामधी नही पानी
त्याले हाय म्हनू नही
धावा ऐकून आडला
त्याले पाय म्हनू नही
येहेरीतून ये रिती
तिले मोट म्हनू नही
केली सोताची भरती
त्याले पोट म्हनू नही
नही वळखला कान्हा
तिले गाय म्हनू नही
जिले नही फुटे पान्हा
तिले माय म्हनू नही
इमानाले इसरला
त्याले नेक म्हनू नही
जन्मदात्याले भोवला
त्याले लेक म्हनू नही
ज्याच्यामधी नही भाव
त्याले भक्ती म्हनू नही
ज्याच्यामधी नही चेव
त्याले शक्ती म्हनू नही.

उले – फुले; मया – मळा; डोया – डोळा; हाय – हाल, गावाची विहीर; रिती – मोकळी; सोताची – स्वतःची; सोताची भरती – स्वार्थ साधणे; नेक – इमानी; भोवला – त्रास दिला.

अभ्यास :

१. या कवितेत कवयित्रीने आदर्श माणसाच्या कोणकोणत्या गुणांचे वर्णन केले आहे ?
२. त्यासाठी तिने शेतकरी जीवनातील कोणकोणते दाखले दिले आहेत?
३. पुढील चरणांतील कल्पना स्पष्ट करा :
   (अ) धावा..........पाय म्हनू नही.
   (आ) केली सोताची..........म्हनू नही.
४. या कवितेत आलेल्या ग्रामीण शब्दांची यादी करा व त्यांचे अर्थ समजावून घ्या.

८

# हिवाळा

**अनिल**



**आ. रा. देशपांडे (जन्म : १९०१; मृत्यू : १९८२.) यांची 'वाट' ही कविता तुम्ही यापूर्वी वाचली आहे. 'अनिल' या टोपणनावाने ते कविता लिहित. यांचे 'फुलवात', 'पेर्ते व्हा' इत्यादी कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. त्यांची पुढील कविता 'फुलवात' या संग्रहातून घेतली आहे.**

**वसंत ऋतूत सृष्टीचे वैभव बहराला येते. शिशिर ऋतूत त्याला एक प्रकारची अवकळा प्राप्त होते. कवीने शिशिर ऋतूतील सृष्टीचे कसे वर्णन केले आहे पाहा.**

चढली शिशिर ऋतूची कळा,
आली सृष्टीवरि अवकळा.
सुटले सोसाट्याचे माघामधले वारे
गोठले हिमाद्रित गंगाजल की सारे

भरली हरिणांना हुडहुडी
ससेही देउनि बसले दडी
सृष्टीला भरले हीव, थरथरे अंग
लोपले धुक्यातच सर्व उषेचे रंग

मिटल्या वेलीवरच्या कळ्या
फुलांच्या झडल्या की पाकळ्या
उपवनिचा गेला बहर सर्व ओसरुनी
कोपांतच पडली फुलपाखरे मरुनी

गारठल्या राघूमैना
पसरे फुलाफुलांवर दैना
झाडांची गळली पात, लता भयभीत
कंठातच थिजले कोकिलमनिचे गीत.



**अभ्यास :**

१. शिशिर ऋतूचे महिने कोणते ? या ऋतूत निसर्गात कोणकोणते बदल झालेले दिसतात ?
२. शिशिर ऋतूचे आगमन झाले आहे हे कवीने कसे स्पष्ट केले आहे ?
३. सर्व सृष्टीवर घडून आलेला परिणाम सांगणारा एक अर्थपूर्ण शब्द या कवितेत आहे. तो शब्द कोणता ? कवितेत आलेली उदाहरणे देऊन त्या शब्दाचा अर्थ स्पष्ट करा.
४. हारण, ससा, पोपट, कोकाळ यांचे स्वभावधर्म कोणते ? शिशिरामुळे त्यांत कसा बदल झाला ?
५. खालील ओळींचा अर्थ सांगा :
(अ) सृष्टीला भरले ......... अंग (आ) कंठातच ......... गीत.
६. हिवाळयाचे दहा-बारा ओळींत वर्णन करा.

९

# नका देउ हो मला देवपण

पु. शि. रेगे



प्रा. पु. शि. रेगे (जन्म : १९१०, मृत्यू : १९७८.) यांचे 'साधना', 'फुलोरा', 'गंधरेखा', 'दुसरा पक्षी' इत्यादी कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. शासनाने पारितोषिक देऊन त्यांच्या साहित्याचा गौरव केला आहे. ही कविता त्यांच्या 'गंधरेखा' या कवितासंग्रहातून घेतली आहे.

३० जानेवारी १९४८ रोजी महात्मा गांधींची हत्या झाली. त्यानंतर दुसऱ्याच दिवशी कवीने पुढील कविता लिहिली.

माझ्या, तुमच्या, भोवतालच्या
वृत्ति हराया अन्यायाच्या
क्षीण दिले मी जे आवाहन
आला ऐकुन बांधुन कंकण—
नका देउ हो मला देवपण;
तुमच्यातिल मी, माझा कण-कण.

दुःखातहि जे दिव्य पाहिले
तेच मला आशास्पद गमले,
सजवू निघता त्यातुन जीवन,
माझ्यासंगे, फिरला वणवण—
नका देउ हो मला देवपण;
तुमच्यातिल मी, माझा कण-कण.

सदासर्वदा सर्वांभुती,
सत्य वसे जे एकच अंती,

त्या सत्याचे माझे निशिदिन
तुम्हीच होता शतकोटिकिरण—
नका देउ हो मला देवपण;
तुमच्यातिल मी, माझा कण-कण.

माझ्यापाशी माझे नुरले
इतुके मज तुम्हि अपुले केले.
हृदयहि आता घ्या हो शोधुन
जेथे काहि न तुमच्यावाचुन—
तुमच्यातिल मी, माझा कण-कण;
नका देउ हो मला देवपण.



आशास्पद – आशादायक; सर्वभूती – प्राणिमात्रांच्या ठिकाणी.

**अभ्यास :**

१. गांधीजींनी जनतेला कशाचे आवाहन केले ?
२. हे आवाहन करण्यास त्यांना परिस्थिती कशी अनुकूल वाटली ?
३. भारतीय जनतेने त्यांच्या आवाहनाला कशी साथ दिली ?
४. 'नका देउ हो मला देवपण' असे गांधीजींनी का म्हटले आहे ?
५. गांधीजी भारतीय जनतेशी एकरूप झाले होते, हे कोणकोणत्या ओळींवरून स्पष्ट होते ?

१०

# अमुचे निशाण

**बा. भ. बोरकर**



(मृत्यू : १९८४)

बा. भ. बोरकर (जन्म : १९१०) यांच्या 'घास भरवताना' आणि 'माझा गाव' या कविता तुम्ही यापूर्वी वाचल्या आहेत. 'जीवनसंगीत', 'दूधसागर' व 'आनंदभैरवी' हे त्यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत. 'अमुचे निशाण' ही कविता त्यांच्या 'बोरकरांची कविता' या संग्रहातून घेतली आहे.

या कवितेत आपल्या राष्ट्रीय निशाणाबद्दलचा अभिमान कवीने व्यक्त केला आहे. आपल्या राष्ट्रीय निशाणाच्या संरक्षणासाठी व सन्मानासाठी वाटेल ते कष्ट सहन करण्याची तयारी ठेवणे हे प्रत्येकाचे कर्तव्य आहे, हा संदेश त्यांनी या कवितेत दिला आहे.

चढवू गगनि निशाण अमुचे
चढवू गगनि निशाण
कोटि मुखांनी गर्जू जय जय स्वतंत्र हिंदुस्थान !
निशाण अमुचे मनःक्रांतिचे
समतेचे अन् विश्वशांतिचे
स्वस्तिचिन्ह हे युगायुगांचे ऋषिमुख-तेज महान
मूठ न सोडू जरि तुटला कर
गाऊ फासहि आवळला जर
ठेवू निर्भय ताठ मान ही झाले जरि शिर्काण
साहू शस्त्रास्त्रांचा पाउस
आम्ही प्रल्हादाचे वारस
सत्य विदारक आणू भूवर दुभंगून पाषाण

विराटशक्ती आम्ही वामन
वाण आमुचे दलितोद्धारण
नमवू बळिचा किरीट उद्धत ठेवुनि पादत्राण

हिमालयासम अमुचा नेता
अजातशत्रू आत्मविजेता
नामे त्याच्या मृत्युंजय हे चढवू वरति निशाण



ऋषिमुख-तेज – ऋषींच्या वाणीत वर देण्याचे सामर्थ्य होते; तसे शाप देण्याचेही होते. त्यांच्या शापातदेखील त्यांची कल्याणबुद्धीच असे. आमच्या निशाणातही अशा प्रकारचे तेज सामावलेले आहे. शिर्काण – शिरच्छेद; दलितोद्धारण – गरिबांचा उद्धार; स्वस्तिचिन्ह – कल्याणकारी चिन्ह; अजातशत्रू – ज्याला शत्रू नाही असा; आत्मविजेता – स्वतःवर विजय मिळवणारा, संयमी.



**अभ्यास :**

१. आपले निशाण कशाकशाचे प्रतीक आहे ? २. निशाणाचा मान राखण्याचा निर्धार कवीने कोणत्या शब्दांत व्यक्त केला आहे ? ३. प्रल्हादाचा वारसा कोणता ? ४. 'सत्य विदारक आणू भूवर दुभंगून पाषाण' या चरणातील कल्पना स्पष्ट करा. ५. वामनाचा उल्लेख कशाकरता केला आहे ? ६. नेत्याचे वर्णन करताना कोणकोणती विशेषणे वापरली आहेत ? ती कशी सार्थ आहेत ? हा नेता कोण ?

११

# अन्योक्ती

कृष्णशास्त्री चिपळूणकर



कृष्णशास्त्री चिपळूणकर (जन्म : १८२४; मृत्यू : १८७८.) यांचे 'पदयरत्नावली' हे पुस्तक प्रसिद्ध आहे.

'अन्योक्ती' म्हणजे दुसऱ्याला उद्देशून बोलणे. 'लेकी बोले सुने लागे' अशी आपल्याकडे एक म्हण आहे. असाच काहीसा प्रकार अन्योक्तीत असतो. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी लिहिलेल्या काही अन्योक्ती पुढे दिल्या आहेत.

ज्याचे पल्लव मंगलप्रद, शिणा छाया जयाची हरी
गंधे युक्त फुले, फळेहि असती ज्याची सुधेच्यापरी
वाटे जो रमणीय भूषण वनश्रीचे मुखीचे भला,
आम्रा त्या पिक सेविता समसमा संयोग की जाहला

आहे एक सुगंध मात्र जवळी, तो त्यास राखावया
ऐसे घोर भुजंग पाळिशि, जना जे धावती खावया
येती गोड फळे फुलेहि बरवी दैवे तुला, चंदना!
त्यांच्या बा, करितोस काय न कळे संरक्षणा योजना!

फळे मधुर खावया असति नित्य मेवे तसे
हिरेजडित सुंदरी कनकपंजरीही वसे
अहर्निश तथापि तो शुक मनात दुःखे झुरे
स्वतंत्र वनवृत्तिच्या घडिघडी सुखाते स्मरे.

मेघांच्या गर्जनेने खवळुनि वरती सिंह पाहे स्वभावें
काका, त्या भीति सारी त्यजुनि तरुवरी मांसखंडासि खावे
जो उन्मत्ता गजांच्या खर-तर-नखरी फोडुनी मस्तकाते
धाला रक्ता पिऊनी, नच मृत पशुच्या इच्छितो तो कणाते

होता जोवरि अंबरी तपत तो चंडांशु तेजे निजे,
झाला निष्प्रभ तारकाधिपतिही, बोला कशाला दुजे,
राहूच्या वदनी अजी गवसता तो भानु दैवे अहा !
कैसे क्षुद्रहि काजवे चमकती त्याच्यापुढे हे पहा !



शिणा – थकल्याला; पिक – कोकिळ; कनकपंजर – सोन्याचा पिंजरा; अहर्निश – रात्रंदिवस; खर – तर – नखरी – तीक्ष्ण नखांनी; अंबरी – आकाशात; चंडांशु – प्रखर किरणांचा सूर्य; तारकाधिपति – चंद्र.



अभ्यास :

१. पहिल्या कवितेत आम्रवृक्षाचे वर्णन आहे. तिला आम्रान्योक्ती म्हणता येईल. पुढील चार कवितांमध्ये कोणकोणत्या अन्योक्ती आहेत ?

२. तिसऱ्या कवितेचा अनुवाद करा. खालील प्रश्नांची उत्तरे दया.
   (अ) पोपट का झुरतो ? यावरून कवीला काय सुचवायचे आहे ?
   (आ) पोपटाला कोणते सुख नको होते ? का ?

३. सिंहाच्या कोणत्या स्वभावविशेषाचे वर्णन केले आहे ?

४. एकेका वाक्यात उत्तरे दया :
   (अ) 'समसमा संयोग' असे का म्हटले आहे ?
   (आ) कवीने चंदनावर कोणता आरोप केला आहे ?
   (इ) क्षुद्र काजवेही सूर्यापुढे केव्हा चमकतात ?

१२

# तानाजीचा पोवाडा

**लहरी हैदर**



लहरी हैदर (जन्म : १८६०; मृत्यू : १९६३.) हे शीघ्रकवी होते. 'संभाजी महाराजांचा पोवाडा', 'प्रतापगडचा पोवाडा', 'जोधपूरच्या राणीचा पोवाडा' अशा अनेक पोवाड्यांची रचना त्यांनी केली आहे.

लहरी हैदर यांचा 'तानाजीचा पोवाडा' यातील अकरावा चौक पुढे दिला आहे. अनेक अपशकुनांस न जुमानता कर्तव्यावर अढळ श्रद्धा ठेवून तानाजी एका भयाण रात्री सिंहगड चढून गेला. त्यासाठी त्याने काय केले, त्याचे वर्णन या चौकात आले आहे.

मनी चिंतन कुलस्वामिचे । भवानी शंकराचे । शिवाजी महाराजांचे ।
सुयश चिंतुनी तानाजी खास । निघाला कोंडाणा किल्ला घेण्यास ।
बाहेर पडताच आडवा गेला तास ॥ जी जी जी ॥
म्हणे तानाजी चिंता नाही । झाले जरी काही । तरी केव्हाही ।
केलेली प्रतिज्ञा ती शेवटास । नेल्याविण नाही घेणार मुखी घास ।
काळजी म्हणे याची परमेश्वरास ॥ जी जी जी ॥
शिरावरती गृध्र आणि घारी । तळपती भारी ।
शब्द किरकिरी । करिती अशी सुरुवात अपशकुनास ।
झाड आंब्याचे जंगी रस्त्यास । धडधडा मोडुन पडले समयास ॥ जी जी जी ॥
त्याशी उल्लंघुनी तानाजी । खरा रणगाजी । म्हणे मनि माझी ।
भवानी आहे जर सहाय्यास । तर शेकडो हजारो संकटास ।
वीर हा नाहि डगमगणार त्यास ॥ जी जी जी ॥
असे बोलुन पेटला हट्टी । किल्ल्याच्या तटी । सैन्य एकजुटी ।
घेऊनी भिडला रात्रि सुमारास । दोन तास रात्री अजमास ।



दिसेना पुढिल काही कोणास ॥ जी जी जी ॥
खाली झाडी लागली किर्र । वर पहावे तर । काळा फत्तर ।
कडे उंच भिंतीसारखे खास । कोठे संपतात ठावे कोणास ।
भासे जणु टेकले ते गगनास ॥ जी जी जी ॥

(चाल बदलून)

महाघोर काळोख त्यात झगमगती काजवे किती ॥
जणू पिशाच्चे ही भय दाखवाया कोलीते नाचविती ॥
रजनी-कीटक आणि वनचरांचे ध्वनी नाना तऱ्हा भासती ॥
वेताळाची पालखी निघाली की काय काळोखाप्रती ॥
नभि देखता असंख्य तारे तेहि दाखवित भीती ॥
जणू काळपुरुषाचे नेत्र हे टौकारुन पाहती ॥
त्यातुन कैक सरारारा तुटुनिया तारे येत भोवती ॥
वाटे जणु आला इंद्र लढाईस बाण सोडि खालती ॥
अशा घोर समयास करावे काय आपसामधे बोलती ॥



मग म्हणे तानाजी सर्वांना धैर्य देउनी अती ॥
आहे कृपा भवानिची, आमुचा पाठीराखा छत्रपती ॥
आम्हा वीरांपुढे कृतांतकाळाचीही बिशाद नाही ती ॥
धैर्य देउनी चढा किल्ला हा काय आम्हांपुढती ॥

(चाल बदलून)
पेटवून दिवटि कामापुरता उजेड त्यांनि केला जी ॥
येशवंती घोरपडीचा पेटारा आणला जी ॥
तिची करून पूजा सेंदूर तिला चर्चिला जी ॥
हात जोडून तानाजीने तिला प्रणिपात केला जी ॥
"त्वा दिलेस येश आजवर बाई" म्हणे तिला जी ॥
"तसा हाही किल्ला देणारी तूच आम्हांला जी" ॥
असे बोलून सोल तिच्या कमरेशी बांधला जी ॥
करी विजय म्हणुन तटावर सोडिले तिला जी ॥
तीन वेळ परतली मागे उपाय खुंटला जी ॥

तानाजी म्हणे,'बाई का ग अशा वेळेला' जी ॥
तोंडावरून तानाजिने तिच्या हात फिरविला जी ॥
पहा कळले पशूशी कसे ऐका दाखला जी ॥
घळाघळा पशू तो अश्रू ढाळू लागला जी ॥
॥ मिळवणी ॥
करु कथन पुढील वृत्तान्त। येत्या चौकात ।
असो लक्षात । छत्रपती शिवाजी शिव अवतार ।
तानाजी मालुसरे त्यांचा सुभेदार । तसा नाही योद्धा हल्ली मिळणार ॥



तास – एक पक्षी; गृध्र – गिधाड; कृतांत – यम; सोल – दोर.

**अभ्यास :**

१. कोंढाणा किल्ला घेण्यासाठी निघताना तानाजीने कोणाकोणाचे स्मरण केले? २. वाटेत त्याला कोणकोणते अपशकुन झाले? ३. लहरी हैदर यांनी त्या रात्रीची भयाणता कोणकोणत्या गोष्टींच्या वर्णनातून व्यक्त केली आहे? ४. तानाजीचे अतुलनीय धैर्य कोणकोणत्या शब्दांतून प्रकट झाले आहे? ५. खाली दिलेल्या ओळी तुम्हांला काय सुचवतात? (अ) 'जणू पिशाच्चे ही भय दाखवाया कोलीते नाचविती' (आ) 'जणू काळपुरुषाचे नेत्र हे टौकारुन पाहती' (ई) 'वाटे जणु आला इंद्र लढाईस बाण सोडि खालती.'

## १३



# केकावली

**मोरोपंत**

**मोरोपंत रामचंद्र पराडकर** (जन्म : १७२९; मृत्यू : १७८४.) प्रख्यात मराठी पंडितकवी. यांच्या 'आर्याभारत', 'मंत्रभागवत' व 'मंत्ररामायण' व इतर आख्यानात्मक रचना प्रसिद्ध आहेत. पुढील केका त्यांच्या 'केकावली'तून घेतला आहे.

केका म्हणजे मोराचा टाहो आणि आवली म्हणजे पंक्ती. मोरोपंतांनी आपणांस मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

दयाब्द वळशील तू, तरि न चातकां सेवकां
उणे किमपि, भाविकां उबगशील तू देव का?
अनन्य-गतिका जना निरखिताचि सोपद्रवा
तुझेचि करुणार्णवा मन धरी उमोप द्रवा.

तुम्ही परम चांगले बहु–समर्थ दाते, असे
सु-दीन जन मी, तुला शरण आजि आलो, असे
पुन्हाहि कथितो, बरे श्रवण हे करा यास्तव
समक्ष किति आपुला सकळ-लोक-राया! स्तव!

प्रभो शरण आलियावरि न व्हा कधी वाकडे
म्हणोनि इतुकेचि हे स्व-हित-कृत्य जीवांकडे
प्रसाद करिता नसे पळ विलंब बापा! खरे
घनांबु न पडे मुखी उघडिल्याविना पाखरे

म्हणा मज उतावीळा, गुणचि घेतला, धावरे
असो मन असेचि, बा भजक-बर्हि-मेघा ! बरे
दिसे क्षणिक सर्व हे, भरवसा घडीचा कसे
धरील मन, आधिने बहु परिभ्रमे चाकसे

न निश्चय कधी ढळो, कुजन-विघ्न बाधा टळो
न चित्त भजनी चळो, मति सदुक्त-मार्गी वळो
स्व-तत्व हृदया कळो, दुरभिमान सारा गळो
पुन्हा न मन हे मळो, दुरित आत्म-बोधे जळो.



दयाब्द – दयारूपी पाणी देणारा मेघ; अनन्यगतिक – ज्याला आपल्यावाचून दुसरा थारा नाही असा; सोपद्रवा – पीडलेल्यास; करुणार्णव – करुणेचा सागर; घनांबु – पावसाचे पाणी; भजक-बर्हिमेघा – भक्तरूपी मोरास मेघच असणाऱ्या तू देवा; क्षणिक – फारच थोडा वेळ टिकणारे; आधि – मानसिक दुःख, त्रास; चाकसे – चाकाप्रमाणे; कुजन-विघ्न-बाधा – दुर्जनाने आणलेल्या संकटाची पीडा; सदुक्तमार्गी – सज्जनांनी सांगितलेल्या मार्गाकडे, भक्तिमार्गाकडे; स्व-तत्व – स्वतःचे तत्व, आत्मतत्व; दुरित – पाप; आत्मबोधे – आत्मज्ञानाने.

**अभ्यास :**

१. केकावलीत कवीने परमेश्वरासाठी कोणकोणती विशेषणे वापरली आहेत?
२. परमेश्वरावरील आपले लक्ष ढळू नये म्हणून कवीने कोणते मागणे मागितले आहे?
३. 'घनांबु न पडे……' या ओळीचा अर्थ सांगा, यावरून कोणते सत्य कळून येते?
४. कवीने स्वतःचे वर्णन करताना कोणकोणते शब्द वापरले आहेत? त्यावरून कवीला काय सुचवायचे आहे?
५. विग्रह करून समास सांगा : दयाब्द, कुजन-विघ्न, दुरभिमान.

१४

# उत्तमपुरुषलक्षणे

**रामदास**



**रामदास हे शिवकालातील एक प्रमुख संतकवी. 'दासबोध', 'मनाचे श्लोक', 'करुणाष्टके' इत्यादी त्यांच्या रचना प्रसिद्ध आहेत. पुढील उतारा 'दासबोधा'तून घेतला आहे.**

**या उताऱ्यात रामदासांनी उत्तम पुरुषाची काही लक्षणे सांगितली आहेत.**

उत्तम गुण स्वये घ्यावे । ते बहुतांस सांगावे ।
वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥ १ ॥

दुसऱ्याच्या दुःखे दुखवावे । परसंतोषे सुखी व्हावे
प्राणिमात्रांस मेळवून घ्यावे । बऱ्या शब्दे ॥ २ ॥

बहुतांचे अन्याय क्षमावे । बहुतांचे कार्यभाग करावे ।
आपल्यापरीस व्हावे । परावे जन ॥ ३ ॥

दुसऱ्यांचे अंतर जाणावे । तदनुसारचि वर्तावे ।
लोकांस परीक्षीत जावे । नाना प्रकारे ॥ ४ ॥

नेमकेचि बोलावे । तत्काळचि प्रतिवचन दयावे ।
कदापि रागास न यावे । क्षमारूपे ॥ ५ ॥

आलस्य अवघाच दवडावा । यत्न उदंडचि करावा ।
शब्द मत्सर न करावा । कोणी येकाचा ॥ ६ ॥

उत्तम पदार्थ दुसऱ्यास दयावा । शब्द निवडून बोलावा ।
सावधपणे करीत जावा । संसार आपला ॥ ७ ॥

उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांती ।
दुर्जनासी मिळोन जाती । धन्य ते साधु ॥ ८॥



कीर्ती पाहों जाता सुख नाही । सुख पाहाता कीर्ती नाही ।
विचारेविण कोठेचि नाही । समाधान ॥ ९॥

पेरिले ते उगवते । बोलण्यासारिखे उत्तर येते ।
तरी मग कर्कश बोलावे ते । काये निमित्य ॥ १०॥

आपल्या पुरुषार्थवैभवे। बहुतांस सुखी करावे।
परंतु कष्टी करावे। हे राक्षसी क्रिया ॥ ११ ॥



क्षमावे – क्षमा करावी; आपल्यापरीस – आपल्यासारखे; परावे – अन्य, इतर; तदनुसारचि – त्याचप्रमाणे; परीक्षीत – पारखत, जाणून घेत; प्रतिवचन – उत्तर; चळो नेदावी – चळू देऊ नये.

अभ्यास :

१. कोणकोणत्या गोष्टी करू नयेत असे रामदासांनी सांगितले आहे?
२. रामदासांनी उत्तम पुरुषाचे कोणकोणते गुण वर्णिले आहेत?
३. खालील प्रश्नांची उत्तरे एकेका वाक्यात द्या :
   (अ) 'वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या' असे रामदासस्वामी का म्हणतात?
   (आ) समाधान मिळवण्यासाठी रामदास काय काय करायला सांगतात?
   (इ) 'राक्षसी क्रिया' कशास म्हटले आहे?
४. परसंतोष, कार्यभाग, पुरुषार्थवैभव या शब्दांचे अर्थ सांगा.

१५

# अभंगवाणी



संतकवींची अभंगवाणी पिढ्यान्‌पिढ्या आपण जतन करून ठेवली आहे. खेड्यापाडयांतून आजही हे अभंग ऐकायला मिळतात. नित्य नवा प्रकाश देण्याचे सामर्थ्य या वाणीत आहे आणि म्हणून ती अमर आहे.

नामदेव, एकनाथ, तुकाराम, नरहरी सोनार यांचे काही अभंग पुढे दिले आहेत:

१

सुवर्ण आणि परिमळ हिरा आणि कोमळ
योगी आणि निर्मळ हे दुर्लभ जी दातारा
धनवंत आणि दयाळु व्याघ्र आणि कृपाळु
अग्नि आणि शीतळु हे दुर्लभ जी दातारा
क्षत्रिय शूर भला चंदन फुली फुलला
स्वरूपी गुण व्यापला हे दुर्लभ जी दातारा
ऐसा संपूर्ण सर्वगुणी केवी पाविजे शारंगपाणी
नामा करी विनवणी मुक्ति चरणी त्याचिया

**—नामदेव**

२

वैकुंठीचा हरी गोपवेष धरी। घेऊनि शिदोरी जाय वना ॥ १ ॥
धाकुले सवंगडे संगती बरवा। ठाई ठाई ठेवा गोधनाचा ॥ २ ॥
बाळ ब्रम्हचारी वाजत्री मोहरी। घेताती हुंबरी एकमेकां ॥ ३ ॥

दहीभात भाकरी लोणचे परोपरी । आपण श्रीहरी वाढीतसे ॥ ४ ॥
श्रीहरी वाढिले गोपाळ जेविले । उच्छिष्ट सेविले एका जनार्दनी ॥ ५ ॥

—एकनाथ

३

मायेविण बाळ क्षणभरि न राहे । न देखता होय कासावीस ॥ १ ॥
आणिक उदंड बुधाविती तरी । छंद त्या अंतरी माउलीचा ॥ २ ॥
नावडती तया बोल आणिकाचे । देखोनिया नाचे माय दृष्टी ॥ ३ ॥
तुका म्हणे माझी विठ्ठल माउली । आणिकांचे बोली चाड नाही ॥ ४ ॥

—तुकाराम

४

काही उपाय चालेना । काही स्वहित घडेना ॥ १ ॥
काही केले नाही पुण्य । काय जन्मासी येऊन ॥ २ ॥
केली नाही काही भक्ती । देही नाही हो विरक्ती ॥ ३ ॥
काही केले नाही तीर्थ । जन्म गेला अवघा व्यर्थ ॥ ४ ॥
व्यर्थ प्रपंच हा केला । अवघा शेवटी वाया गेला ॥ ५ ॥
गुरुकृपा होय जरी । नरहरी क्षणात उद्धरी ॥ ६ ॥

—नरहरी सोनार


मोहरी–पावा; हुंबरी घेणे–साद घालणे;


**अभ्यास :**

१. आपल्या अभंगात नामदेवांनी कोणकोणत्या दुर्लभ गोष्टींचा उल्लेख केला आहे? त्यांतून नामदेवांना शेवटी काय सुचवायचे आहे?
२. श्रीकृष्णाचा मोठेपणा एकनाथांनी कसा वर्णिला आहे?
३. संतांच्या कोणकोणत्या गुणांचे तुकारामांनी वर्णन केले आहे? या अभंगाच्या आधारे 'संतांचा मोठेपणा' या विषयावर सात-आठ ओळींचा परिच्छेद लिहा.
४. नरहरी सोनार यांना आपले जीवन व्यर्थ गेले आहे असे का वाटते? स्वतःचा उद्धार होण्यासाठी कोणत्या गोष्टीची त्यांना जरुरी वाटते?



## पसायदान

आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे तोषावे ।
तोषोनी मज द्यावे । पसायदान हे ॥ १ ॥
जे खळांची व्यंकटी सांडो । तया सत्कर्मी रती वाढो ।
भूतां परस्परे जडो । मैत्र जिवाचे ॥ २ ॥
दुरितांचे तिमिर जावो । विश्व स्वधर्म सूर्ये पाहो ।
जो जे वांच्छील तो ते लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥

—ज्ञानेश्वर

